# काळांतील निवडक निबंध

## भाग तिसरा

शिवराम महादेव परांजपे

प्रस्तावनालेखक

शं. दा. पेंडसे

पुनर्मुद्रण २७ सप्टेंबर १९४६

---

कागदी बांधणी : ३ रुपये ]      [ कापडी बांधणी : ३॥ रुपये

प्रकाशक
यशवंत गोपाळ जोशी
६२३:१५ सदाशिव पेठ, पुणें



मुद्रक:
न. वि. सरदेशपांडे
आदर्श मुद्रणालय,
३९५।५ सदाशीव, पुणें २

# अनुक्रमणिका



एकंदर चालू महर्गतेमुळें 'काळांतील निवडक निबंधाचीं' पुस्तकें जितक्या किंमतींत द्यावयाची माझी इच्छा होती तितक्या किंमतींत देतां आलीं नाहींत. याकरितां काळांतील निवडक निबंधाचे पहिले भागांत एक सवलतीचें कूपन टाकलें आहे. सवलतीची समग्र माहितीहि त्याच खंडांत दिली आहे. ग्राहकांनीं अवश्य वाटल्यास त्याचा फायदा घ्यावा.

व्यवस्थापक

य. गो. जोशी प्रकाशन, सदाशिव, पुणें.

# निबंधपरिचय

स्वदेशाच्या उद्धाराकरितां वाङ्मयसेवा करणारे जे थोर निबंधकार महाराष्ट्रांत होऊन गेले त्यांच्यामध्यें कै. शिवरामपंत परांजपे यांचें स्थान फार मोठें आहे. गतस्वातंत्र्याविषयीं पराकाष्ठेचें दुःख आणि तें पुनः प्राप्त करून घेण्याची तीव्र तळमळ यांतून कै. परांजपे यांचें वाङ्मय निर्माण झाल्यामुळें तें जिवंत व परिणामकारक झालें आहे. लोकांची घटकाभर करमणूक करण्याकरितां त्यांनीं वाङ्मयसेवा केली नाहीं. लोकांच्या अंतःकरणांत स्वातंत्र्याच्या भावनेची ज्योति पेटावी व पारतंत्र्याचा अंधार नाहींसा करण्यास तें समर्थ व्हावें म्हणून त्यांनीं वाङ्मय निर्माण केलें. त्यामुळें त्यांचें वाङ्मय वाचकांना आजहि पूर्वींइतकेंच स्फूर्तिदायक आणि विवेचनाच्या विशिष्ट शैलीमुळें आनंददायकहि वाटल्यावाचून राहात नाहीं. श्रेष्ठ साहित्य हें मनुष्याला आनंद तर देतेंच.पण कर्तव्यप्रवणहि करतें. " कर्तृत्व तितुकें झालें । शारदा गुणें ॥ " या रामदासांच्या वचनांत हाच अर्थ आहे. कै. विष्णुशास्त्री चिपळुणकरानंतर उपरोध आणि उपहास या शस्त्रांचा उपयोग कुशलतेनें व परिणामकारकतेनें करणारा निबंधकार कै. शिवरामपंतांशिवाय दुसरा झाला नाहीं. उपरोध आणि उपहास या दोन तीक्ष्ण धारा असलेला, त्यांच्या युक्तिवादाचा तर्कशुद्ध दुधारी पट्टा प्रतिपक्षाला ' काळा ' सारखा वाटे. परकी सत्तेला ' काळा ' सारखी भासणारी तरुण स्वातंत्र्यवीरांची संघटना, या शतकाच्या प्रारंभीं महाराष्ट्रांत प्रथमतः निर्माण करण्याचें श्रेय कै. परांजपे यांच्या लेखनाला आहे, एवढें सांगितलें म्हणजे तें किती तेजस्वी असलें पाहिजे याची सहज कल्पना येईल. व या तेजस्वी वाङ्मयाला अनेक वर्षांचा बंदीवास कां घडला तेंहि समजेल. कै. परांजपे हे असामान्य वक्ते होते. त्यांचें लेखनहि वक्तृत्वपूर्ण आहे. त्यांचे निबंध वाचताना आपण त्यांचें व्याख्यान ऐकत आहों असें वाटतें, आणि त्यांची भव्यमूर्ति आपणासमोर उभी राहाते. त्यांच्या वाङ्मयाचे हे बहुमोल विशेष प्रस्तुत संग्रहांतहि जागोजाग आढळून येतील.

आपल्या देशाचें स्वातंत्र्य नष्ट झालें आहे व त्यामुळें देशाची दुर्दशा झाली आहे याची जाणीव कै. परांजपे यांना विद्यार्थिदशेंतच झाली होती. डेक्कन

कॉलेजांत असतांना ते नेहमीं खिन्न दिसत असत, असें दे. भ. गंगाधररावजी देशपांडे यांनीं लिहिलें आहे. त्यांच्या खिन्नतेचें कारण या संग्रहांतील "डेक्कन कॉलेज" पाहू. केशवरावांच्या मनांत आलेले विचार या निबंधांत पाहावयास सांपडतील. त्यांच्या तरल प्रतिभेला भूतकालीन स्वातंत्र्य स्पष्ट दिसे. त्या स्वातंत्र्याचे अवशेष असे जे उंच उंच किल्ले, त्यांचे पडके तट, व तेथील दगडहि त्यांना गतस्वातंत्र्याच्या कथा सांगत आणि हें स्वातंत्र्य परत मिळविण्याला आधुनिक शिक्षण आपणांस समर्थ करीत नाहीं याचें त्यांना वाईट वाटे. त्यावेळीं त्यांच्या जिवाची झालेली कालवाकालव आणि तडफड या निबंधांत व्यक्त झाली आहे. "आपल्या लोकांची दीन हीन आणि परावलंबी अवस्था त्यांच्या मनाला विंचवासारखी चावूं लागे; व आपल्या लोकांच्या हल्लींच्या दारिद्र्यामुळें त्यांना दाही दिशा उदास भासत; त्यांचा कंठ दाटून येई, डोळे पाण्यानें भरून येत." "ज्या लढाईनें पेशव्यांची पेशवाई बहुतेक नामशेष झाली ती खडकीची लढाई डेक्कन कॉलेजच्या आसपासच लढली गेली. त्या लढाईत आशा अपरिपूर्ण राहून पडलेले शूर लोक अजूनहि तेथें पिशाच्च रूपानें हिंडत असतील. त्यांचीं भयंकर स्वरूपें माझ्या डोळ्यांपुढें दिसतात. मीं कोठेंहि जाऊन कोणतेंहि ठिकाण पाहिलें तरी तेथील वैभव नाहींसें झालेलें आणि संपत्ति लयाला गेलेलीच माझ्या दृष्टीस पडते. संपत्ति गेल्यामुळें भिकार झालेलीं शहरें आणि वैभव गेल्यामुळें उजाड झालेलीं गांवें हीं सर्व मला या कॉलेजनेंच दाखवून दिलीं. ह्यानें मला ह्या गोष्टी सांगितल्या नसत्या तर रायगड, पुणें, सातारा, विजापूर, आग्रा, दिल्ली या ठिकाणांतून पूर्वीचे दगड, विटा, चुना, लांकडें हीं कायम असलीं, तरी तेथून कांहीं तरी नाहींसें झालें आहे असें मला कशास वाटलें असतें?" केशवरावांच्या तोंडीं घातलेले हे उद्‌गार स्वतः शिवरामपंतांचीच मनःस्थिति व्यक्त करीत आहेत, यांत संशय नाहीं. हें जें "कांहीं तरी नाहींसें झालें आहे" तें परत आणण्याचें सामर्थ्य, प्रचलित शिक्षण-पद्धति विद्यार्थ्यांना देत नसल्यामुळें त्यांनीं कॉलेजांत मिळणाऱ्या ज्ञानाला "पंगु" म्हणावें हें स्वाभाविक आहे. "गंगोत्रीपासून कन्याकुमारीपर्यंतचा सर्व हिंदुस्थान देश हा तुझा आहे. या देशांत अपार संपत्ति पूर्वी होती व अजूनहि आहे व ती सर्व तुझी आहे," असें या कॉलेजनें शिकविलें, पण तो देश व ती संपत्ति हस्तगत करण्याचें

सामर्थ्य मात्र दिलें नाहीं, या ा त्यांना खेद वाटे. "कोणी कोठेंहि शिकलेला असो, सर्वांचे हातपाय ारखं ाच रीतीनें बांधले गेलेले आहेत ते त्यांना कांहीं नियामित मर्यादेपर्यंतच हालवितां येतात; त्याच्या प ीकडे त्यांना कांहींएक करतां येत नाहीं; अशी स्थिति असल्यामुळें या कॉलेजच्या शिक्षणापासून तादृश फायदा होणें तर लांबच राहिलें, पण उलट एक मोठा थोरला तोटा मात्र होतो. या देशांत दिल ा जाणाऱ्या 'नामधारी', 'उच्च' प९ु तरुणांना 'पंगु' बनविणाऱ्या शिक्षणावर कै. शिवरामपंतांनीं ओढलेले हे कोरड यथार्थ नाहींत असें कोण म्हणेल? या शिक्षणानें आम्ही नुसते पंगु बनलों नाहीं, तर "या कॉलेजच्या ज्ञानानें आम्हांला नास्तिक आणि धर्मभ्रष्ट मात्र केलें आहे. दुसऱ्यांची उन्नतावस्था डोळ्यापुढें मांडून ती संपादन कर ाच्या अशक्यतेमुळें आमच्या मनांत त्यानें निराशा मात्र उत्पन्न केली आहे. डोळे आहेत पण हात नाहींत. आणि ज्ञान आहे पण कर्तृत्वशक्ति नाहीं. अशा स्थितींतील ते डोळे व तें ज्ञान नुसतें घेऊन काय करावयाचें आहे?"

या पंगु आणि कर्तृत्वशून्य शिक्षितांच्या चळवळींची मर्यादा, परकी सत्तेचा लष्करी सोटा बाहेर निघाला नाहीं तोंपर्यंतच असते. पण स्वतःची लायकी आणि मर्यादा न ओळखणारे हे नामधारी सुशिक्षित स्वधर्माची आणि स्वकीय सामाजिक संस्थांची निंदा करतांना पाहिलें म्हणजे शिवरामपंतांना चीड येत असे. त्यामुळें त्यांच्यावर टीका करण्याची संधि ते वायां दवडीत नसत. अनेक जुलुमी कारकीर्दी होऊन गेल्या असतां या देशांतील लोकांच्या अंगीं जे सद्गुण अद्यापि कायम आहेत, त्याला कारण हिंदु लोकांतील जातिभेद वगैरे चांगल्या संस्था आहेत असें माल्कमसाहेबांना वाटावें, "पण आमच्या सुधारकांना या संस्थांत कांहीं अर्थ वाटूं नये," याबद्दल त्यांनीं चमत्कार व्यक्त केला आहे. प्रत्येक समाजांत कांहीं उपयुक्त निबंधनें असतात, "तशीं तीं आपल्याहि समाजांत आहेत व सुधारकवीर हातांत इंग्रजी कुऱ्हाडी घेऊन आपल्या समाजांतील इतर निबंधनांप्रमाणें ह्यांना तोडीपर्यंत तीं कायमहि राहतील," अशी भीतियुक्त आशा त्यांनीं व्यक्त केली आहे.

*स्वधर्माचा यथार्थ अभिमान बाळगणाऱ्या शिवरामपंतांना श्रीरामजयंतीच्या* उत्सवांतील रहस्य स्पष्टपणें दिसलें व तें त्यांनीं या संग्रहांतील

पहिल्याच निबंधांत उत्कृष्ट रीतीनें लोकांच्या निदर्शनास आणलें आहे. श्रीराम आणि श्रीकृष्ण हे शूर क्षत्रिय, आमचे राष्ट्र-पुरुष आहेत. अन्यायी व जुलुमी राजांशीं झगडून या देशांतील लोकांना त्यांनीं उपकृत केलें आहे. कृतज्ञता व्यक्त करण्याकरितांच केवळ नव्हे तर त्यांच्या चरित्रांपासून स्फूर्ति मिळविण्याकरितांहि त्यांचे उत्सव केले जातात. एकनाथ आणि रामदास यांनीं हें ओळखलें होतें, म्हणूनच त्यांनीं रामायणावर मराठींत ग्रंथरचना केली. रामदासांनीं तर "रामें बंदीशाळा फोडियेल्या" असें पुनः पुनः सांगून या बंदीशाळेंत पडलेल्या देवांना रामानें मुक्त केलें, याबद्दल त्याचा गौरव केला आहे. "श्रीरामचंद्राचीं सर्वच कृत्यें लोकोत्तर होतीं. परंतु त्यांतल्या त्यांत त्यानें रावणाला मारलें, हें कृत्य अतिशयच लोकोत्तर होतें." "रावणासारख्या बलाढ्य पण दुष्ट व जुलुमी राजाला रामानें मारलें." म्हणून त्याचा उत्सव लोक करीत आले आहेत, असें शिवरामपंतांचें मत आहे. रावण हा जुलुमी राजा होता हें सांगतांना, "जुलुमी राजांचा हा स्वभावच कीं, ज्यांनीं त्यांना कधीं काडीइतकाहि त्रास दिला नसेल, अशा निरपराधी गरीब लोकांवरहि ते आपल्या जुलुमी अंमलाची पराकाष्ठा करावयाचे"... "जितके दुबळे राजे तितके जुलुमी राजाचें भक्ष्य" हा सिद्धान्त त्यांनीं सांगितला आहे. पण त्याबरोबरच, "जेव्हां कोणी अन्यायी बुद्धीचा बलाढ्य राजा असेल, तेव्हां इतरांनीं त्याच्यापेक्षां दुर्बल राहून उपयोगी नाहीं तर त्याच्यापेक्षां बलाढ्यच झालें पाहिजे," हा उपसिद्धान्त सांगण्यासहि ते विसरले नाहींत; किंबहुना तो सांगण्याकरितांच रामजयंतीचें रहस्य त्यांनीं सांगितलें आहे. "यतो धर्मस्ततो जयः।" हें तत्त्व बाजूला पडून जुलमी राजे कांहीं काळ विजयी झाले तरी, "ज्याला कडेलोटाची शिक्षा द्यावयाची असेल त्याला पहिल्यानें कड्याच्या शिखरावर उंच चढविलेंच पाहिजे," या न्यायानें ते विजय त्यांना मिळत असतात. तें त्यांच्या लक्षांत येत नाहीं. पण जेव्हां "अन्यायाची टेकडी पूर्ण चढली जाते व तो खोल तुटलेला कडा जेव्हां जुलुमी राजांच्या दृष्टीस पडतो तेव्हां त्यांचे डोळे फाटून जातात व आपण देवाच्या मर्जीतले.... परमेश्वराच्या इच्छेनुरूप आपण याला मारिलें व त्याच्या मुलुखावर राज्य केलें, इत्यादि मूर्ख लोकांना फसविण्याकरितां केलेल्या वल्गना आतां उपयोगी पडावयाच्या नाहींत असें समजून त्यांच्या-

साठीं केलेल्या ए.द्धयांत ते आपला देह मुकाट्यानें टाकीत असतात." वरील उपसिद्धान्त जर लोक नीट लक्ष त घेतील तर जुलमी राजांचें भवितव्य ठरलेलें आहे असें सांगून लोक त आशावाद निर्माण करण्याचा यशस्वी प्रयत्न आपल्या ओजस्वी भाषेनें शिवरामपंतांनीं या ठिकाणीं के. ग आहे, हें सहज लक्षांत येईल.

"नीतिशास्त्राचे नियम दुर्बळ लोक पाळतात म्हणून ते गुलाम होतात आणि सबळ लोक मोडतात म्हणून ते राजे होऊन" एखाद्या ब्रह्मसमंधा-प्रमाणे लोकांच्या मानगुटीस बसतात. "पूर्वी परराज्याक्रमण हें शौर्य प्रदर्शनासाठीं असे. पण आतांच्या जिंकणारांची एकदां मिठी बसली म्हणजे ती मगरमिठीच. ती सुटायची नाहींच. उलट ती उत्तरोत्तर अधिक घट्ट कशी होत जाईल याचेच विचार चालावयाचे." राजकारणांतील हा सनातन सिद्धांत शिवरामपंतांनीं परकी सत्तेची भीषणता लोकांना समजावी म्हणून सांगितला असला तरी त्यांतूनहि बाहेर पडण्याचे मार्ग ते लोकांना सुचवीत होते. मोठमोठीं साम्राज्येंहि शेवटीं लयाला जातात. त्यांतून ब्रिटिश साम्राज्य एवढें अवाढव्य पसरलें आहे कीं, एका ब्रिटिशाला दहा ब्रिटिशेतर असें प्रमाण झाल्यामुळें त्याला मोठा धोका निर्माण झाला आहे. संख्येनें ब्रिटिशांपेक्षां त्याच्या साम्राज्यांतील ब्रिटिशेतर अधिक आहेत, हा एक परतंत्र लोकांना आशादायक वाटणारा विचार आहे. "एक जिंकणारा आणि दहा जिंकलेले म्हणजे एकाला दहा शत्रु असा अर्थ होतो." साम्राज्याची ही अवाढव्य इमारत "पायाच्या बाहेर शिखराचा घेर जाणाऱ्या मनोऱ्यासारखी" असल्यामुळें "तिला कोणता सोसाट्याचा वारा केव्हां खालीं पाडील याचा नियम नाहीं." परतंत्र लोकांच्या मनांत सदैव धुमसत राहाणारा असंतोष कृतिरूपानें प्रकट होणें हाच हा सोसाटयाचा वारा होय, हें उघड आहे. परतंत्र लोकांना आपलें स्वातंत्र्य गेलें याचा कधीं तरी आनंद होईल काय ? "असें कधींहि व्हावयाचें नाहीं. हें सृष्टिनियमाच्या आणि मनुष्यस्वभावाच्या विरुद्ध आहे. ते बाहेरून हंसतांना आंतून जळत असतील, बाहेरून मान वाकवितांना आंतून त्यांचें हृदय दुभंग होत असेल, ते राजनिष्ठेची नवीन शपथ घेत असतांना त्यांना आपल्या जुन्या स्वतंत्रतेची आठवण होत असेल व आपलीं शस्त्रें इंग्रजांच्या स्वाधीन करण्याकरितां आपल्या हातांतून खालीं ठेवीत असतांना हीं आपण

फिरून केव्हां हातीं घेऊं असें त्यांना वाटत असेल." एखादा तोंडपुजा हंसला म्हणजे साऱ्या राष्ट्राच्या अंतःकरणांत आनंद आहे असें होतें काय ?" अशा रीतीच्या जोरदार शब्दांनीं एका प्रबल साम्राज्याच्या मगरमिठींत सांपडलेल्या या देशांतील लोकांच्या मनांत सुरू असलेला स्वातंत्र्यभावनेचा स्फुलिंग शिवरामपंत प्रज्वलित करीत होते.

इंग्लंडच्या साम्राज्याची व राज्यविस्ताराची प्रचंड लाट हिमालयाच्याहि डोक्यावरून गेली असली तरी तिला प्रतिस्पर्धी अशी क्रांतीची लाट हळूहळू उत्पन्न होत आहे, असें त्यांच्या सूक्ष्म दृष्टीला दिसूं लागलें होतें. त्यांच्या या महनीय द्रष्ट्यानें या लाटेचें जें वर्णन केलें आहे, तें त्यांच्या प्रतिभेला शोभणारें आणि निराश व मृतप्राय लोकांनाहि आशा व चैतन्य देणारें आहे. ते म्हणतात : 'क्रांतीची ही नवी लाट हळूहळू वाढत जाऊन ती डोंगराएवढी–पर्वताएवढी–उंच बनणार....... ती लाट मोठी होण्यापूर्वी पहिल्या लाटेनें–साम्राज्यानें–सावध व्हावें हें बरें. नाहींतर ही नवीन जोमाची नवीन लाट एकदां पूर्णपणें पोसली जाऊन पृथ्वीच्या पृष्ठभागावर गडबडा लोळूं लागली म्हणजे तिच्या खालीं काय काय चेंगरून जाईल हें कोणाला माहीत आहे ? ...... या दोन लाटा निरनिराळ्या दिशेनें वाहणाऱ्या वाऱ्यानें खवळून आणि चवताळून जेव्हां एकमेकांच्या अंगावर धांवून जातील आणि जेव्हां त्यांची टक्कर होईल तेव्हां त्यांचे तुषार किती लांब व किती उंच उडतील याची कोणाला कल्पना करतां येणार आहे ? या दोन लाटांचें जेव्हां मल्लयुद्ध जुंपेल तेव्हांचा तो प्रसंग फारच गंभीर आणि भयंकर होईल, यांत संशय नाहीं."

पारतंत्र्यामुळें आपल्या देशाची अनेक गोष्टींत कशी दुर्दशा झाली आहे याचें वर्णन शिवरामपंतांनीं अनेक निबंधांतून केलें आहे. हिंदुस्थानांतील दुष्काळ वस्तुतः पारतंत्र्यामुळें पडतो हें अनेक दृष्टान्तांनीं त्यांनीं दाखविलें आहे. शंभर कोटि उत्पन्नातील कमींत कमी वीस कोटी रुपये दरवर्षी इंग्लंडला जातात, "ह्याशिवाय इंग्लंडचे लोक येथें येऊन नेटिवांच्या तोंडचें काढून त्यावर आपली चैन चालवितात ती निराळीच ... परकीय राजांची अतोनात खर्चाची राज्यपद्धत हेंच दुष्काळाचें अनेक मुख्य कारणांपैकीं एक असतांना, त्याच सरकारनें कमिशन नेमून दुष्काळाच्या कारणांची चौकशी

करणें हास्यास्पद आहे, याचें शिवरामपंतांनीं केलेलें वर्णन त्यांच्या अनुपम लेखनशैलीची साक्ष देणारें आहे. कारण उघड असतांना त्याकरितां कमिशनें नेमणाऱ्या सरकारचा ढोंगीपणा व निर्लज्जपणा त्यांनीं अनेक उदाहरणांनीं स्पष्ट केला आहे. दुसऱ्याच्या भाकरींतील निम्मी भाकरी रोज खाऊन उलट त्यालाच " तात्या, आतांशा तुम्ही अगदीं रोड कां बरें दिसत चाललां " असें विचारणें, किंवा रेल्वेच्या डब्यांत दुसऱ्याच्या जागेवर बसून उलट त्यालाच " कां हो तात्या, तुम्हांला उभें रहावें लागतें याचें कारण काय बरें असावें ? अलीकडे या आगगाड्यांचे डबे फार लहान करूं लागले आहेत, हें याचें कारण आहे काय ? असें विचारणें, किंवा दुसऱ्याच्या छत्रींत शिरून उलट त्यालाच " अरेरे ! काय हो हें तात्या ! तुमचें सारें अंग कीं हो पावसानें भिजविलें आहे ! याचें काय बरें कारण असावें ?... अलीकडे पाऊस आकाशांतून खालीं न पडतां जमिनींतून तर वर येत नसेलना ?" असें विचारणें, आणि दुष्काळाच्या कारणांची चौकशी करण्याकरितां कमिशने नेमणें सारखेंच ढोंगीपणाचें आहे. हें वाचकांच्या निदर्शनाला आणतांना उपहासाचें शस्त्र त्यांनीं उत्कृष्ट रीतीनें वापरलें आहे. आणि शेवटीं " हिंदुस्थानांत येऊन लक्षावधि इंग्रज लोक आम्हांला वाटेकरी झाले नसते तर आमची भाजी भाकरी आम्हांला पुरली असती, " असें स्पष्ट सांगितलें आहे.

किरकोळ हक्क दिल्यासारखें दाखवून, स्वातंत्र्याचा हक्क हिरावून घेण्याची राजकर्त्यांची युक्ति त्यांनीं लोकांच्या स्पष्ट निदर्शनास आणली. मुद्रणस्वातंत्र्य मिळाल्याबद्दल आनंद मानणाऱ्या मूर्ख लोकांना ते विचारतात : " या मुद्रणस्वातंत्र्याबद्दल आपल्याला किती किंमत द्यावी लागली आहे याची कोणाला कल्पना आहे काय ? आपलें स्वातंत्र्य गेलें आणि आपल्याला मुद्रणस्वातंत्र्य मिळालें अशी वस्तुस्थिति नाहीं काय ?...याबद्दल आपण आनंद मानणें म्हणजे आपल्या हातचा कोहळा गमावून त्याच्या जागीं आपण आंवळा संपादन केल्याबद्दल आनंद प्रदर्शित करण्यासारखेंच नव्हे काय ? "

सशस्त्र लोकांना मुद्रणस्वातंत्र्याचें महत्त्व आहे. त्यांच्या लिहिण्याप्रमाणें तजवीज केली नाहीं तर ते शस्त्रांचा उपयोग करतील अशी सरकारला भीति

असते. "पण ज्या देशांतील लोकांच्या हातचीं शस्त्रें काढून घेतलीं आहेत" त्यांच्याबद्दल अशी भीति नसल्यामुळें त्यांना मुद्रणस्वातंत्र्य मिळालें तरी त्याचा काय उपयोग ? "निःशस्त्र लोकांना बडबडण्याची परवानगी देणें आणि दांत पाडलेल्या सापाला फोफावण्याची परवानगी देणें, हीं दोन्हीं सारखींच." एखादा लहानसहान अधिकार मिळाल्यानें हुरळून न जातां आपलें स्वातंत्र्य नष्ट झालें आहे व एखाद्या पराभूत राष्ट्राप्रमाणें आपल्याला निःशस्त्र करण्यांत आलेलें आहे, ही गोष्ट लोकांनीं कधींहि विसरूं नये. स्वातंत्र्याच्या प्रमुख ध्येयावर त्यांची दृष्टि अविचलित राहावी याची शिवरामपंत किती काळजी घेत, हें यावरून दिसून येईल.

'रोजिस्ट्रेशन अथवा सरकारच्या सचोटीच्या किरकोळ विक्रीचें दुकान' या उपरोधपूर्ण लेखांत स्वातंत्र्याचें ध्येय गांठण्याचा एक महत्त्वाचा मार्ग त्यांनीं सुचविला आहे. "प्लाशीच्या लढाईच्या आधीं 'तांबडा व पांढरा' असे दोन कागद तयार करणाऱ्या, अयोध्येच्या अनाथ बेगमांवर पैशासाठीं अन्यायानें जुलूम करणाऱ्या इंग्रजावर, आपल्याच तोंडानें 'आम्ही प्रामाणिक, विश्वासू आणि निःपक्षपाती आहों असें सांगण्याची पाळी यावी" अशी औपरोधिक टीका करून ते म्हणतात : सरकारनें आपली सचोटी "विक्रीसाठीं बाजारांत ठेवावी, ही मात्र दुःखाची गोष्ट आहे. समुद्राचें पाणी वाळवून त्याचें मीठ पाहिजे त्याला करतां आलें असतें पण सरकार लोकांना म्हणतें कीं, तें तुम्ही कोणी वाळवूं नका. हें म्हणणें जसें अन्यायाचें आहे, तसेंच रेजिस्ट्रेशनच्या बाबतींतहि सरकारचें म्हणणें अन्यायाचें आहे. प्रामाणिकपणा ही चीज लोकांपाशीं पुष्कळ असतां त्यांस सांगावयाचें कीं, रेजिस्ट्रेशनच्या बाबतींत तुम्ही आपल्या प्रामाणिकपणाचा उपयोग करतां कामा नये, तर तेथें आम्हीच आपला प्रामाणिकपणा उपयोगांत आणूं आणि त्याबद्दल तुम्ही आम्हांला पैसे दिले पाहिजेत, हें म्हणणें बरोबर नाहीं."... "सर्व लोकांनीं आमच्याच दुकानांतून सचोटी विकत घ्यावी असा हुकूम करणें हें शुद्ध दांडगाईचें आणि पाजीपणाचें लक्षण आहे." रोजिस्ट्रेशन म्हणजे दोन पक्षकारांत झालेल्या ठरावाची लेखी नोंद, ती ज्याच्याकडे करावयाची त्याच्यावर दोन्ही पक्षांचा विश्वास असला म्हणजे झालें. हा विश्वासू मनुष्य सरकारनेंच नेमलेला असला पाहिजे असा निर्बंध असण्याचें वस्तुतः कारण

नाहीं. अशा स्थितींत, " या देशांतील लोक अन्नाला महाग झाले असतां एकाच इलाख्यांतील लोकांपासून सरकारनें दोन तीन लक्ष रुपये दरसाल सचोटीच्या व्यापारावर उकळावेत, हें अश्लाघ्य होय." यावर उपाय म्हणजे लवादकोर्टाप्रमाणें " या रोजिस्ट्रेशनसंबंधाची कांहीं व्यवस्था आपसामध्येंच लोकांनीं केली तर ती जुळणें अशक्य आहे असें नाहीं. आपल्या हातांत घेऊन चालवितां येतील अशा पुष्कळ संस्था सरकारच्या हातीं आज आहेत त्या सरकारच्या हातून आपण आपल्याकडे घेतल्यास त्यांत आपला फायदा आहे. कांहीं ठिकाणीं हल्लीं सरकारचे रोजिस्ट्रार आहेत. त्यांच्या ऐवजीं लोकांनीं आपले वतीनें निराळे इसम नेमून व्यवस्था केल्यास ती अगदीं कमी खर्चानें व अधिक फायद्यानें पार पडण्याचा संभव आहे." मीठ तयार करण्याचा लोकांचा नैसर्गिक हक्क स्थापन करण्याकरितां म. गांधींनीं मिठाचा कायदा तोडला व प्रतिसरकार ( पत्रीसरकार नव्हे ) स्थापण्याचा प्रयोगहि परवांच्या चळवळींत झाला. या दोन्ही चळवळींची सूचना शिवराम-पंतांनी वरील लेखांत केलेली पाहिली म्हणजे त्यांच्या राजकारणांतील दूर-दर्शित्वाची कल्पना येते. आपल्या लोकांनीं पोलिस खात्यांत शिरूं नये, हें सांगतांना असहकाराची कल्पनाहि त्यांनीं लोकांना दिलेली आहे. " गोविंद-पंतांच्या पत्रां"त ते लिहितात : " खरें शौर्य, खरें धैर्य, खरें तेज हीं या पोलिसच्या शिपाईगिरींत नाहींत...पोलिस म्हणजे निःशस्त्र केलेल्या प्रजेला दाबांत ठेवण्यासाठीं योजलेले सशस्त्रलोक होत. ह्यांना खरे शूर शिपाई कसे म्हणावें, तूंच सांग बरें!......तूं आपल्या हातांत शस्त्र घेऊन इतर निःशस्त्र लोकांना घायाळ किंवा ठार करण्याला कधींहि उद्युक्त होऊं नकोस." पोलिसांना हा अप्रत्यक्ष उपदेश जसा त्यांनीं केला आहे, त्याचप्रमाणें आपल्या पुढाऱ्यांना झालेल्या शिक्षा निर्विकार मनानें पाहाणाऱ्या व सहन करणाऱ्या लोकांवरहि त्यांनीं कडक टीका केली आहे. चीनमधील बॉक्सर लोकांच्या बारा पुढाऱ्यांना देहान्तशासन दिलें गेलें. त्यांना प्रत्यक्ष फांशी देत असतांना पाहाण्याकरितां चिनी लोकांची गर्दी जमली होती, हें वृत्त ऐकून संतप्त झालेले शिवरामपंत म्हणतात : सर्व चीन देश जर युरोपियन राष्ट्राच्या विरुद्ध लढाई देण्यासाठीं उठला होता, " तर न्यायखात्याचा चिनी मुख्य अधिकारी चीन सरकारच्या तर्फेनें सदर बॉक्सर पुढाऱ्यांना देहांतशासनाच्य

शिक्षेचा हुकूम वाचून दाखविण्यासाठीं येतो याचा अर्थ काय ? ...... पण हेंहि असो. चिनी सरकारला...तसें करणें भागहि पडलें असेल. परंतु कदाचित् बॉक्सर पुढाऱ्यांचीं डोकीं उडविण्याच्या वेळां तमाशा पाहणाऱ्या चिनी लोकांची इतकी गर्दी कशाला ? तो तमाशा होता काय ? आपल्या पुढाऱ्यांना मारलेले पाहाणें, हा जर तमाशा म्हणून चिनी लोकांना वाटत असेल तर चिनी लोकांनों, तुमच्या अभ्युदयाचे दिवस आमच्यासारखेच अजून फार लांब आहेत. ज्या गोष्टी नुसत्या ऐकल्यापासून तुमचीं मनें होरपळून जावयास पाहिजे होतीं, त्या गोष्टी प्रत्यक्ष आपल्या डोळयांनीं पाहाण्यासाठीं तुम्ही घरावर चढतां, ह्यापेक्षां राष्ट्राच्या पतित अवस्थेबद्दल दुसरें प्रमाण काय पाहिजे ? ......आपल्या पुढाऱ्याचा प्राणान्त हा ज्यांचा तमाशा ते लोक गुलामगिरीला आणि परकियांकडून चिरडले जाण्यालाच योग्य." लोकांच्या नेभळटपणाबद्दल आणि स्वाभिमानशून्यतेबद्दल चिडून जाऊन शिवरामपंतांनीं काढलेल्या या उद्‌गारात केवढा मोठा अर्थ व केवढी मोठी सूचना आहे हें चाणाक्ष वाचकांच्या सहज लक्षांत येईल. आपल्या देशाच्या स्वातंत्र्याकरितां लढणाऱ्या देशभक्तांना आपल्याच न्यायाधीशानीं शिक्षा द्यावी व ती अंमलांत आणतांना आपल्याच लोकांनीं स्वस्थपणें पाहावी, या गोष्टीतील निर्लज्जपणा व भ्याडपणा लोकांच्या नजरेस शिवरामपंतांनीं एवढ्याच उद्देशानें आणला आहे कीं, अशा गोष्टींची पुनरावृत्ति या देशांत न व्हावी. स्वातंत्र्यप्राप्तीचीं हीं परिणामकारक साधनें पंचेचाळीस वर्षांपूर्वी सांगणारे शिवरामपंत परांजपे हे एकटेच धाडसी आणि कुशल राजकीय पुढारी होते व म्हणूनच निर्भेळ राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या द्रष्टेपणाचा मान त्यांना यथार्थपणें मिळाला आहे.

या देशांतील संस्थानिकांकडेहि त्यांचें पूर्ण लक्ष होतें. या देशाचे ते महत्त्वाचे घटक आहेत व या देशाच्या स्वातंत्र्याच्या मार्गांत ते साहाय्यक किंवा विरोधी होऊं शकतात हें त्यांच्या दूरदृष्टीला दिसत असल्यामुळें, त्यांनीं संस्थानिकांच्या दुर्गुणांवर कोरडे ओढण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं. 'शिंदे सरकार आणि इंग्रज सरकार' व 'काबूलच्या अमीरासंबंधीं कांहीं गोष्टी' हे दोन्ही लेख आजहि संस्थानिकांनीं मनन करण्यासारखे आहेत. हिंदुस्थानांत दुष्काळ पडला असतां, चीनच्या लढाईत इंग्रजांना मदत

करण्याकरितां शिंदे सरकार पुढें आलें व एक हॉस्पिटलशिपच्या खर्चासाठीं वीस लक्ष रुपये देण्याचें त्यांनीं अभिवचन दिलें याबद्दल शिवरामपंतांनीं कडक टीका केली आहे. " दुष्काळांत लोकांना मदत करणारांवर सरकारचा इतका कडक डोळा असतो असें दृष्टोत्पत्तीस आल्यावर कोणत्या मळमळीत महाराजांची दुष्काळपीडितांना मदत करण्याची छाती होणार आहे ?...... ह्या एक दोन वर्षांत आमच्या इंग्रजांच्या घरीं मंगलकार्यें बरींच निघालीं. ......ह्या ट्रान्सव्हालच्या, चीनच्या वगैरे मंगलकार्यांत त्यांना भिक्षावळ घालून त्यांच्या पायांचें तीर्थ घेऊन आपण पुनीत व्हावें असें त्यांचे आप्त-सोयरे वगैरे जे हिंदुस्थानचे राजे त्यांना नेहमीं वाटत असतें." ...... ही वाईट संवय त्यांना इंग्रजांनींच लावून दिली. इंग्रजांनीं चांगल्याबरोबर वाईट गोष्टीहि केल्या. " त्या सर्वांत वाईट ही आहे कीं, इंग्रजांनीं हिंदुस्थानांतील राजांना आणि लोकांना तोंडपुजेपणात पहिला नंबर मिळविण्याच्या नादीं वाजवीपेक्षां फाजील लाविलें आहे. त्याचा हा सर्व परिणाम आहे." हिंदुस्थानांतील राजांनीं व लोकांनीं इंग्रजांचा तोंडपुजेपणा सोडून स्वाभिमान धारण करावा, यावर शिवरामपंतांचा सारा कटाक्ष आहे.

हिंदुस्थानांतील वरिष्ठ नोकऱ्या हें साहेब लोकांचें राखीव कुरण आहे. सिव्हिल सर्व्हिसमध्यें नेटिव लोकांना नेमलें तर खासगी मनोविकार जागृत होतील व कारस्थानें माजतील म्हणून त्या जागांवर परकीय लोकच नेमले पाहिजेत, या तत्त्वाविषयीं शिवरामपंत औपरोधिकपणें लिहितात : "ज्याला इंग्लिश कलेक्टर मिळाले आहेत तें आमचें हिंदुस्थान खरोखरच भाग्यवान् समजलें पाहिजे... पण आमचे डोळे इंग्लंडकडे गेले म्हणजे आमचें काळीज अगदीं चर्र होऊन जातें. हाय हाय ! ... इंग्लंडांत पाहावें तों इंग्लिशच कलेक्टर, डॉक्टर व इंजिनिअर ! शिव शिव ! तेथील या अधिकाऱ्यांचे मनो-विकार किती खळबळत असतील, तेथें कारस्थानाचे किती घोटाळे माजत असतील..." याला उपाय म्हणून, हिंदुस्थानांत जसे इंग्लिश अधिकारी नेमतां तसे इंग्लंडांत हिन्दी अधिकारी कां नेमीत नाहीं ! असें शिवराम-पंतांनीं साहेबांना विचारलें आहे. तसेंच साहेबाचें नेटिवावर निष्कारण व निर्हेतुक प्रेम कधींच असणें शक्य नाहीं. " हिंदुस्थानच्या आखाड्यांत नेटिव खालती आणि साहेब त्यांच्या छातीवरती अशी ही पकड नेहमीं कायम

राहावी म्हणून हे सर्व पेच चाललेले आहेत." हा सनातन सिद्धांत हिन्दी लोकांना त्यांनीं सांगितला आहे.

युरोपिअन लोकांनीं नेटिवांचें अनुकरण न करतां आपला युरोपिअनपणा कायम राखला पाहिजे, या माल्कमसाहेबांच्या उपदेशाला उद्देशून ते हिन्दी लोकांना म्हणतात, "जर साहेबलोकांनीं नेटिवांचें अनुकरण करूं नये, तर हे नेटिवा, तूं तरी साहेबांचें अनुकरण कशाला करतोस...जर साहेब धोतर नेसत नाहीं, तर नेटिवा, तूं तरी इजार कशाला घालतोस?" साहेब आपल्या-बरोबर खेळतात, घरीं येतात हा कित्येकांना मान वाटतो. पण तें खरें नाहीं. "वेड्याच्या पायांत जरी वास्तविक खोडा घातला असला...तरी तो म्हणतो मला हा घोडाच बसावयास दिला आहे." साहेबाच्या पोटांतील भाव निराळाच असतो, हें भोळ्या हिन्दी लोकांच्या लक्षांत येत नाहीं.

'इंडिअन डोमेस्टिक सर्व्हिस' या लेखांत उपरोधाचें आणि उपहासाचें दुधारी शस्त्र त्यानीं कमालीच्या कौशल्यानें चालविलें आहे. इंडिअन सिव्हिल सर्व्हिस, इं. मिलिटरी सर्व्हिस, इं. मेडिकल सर्व्हिस या प्रख्यात खात्यां-प्रमाणेंच इं. डोमेस्टिक सर्व्हिस हें खातें आहे. या खात्यामध्यें सैंपाक करणें, कपडे धुणें, मुलांना खेळविणें, घोड्यांचा खरारा करणें, गाडी हांकणें, केर काढणें, दिवाबत्ती करणें वगैरे गोष्टींचा समावेश होतो. त्यांतील मुख्य मुख्य हुद्यांवरील लोक म्हणजे बटलर, बबर्जी, साइस, कोचमन, भिस्ती, माळी, झाडूवाला, पट्टेवाला, आया वगैरे होत. पहिल्या तीन सर्व्हिसेस युरोपिअन लोकांकरितां राखून ठेवल्या असल्या तरी सगळयाच सर्व्हिसेस त्यांच्याकरितां राखून ठेवल्या आहेत हा आक्षेप किती खोटा आहे! इंडिअन डोमेस्टिक सर्व्हिस ही सबंध इंडियनांकरितां राखून ठेविली नाहीं काय? मग विनाकारण दोष काय म्हणून द्यावा, असें औपरोधिकपणें शिवरामपंतांनीं विचारलें आहे. सिव्हिल सर्व्हंट जशी C. S. ही पदवी लावतात त्याप्रमाणें प्रत्येक बबर्जी व कोचमन आपल्या नांवापुढें D. S. ही पदवी लावूं लागेल कीं काय अशी भीति वाटूं लागली आहे. "इतक्या झपाट्यानें ह्या डोमेस्टिक सर्व्हिसबद्दलच्या अभिमानाची वाढ होत चालली आहे हें हिंदुस्थानच्या दिवसेंदिवस होत चाललेल्या उत्कर्षाचें लहानसहान चिन्ह आहे असें नव्हे." पण ही डोमेस्टिक सर्व्हिसहि इंडियन लोकांना बंद करावी असा साहेबांचा प्रयत्न चालू आहे, असें सांगून शिवराम-

पंत विचारतात, " असें झालें तर, हे नेटिवांनो, मग तुम्हाला कोणती सर्व्हिस उघडी आहे ? "

तात्पर्य, या देशांतील लोकांना परिस्थितीचें यथार्थ ज्ञान करून देऊन स्वाभिमान व स्वदेशाभिमान बाळगण्यास शिवरामपंतांनीं शिकाविलें. " इंग्लिश लोक या देशाचे राजे झाले आहेत म्हणून आम्हीं आमच्या देशाचा अभिमान बाळगूं नये, हें शास्त्र कोठलें ? व हें कोण ऐकणार ?...हा अभिमान अगदीं नैसर्गिक आहे व तो राजद्रोहाच्या धमकावणीनें कोणाला कधींहि बंद पाडतां यावयाचा नाहीं...आमचा देश तर तुम्हीं घेतलाच आहे. आतां आम्ही नुसता कोरडा देशाभिमान जवळ बाळगून राहिलों आहों...तो राहण्याला कोणाकडून कांहीं व्यत्यय न यावा, " असें त्यांनीं स्पष्टपणें बजावलें. परकी सत्तेचा ब्रह्मसमंध मानगुटीला बसला असला व हिंदुस्थानचें झाड सोडावें लागूं नये म्हणून तो अनेक युक्त्या करीत असला, तरी निराश होण्याचें कारण नाहीं. कारण साम्राज्यें अवाढव्य झालीं म्हणजे, आरंभीं सूक्ष्म असणाऱ्या पण हळूहळू प्रचंड होत जाणाऱ्या क्रांतीच्या लाटेनें तीं उलथून पडतात, हा इतिहासाचा सनातन सिद्धान्त सांगून त्यांनीं लोकांना आशावादी बनविलें. या देशांतील दुष्काळ परकी सत्तेमुळे पडतात. मिठासारख्या नैसर्गिक पदार्थावर सुद्धां या देशांत कर बसविला आहे. दस्तऐवज नोंदणीच्या कायद्यानें लक्षावधि रुपये सरकार उकळीत आहे. अशा स्थितींत, न्यायालयें, नोंदणीखातें इत्यादि जितक्या संस्था लोकांना स्वतः स्थापितां येतील तितक्या स्थापाव्या; सरकारी संस्थाकडे जाऊं नये. किरकोळ अधिकार दिले तरी हुरळून न जातां स्वातंत्र्याचें प्रमुख ध्येय विसरूं नये, पोलिसांच्या नोकरींत शिरून आपल्याच निःशस्त्र लोकांवर गोळ्या झाडूं नये. न्याया- धीशांनीं स्वातंत्र्याकरितां झटणाऱ्या आपल्याच देशबांधवांना शिक्षा देऊं नयेत. नाइलाजानें दिल्या तरी लोकांनीं त्यांची अंमलबजावणी होऊं देऊं नये. संस्थानिकांनीं परसत्तेचा तोंडपुजेपणा करून त्यांना साहाय्य करूं नये. असें सांगून शिवरामपंतांनीं स्वातंत्र्याची भावना नुसती प्रज्वलित च केली नाहीं तर परकी सत्तेशीं असहकार व अवश्य तेथें प्रतिकारहि करून प्रतिसरकार स्थापण्यापर्यंतचें स्वातंत्र्याचे सर्व मार्ग सुचविले. आणि ज्या आपल्या वाङ्मयाच्या योगानें त्यांनीं हें कार्य केलें तें वाङ्मय त्यांतील थोर विचार-

र्‍यदेप्रमाणें, कधीं उपरोध तर कधीं उपहास, कधीं वक्रोक्ति तर कधीं स्पष्टोक्ति, विवेचन सुबोध करणारे मनोहर दृष्टान्त, सहजासहजीं साधलेले अनुप्रास, सूचक अर्थान्तरन्यास, मजेदार संबोधनें, वक्तृत्वपूर्ण विविध व ओजस्वी वाक्य-रचना इत्यादि बहुमोल साहित्यगुणांनींहि संपन्न केलें. साहित्य हें साधन आहे, साध्य नव्हे, याची जाणीव शिवरामपंतांना होती. द्रव्यार्जन हें साधन आहे, साध्य नव्हे, याची जाणीव कित्येकांना राहत नाहीं आणि ते जन्मभर केवळ द्रव्यार्जनाच्या मागें लागतात. तसा प्रकार साहित्याविषयींहि कित्येकांचा होतो. साहित्य हें विचार संपदेला भूषविणारें, आकर्षक करणारें साधन आहे, हें ते विसरतात व केवळ साहित्याचीच चर्चा करण्यांत व केवळ साहित्यच निर्माण करण्यांत गुंतून पडतात. शिवरामपंत हे असे गुंतून पडलेले साहित्यिक नव्हते. म्हणूनच त्यांचें वाङ्मय आकर्षक, भरदार व तेजस्वी झालें. पन्नास वर्षांपूर्वीच्या प्रतिकूल परिस्थितींत आपले ज्वलज्जहाल व जिवंत विचार व्यक्त करण्याला या साहित्यसंपदेचा, विशेषतः उपरोधाच्या शस्त्राचा त्यांना फार उपयोग झाला. "मनुष्यमात्राच्या पारलौकिक व ऐहिक सुखाकरितां ईश्वरभक्तीची जितकी आवश्यकता आहे, तितकीच देश-भक्तीचीहि आहे." असा संदेश देणारें शिवरामपंतांचें तेजस्वी वाङ्मय मराठ्यांच्या देशाला व भाषेला सदैव भूषणभूत होऊन राहील आणि देणगी म्हणून जें कधींच मिळत नाहीं तें स्वदेशाचें स्वातंत्र्य आपल्या सामर्थ्यानें जेव्हां मिळविलें जाईल, तेव्हांच हा देश शिवरामपंतांच्या वाङ्मयाच्या ऋणांतून थोडा तरी मुक्त होईल.

नागपूर,<br>
९ ऑगस्ट १९४६.

शं. दा. पेंडसे

रतनासिंह- माझें चुकलें खरेंच. आणी तीच चुकी दुरुस्त करण्यासाठींच तर मी ती मूर्ति कुंभारगोराण्याला देऊन टाकली होती. पण फिरून ती देवाची मूर्ति आपली परत घरांत येऊन बसली.

राणी- अहो, हे गोचट देव एकदां घरांत शिरले, म्हणजे ते बाहेर निघतां निघत नाहींत बरें. आतां तुम्ही असें करा, हें मिराबाईचें लग्नाकडे मन वळविण्याचें सगळें काम माझ्याकडे सोंपवा. मग मी आहें आणि ती मिरी आहे. पहातें कशी ऐकत नाहीं ती.

रतन०- हं हं. अशी जबरदस्ती नाहीं तिच्यावर करायची. युक्तीनें मन वळवलें पाहिजे. तिच्या मैत्रिणी-चंपा, चमेली, यांना देखील मी तिचें मन संसारसुखाकडे वळव-ण्याविषयीं सांगितलें आहे. आणी तुमच्या सगळ्यांच्या कडून इतकी खटपट करून त्यांत नाहीं यश आलें-

शि. म. परांजपे.

शि. म. परांजपे यांचे हस्ताक्षर.

## श्रीरामजयंती : : : १

हल्लीं जिकडे तिकडे श्रीरामजयंतीच्या उत्सवाची गर्दी उडून राहिली आहे. कोठें कीर्तनें होत आहेत, कोठें पुराणें होत आहेत, कोठें वेदघोष होत आहेत, व कोठें रामनामाचीं भजनें होत आहेत. अशा प्रकारें सर्व लोक श्रीरामाच्या उत्सवामध्यें अगदीं निमग्न झाले आहेत. व अशा प्रकारचा देखावा एखाद्या देवालयांत पाहिला म्हणजे श्रीरामचंद्राची थोरवी किती असली पाहिजे, याबद्दल विचार मनामध्यें येऊन आपलें मन आश्चर्यानें अगदीं थक्क होऊन जातें. आपण रामाला कधीं पाहिलेलें नाहीं व तो होऊन गेल्याला किती हजार वर्षें लोटलीं असतील, याचाहि अदमास आपल्याला नाहीं. तरीपण आपण त्याच्या भजनांत तल्लीन होऊन जातों. व याचीं कारणेंहि अनेक आहेत. श्रीरामचंद्र हा प्रत्यक्ष विष्णूचा अवतार होय, असें आपलीं पुराणें आपल्याला सांगत आहेत, व असा आपलाहि (सुधारक खेरीजकरून) सर्वांचा निश्चय झालेला आहे. व श्रीरामचंद्र हा प्रत्यक्ष परमेश्वरच होता, अशा दृष्टीनें पाहिलें म्हणजे श्रीरामचंद्राचा आज जो महिमा गाजत आहे, तो अगदीं यथायोग्यच आहे असें म्हटल्यावांचून कोणाच्यानेंहि राहावणार नाहीं. परंतु रामायणांतील कथाभाग आपण वाचूं किंवा ऐकूं लागलों, म्हणजे श्रीरामचंद्र हा प्रत्यक्ष परमेश्वरच होता, ही गोष्ट आपण क्षणभर विसरतों, आणि रामाचा सीतेशीं विवाह झाला म्हणून आपण आनंद पावतों; रामाला त्याच्या बापानें अरण्यांत धाडलें म्हणून आपण खिन्न होतों, आणि रामाच्या बायकोला रावणानें चोरून नेलें म्हणून आपण अश्रु गाळतों. राम जर ईश्वर होता तर त्याला बाप किंवा बायको असणें, किंवा

तो बाप मरणें आणि ती बायको चोरीस जाणें, या गोष्टी संभवणार नाहींत. तात्पर्य, जरी श्रीरामचंद्र हा प्रत्यक्ष विष्णूचा अवतार होता, तरी त्यानें मनुष्याचा देह धारण केला होता, ही गोष्ट विसरतां कामा नये. व या दृष्टीनें पाहिलें असतां आज जो त्याचा महिमा गाजत आहे, ह्याला कांहींतरी श्रीरामचंद्राच्या अंगचे अलौकिक गुणच कारण झाले असले पाहिजेत, हें अगदीं उघड आहे. परमेश्वर पाहिजे ती गोष्ट करील. परंतु मनुष्यानें ती केली असतां त्याच्याबद्दल लोकांच्या मनांत गौरव उत्पन्न होतो. अशा गोष्टी श्रीरामचंद्राच्या चरित्रामध्यें अनेक आहेत, व त्या आपल्या लोकांना विदित आहेत. रामाच्या अंगचे गुण काय होते, हें हिंदूंपैकीं सर्व आबालवृद्धांना माहीत आहे.

श्रीरामचंद्राचीं सर्वच कृत्यें लोकोत्तर होतीं. परंतु त्यांतल्या त्यांत त्यानें रावणाला मारिलें, हें कृत्य अतिशयच लोकोत्तर होतें. सत्य भाषण करणारे आणि एकपत्नीव्रतानें चालणारे लोक थोडे आहेत असें नाहीं. पण त्या लोकांच्या या गुणांबद्दल कोणीं त्यांच्या जयंत्या केल्या नाहींत, किंवा त्यांना कोणीं देव मानिलें नाहीं. रामाच्या वेळेपासून आतांपर्यंत जो रामाचा जयघोष चालला आहे, तो रामानें बापाची आज्ञा पाळली, किंवा राम एकपत्नीव्रतधारी होता म्हणून नव्हे. तर त्यानें रावणासारख्या बलाढ्य पण दुष्ट राजाला मारिलें म्हणून. राम हा 'Tyrant Killer' म्हणजे जुलमी राजाला मारणारा होता. व ह्याच त्याच्या कृत्यानें त्याची कीर्ति अजरामर झालेली आहे, आणि त्याची मूर्ति देव्हाऱ्यामध्यें जाऊन बसलेली आहे. जो कोणी Tyrant-Killer असतो, त्याला सर्वकाळीं सर्व देशांतील लोक देवाप्रमाणें मान देत आले आहेत. व तीच स्थिति रामासंबंधानें आहे.

रावणापासून त्या वेळच्या सर्व प्रकारच्या लोकांना अतिशय त्रास सोसावा लागत होता. पूर्वजन्मींची त्याची थोर पुण्याई, त्याच्या पूर्वजांची थोर तपश्चर्या, व स्वतः त्याचेंहि तपश्चरण फार उग्र व खडतर, इत्यादि अनेक कारणांमुळें रावणाला राज्यप्राप्ति झाली खरी, परंतु त्याचा त्यानें सत्कर्माकडे उपयोग केला नाहीं. तर आपल्या सत्तेच्या जोरावर अनेक अनन्वित आणि जुलुमांचीं कृत्यें करून आपलें नांव त्यानें जुलुमी राजांच्या यादींत पहिल्या नंबरावर आणून ठेविलें. त्याचें पहिलें अन्यायाचें कृत्य म्हटलें म्हणजे लंका शहर घेणें हें होय. लंका

ही पूर्वी रावणाचा भाऊ कुबेर याजकडे होती. त्याला रावणानें प्रथमतः असा निरोप पाठविला कीं, लंका हें शहर माझ्या विशेष सोईचें असल्या-मुळें तें मला पाहिजे आहे, तें तूं बऱ्या गोष्टीनें द्यावें हें चांगलें. अशी सौम्य शब्दांनीं कडक धमकी दिल्याबरोबर बिचाऱ्या कुबेरानें मुकाट्यानें लंका शहर रावणाच्या हवालीं केलें आणि आपण हिमालयाच्या डोंगरामध्यें राहाण्याकरिता गेला. अशा रीतीनें मूळच्या धन्याला डोंगराच्या गुहेंत राहावयाला लावून या जुलुमी राजानें आपल्या राजधानीचें ठाणें लंका शहरांत बसविलें. नंतर त्यानें यक्ष, गंधर्व, किन्नर, देवर्षि, वगैरे लोकांना त्रास देण्याची सुरुवात केली. व इंद्राच्या नंदनवनांत जाऊन त्या त्रिभुवनांतील अतिशय सुंदर आणि मनोहर अशा बागेची त्यानें अगदीं धूळदाण उडवून टाकिली. यक्ष, गंधर्व, वगैरे लोकांनीं रावणाचा कांहीं अपराध केला होता असें नाहीं, तरीपण जुलुमी राजांचा हा स्वभावच कीं, ज्यानीं त्यांना कधीं काडीइतकाहि त्रास दिला नसेल, अशा निरपराधी गरीब लोकांवरहि ते आपल्या जुलुमी अमलाची पराकाष्ठा करावयाचे. तसेंच नंदनवनाच्या बगी-च्यांत बसून रावण तेथील सुवासिक फुलांचा वास घेता, तर तीं फुलें त्याला वास देतीं ना असें नाहीं. पण शत्रूचे बागबगीचे, राजवाडे वगैरे आपल्या हस्तगत झाले म्हणजे त्यांचा उपभोग घेण्यापेक्षां त्यांचा विध्वंस करण्याकडेच बहुतेक जुलुमी वाघांची प्रवृत्ति असते. तिच्यापुढें कोणाचा काय इलाज चालणार? हीं रावणाचीं कृत्यें पाहून कुबेराला वाईट वाटलें, व त्याला चार उपदेशाच्या गोष्टी सांगण्याकरितां कुबेरानें आपला एक दूत रावणाकडे पाठविला. परंतु त्या दूताला जागच्या जागीं ठार करून रावणानें खुद्द कुबेरावरच हल्ला करण्याचा निश्चय केला. सापाला कोणी दूध पाजूं लागलें तर तो त्या दूध पाजणारालाहि दंश केल्यावांचून कधीं राहाणार नाहीं; आणि जुलुमी राजा हा या बाबतींत सापापेक्षां अधिक चांगला असेल, असें मान-ण्याला मुळींच कारण नाहीं. असो. रावणाचें आणि कुबेराचें अखेरीस युद्ध जुंपलें व त्या युद्धांत कुबेराचा पराजय आणि रावणाचा जय झाला. 'यतो धर्मस्ततो जयः' हें तत्त्व लढाईमध्यें कधीं कधीं एका बाजूला राहून जगांत अतिशय जुलुमाचा, जबरदस्तपणाचा, अन्यायाचा, आणि अधर्माचा जो पक्ष असेल, त्यालाच जय मिळतो असें खरें. पण ज्याला कडेलोटाची

शिक्षा द्यावयाची असेल, त्याला पाहिल्यानें कड्याच्या शिखरावर उंच चढविलेंच पाहिजे. एरवीं ती शिक्षा कशी देतां येईल ? पण याच न्यायानें आपल्याला मधून मधून जय मिळत असतात, हें कोणत्याहि जुलुमी राजाच्या लक्षांत येत नाहीं. तर तो उलट असेंच समजत असतो कीं, माझ्यावर देवाची मोठी मेहेरबानी आहे, व म्हणूनच तो मला एकामागून एक जय मिळवून देत आहे. पण जेव्हां अशा रीतीनें ही अन्यायांची टेकडी पूर्णपणें चढली जाते, व तो खोल तुटलेला कडा जेव्हां जुलमी राजांच्या दृष्टीस पडतो, तेव्हां त्यांचे डोळे फाटून जातात व आपण देवाच्या मर्जीतले, देव आपल्यावर फिदा, परमेश्वराच्या इच्छेनुरूप आपण याला मारिलें आणि त्याच्या मुलुखावर राज्य केलें, इत्यादि मूर्ख लोकांना फसविण्यासाठीं केलेल्या वल्गना आतां उपयोगी पडावयाच्या नाहींत, असें समजून त्यांच्यासाठीं केलेल्या खड्डयांत ते आपला देह मुकाट्यानें टाकतात ! असो. कुबेराचा रावणानें पराभव केला म्हणून वर सांगितलेंच आहे. पण जुलुमी राजानें दुसऱ्याचा पराभव केला म्हणजे तेवढयानेंच तो संतुष्ट होत नाहीं. अन्यायी लढाईच्या पायांत आणखी चोरीची भर घातल्यावाचून त्याचा आत्मा थंड होत नाहीं. या न्यायाप्रमाणें रावणानें कुबेरापासून त्याचें पुष्पक नांवाचें विमान हरण करून घेतलें. दुसऱ्याला त्याच्या विमानांतून ढकलून देऊन त्यांत आपण विराजमान होण्याची ही जुलमी राजांची पद्धत फार पुरातन काळापासून, थेट रावणापसून चालू आहे. जुलुमी राजाच्या ताब्यांत असंख्य चिजा आलेल्या असतात व त्यांवर ते ऐषआराम भोगीत असतात, तेवढें मात्र पाहून घ्यावें. बाकी त्या वस्तु त्यांच्यापाशीं कशा आल्या, याचा जर आपण विचार करूं लागलों, तर त्या राजांना राजे म्हटल्याबद्दल आपल्याला खचित लाज वाटेल. अशा रीतीनें थोडेसे जय मिळाल्यानें रावण अतिशयच उन्मत्त झाला व देवांचाहि उपमर्द करूं लागला. एकदां पुष्पक विमानांत बसून कैलास पर्वतावरून रावण जात असतां त्याच्या विमानाची गति एकदम कुंठित झाली. तें पाहून रावणास फार क्रोध आला, व माझ्यासारख्या बलाढ्य राजाच्या विमानाला हरकत करण्याइतका शूर आज पृथ्वीवर कोण आहे, अशा गर्वानें फुगून तो विमानांतून खालीं उतरून पाहूं लागला. तेव्हां त्याला असें कळलें कीं, पार्वतीसह

शंकर त्या ठिकाणीं एकांतांत आहेत, म्हणून तेथें सर्वांची गति शंकरांनीं निरुद्ध केलेली आहे. ‘ माझ्या विमानाला प्रतिबंध करणारा हा शंकर, असा कोण मोठा आला आहे ! ’ असें म्हणून त्यानें पुष्पकाच्या गतीला अवरोध करणाऱ्या त्या कैलास पर्वताला आपल्या बाहूंनीं हालवून टाकलें; तेव्हां कैलासावरील सर्व देवता भीतीनें थरथर कांपूं लागल्या. देव आणि देवालयें हीं उपटून फेंकून देण्याचा परिपाठ जुलुमी राजांचा नेहमींचाच आहे; जणूं काय ‘ हे देवानो, आम्ही जसे तुम्हांला तुमच्या देवळांतून उपटून टाकीत आहों, तसेंच तुम्ही आम्हांला आमच्या सिंहासनावरून उपटून टाका, ’ असें ते देवांना सुचवून ठेवीत आहेत.

यानंतरचें रावणाचें उद्दामपणाचें आणि उन्मत्तपणाचें कृत्य म्हटलें म्हणजे त्यानें वेदवतीनामक एका तपस्विनीवर केलेला बलात्कार होय. वेदवती ही कुशध्वजाची मुलगी होती, व तुला विष्णु पति मिळेल, असा तिला वर मिळालेला होता. म्हणून ती तपश्चर्या करीत बसली होती. तिला पाहून रावण काममोहित झाला व तिजवर बलात्कार करूं लागला. त्या वेळीं चौदाचौकड्यांचें राज्य करणाऱ्या आपल्या स्वतःपेक्षांहि विष्णु तिला अधिक मोठा वाटतो आहे, असें पाहून रावणाला तिच्या अज्ञानाबद्दल फार कींव आली, व त्यानें तिची खात्री करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला कीं, अलीकडे विष्णु वगैरे कोणी मोठे नाहींत, मोठा काय तो मी. परंतु तिची समजूत न पडून तिनें शाप दिला कीं, तूं मला छळलें आहेस त्यापेक्षां मीच तुझ्या वधाला कारण होईन. व तीच वेदवती पुढल्या जन्मीं सीता झाली! असल्या कामांध झालेल्या जुलमी राजांचा सूड घेण्याकरितां किती तरी साध्वी स्त्रियांना आजपर्यंत पुनर्जन्म घ्यावे लागले असतील आणि याच्या पुढें घ्यावे लागतील ! अनाथ अबलांवर बलात्कार होऊं लागले कीं, जुलुमी राजांच्या पापाचे घडे भरत आलेच म्हणून समजावें. ज्यांच्यावर बलात्कार केला जातो त्या स्त्रिया अबला असतील, व त्या वेळीं त्यांच्या हातून कांहीं एक न होतां त्या बिचाऱ्या मरूनहि जातील. पण तें बलात्काराचें आणि जुलुमाचें कृत्य पाहून आणि ऐकून इतर लक्षावधी लोकांच्या मनांत क्रोधाग्नि भडकलेला असतो व प्रत्यक्ष परमेश्वरहि आपलें वज्र त्याच्या डोक्यांत घालण्यासाठीं हातांत घेऊन तयार असतो.

यापुढें रावणानें जें अघोर पातक केलें, तें यज्ञविध्वंसनाचें होय. मरुत्त नांवाचा राजा उशीरबीज या देशांत यज्ञ करीत असतां रावण तेथें गेला. या जुलुमी राक्षसाची भीति त्या वेळीं इतकी पसरली होती कीं, त्या यज्ञांत जे अनेक देव हविर्भाग घेण्याकरितां जमले होते, त्यांचीसुद्धां रावणाला पाहून पांचावर धारण बसली, व त्यापासून आपलें संरक्षण करण्याकरितां इंद्रानें मयूराचें, यमानें कावळ्याचें, वरुणानें हंसाचें आणि कुबेरानें कोंबड्याचें स्वरूप धारण केलें. देव देखील जर जुलुमी राजाला इतके भितात, तर माणसें भ्यालीं व पशुपक्ष्यांप्रमाणें वर्तन करूं लागलीं, तर त्यांत नवल तें काय? रावणानें येथपर्यंत आपल्या राज्याचीं व पापाचीं पाळेंमुळें बरींच दूरवर नेलीं. राजधानीकरितां एक सोन्याची लंका व हवा खाण्याकरितां एक विमान त्यानें उपटलें व देवांचा उपमर्द करून परस्त्रियांवर बलात्कार करण्याच्या वगैरे प्राथमिक गोष्टी त्यानें केल्या. नंतर त्याच्या मनांत असा विचार आला कीं, आपण एवढे मोठे राजे आणि आपलें राज्य या लंकेसारख्या क्षुद्र आणि लहानशा बेटांत! हें कांहीं ठीक नाहीं. असें वाटून त्यानें आपलें राज्य वाढविण्याला सुरुवात केली. दुसऱ्याचें राज्य लुबाडून घेतल्यावांचून याचें राज्य वाढणार कसें! पण दुसऱ्याचें राज्य आपण कां घ्यावें, किंवा त्यांत कांहीं अन्याय आहे हें जुलुमी राजांच्या स्वप्नांतसुद्धां येत नाहीं. आपल्याला पाहिजे आहे म्हणून आपण तें घ्यावें, याच्या पलीकडे त्यांच्या धर्मशास्त्राची गतीच जात नाहीं. आपल्या अंगांत सामर्थ्य आहे, म्हणून दुसऱ्यांचीं राज्यें हरण करण्याचा आपल्याला नैसर्गिक अधिकार आहे, अशी यांची समजूत झालेली दिसते. लंकेंतील जुलुमी बंडखोराच्या नीतिशास्त्रांतील तर पहिलें सूत्र ‘ युद्धं प्रयच्छ, निर्जितोस्मीति वा वद। ’ ( युद्धाला सिद्ध हो, नाहीं तर पराभव झाला म्हणून कबूल कर ) याप्रमाणें होतें. असल्या आपमतलबी आणि जुलुमाच्या सूत्रावर राजनीति अवलंबून राहूं लागली म्हणजे मग कोणत्या दुर्बल राज्याचा सुरक्षितपणा कायम राहणार आहे! रावणाची पहिली धाड मरुत्त राजावर पडली व त्याच्या यज्ञाचा विध्वंस करून तेथील ऋषींना मारून रावण त्यांचें रक्त प्याला. हें लांडग्यासारखें अघोर कृत्य करून नंतर रावणाची स्वारी दुसऱ्या राजांकडे वळली. जितके जितके म्हणून ससे तितके तितके सर्व लांडग्याचें भक्ष्य, त्याप्रमाणें जितके दुबळे

राजे तितके जुलुमी राजाचे भक्ष्य, हा अगदीं अप्रतिविधेय असाच नीती-मधील सिद्धांत झालेला दिसतो. कारण, त्याला अनुसरून रावणानें दुष्कंत, सुरथ, गाधि, गय, पुरूरवस्, वगैरे राजांच्या मुलखांत जाऊन 'युद्धं मे दीयताम् निर्जिताः स्म इति वा ब्रूत ।' हा मंत्र म्हटला, व त्यासरसे ते सर्व राजे शरण आले. वास्तविक पाहतां त्यांनीं रावणाचा काय अपराध केला होता, कीं ज्यासाठीं त्यांनीं आपल्या स्वतंत्रतेला मुकून रावणाचे गुलाम व्हावें? आतां ते रावणापेक्षां कमी बलाढ्य होते, हा जर त्यांचा गुन्हा असेल तर मात्र त्यांना मिळालेलें शासन यथायोग्य आहे असें म्हणावें लागेल. व यासाठीं असाहि उपसिद्धांत काढावा लागतो कीं, जेव्हां कोणी अन्यायी बुद्धीचा राजा बलाढ्य असेल, तेव्हां इतरांनीं त्याच्यापेक्षां दुर्बल राहून उपयोगी नाहीं, तर त्याच्यापेक्षां बलाढ्यच झालें पाहिजे. व तसें होण्याचा समय रावणाच्या वेळीं जवळच येऊन ठेपला होता. कारण, त्या वेळच्या बुद्धिबळांतल्या राजांना जिंकीत जिंकीत रावण अयोध्येंतील अनरण्य राजाकडे आला. तेव्हां अनरण्याचा तर पराभव झालाच; पण त्यानें रावणाला असा शाप दिला कीं, माझ्या कुलांत उत्पन्न झालेला दाशरथि राम तुला मारील. असा शाप झाला तरी त्या मदोन्मत्त राजाचे डोळे उघडले नाहींत. या सुमारास कळीचे नारद आणि जुलुमी रावण यांची ग्रंथि पडली. मग काय विचारतां? जुलुमी राजाच्या आगींत तेल ओतणाऱ्या नारदाची गांठ पडल्या-वर मग कलि माजण्यास काय उशीर? नारदाच्या सूचनेवरून रावणानें यम व वरुण या दिक्पालांवर स्वारी करून त्यांना पादाक्रांत केलें. व पुढें रावण व त्याचा पुत्र इंद्रजित् यांनीं इंद्रावर स्वारी करून स्वर्गांतील लढाईंत सांपड-लेल्या ब्रह्मदेव, इंद्र वगैरे कैद्यांना लंकेमध्यें आणून कारागृहांत कोंडून ठेविलें. ही तर जुलमांची परमावधि झाली. पण या जुलुमाच्या भव्य आणि उच्च इमारतीवर अजून कळस तो चढवावयाचाच होता. व तो पुढें सीतेला चोरून नेऊन तिला वश करण्याचा रावणानें प्रयत्न केला तेव्हां चढला, असें म्हणावयास हरकत नाहीं. त्या लंकाधिपति रावणाच्या जुलमामुळें हजारों स्त्रिया गाईप्रमाणें दीन झाल्या होत्या. त्यांच्या दुःखाचें वर्णन रामायणांत फारच हृदयद्रावक रीतीनें केलेलें आहे. कोणी आपल्या नवऱ्यांसाठीं रडत होत्या, कोणी आपल्या मुलांसाठीं अश्रु ढाळीत होत्या, कोणी आपल्या भावाला

आठवीत होत्या, आणि कोणी आपल्या बापांसाठीं स्फुंदत होत्या. आणि आपल्याला या संकटांतून सोडवणारा कोणी उरला नाहीं, म्हणून सर्वजणी मोठ्यानें आक्रोश करून रावणाला शाप देत होत्या. कधीं मधून मधून त्या बलाढ्य रावणालाहि खाकेंत गुंडाळून ठेवून आपण स्वस्थ संध्यावंदन करीत बसणारे कोणी वाली भेटत. पण असे लोक भेटले म्हणजे त्यांच्या हातीं पायीं पडून तो आपली सुटका करून घेत असे, व फिरून गरीबगुरिबांवर अम्मल गाजवायला जात असे. अशा रीतीनें या ' रावणराज्यं महाराज्या ' चा बंदोबस्त उत्तम प्रकारचा चालला असतां सर्व प्रजा गांजून गेली, पृथ्वी त्या जुलुमी राजाच्या अनिवार भारानें अगदीं वांकून गेली, व त्याच्या जुलुमाच्या दुःखानें कण्हूं लागली. ती गाईसारखी दीन झाली, आणि क्षीर-सागरांत गाढ झोंप घेत पडलेल्या विष्णूला आपल्या विकल स्वरानें जागृत करून त्याच्याजवळ तिनें आपलें दुःख निवेदन केलें. तेव्हां श्री भगवान् परमात्मा महाविष्णु याला तिची दया आली. त्यानें तिला आश्वासन दिलें. आणि दशरथाच्या पोटीं रामचंद्र जन्मास आले व मग विष्णूंनीं जें आश्वासन दिलें होतें, तें श्रीरामचंद्रांनीं परिपूर्ण केलें.

रावण हा एक जुलुमी राजा होता हें वरील रामायणांतील हकीकतीवरून स्पष्टच होत आहे. तेव्हां त्याला मारणारा राम हा Tyrant–Killer (जुलमी राजाला मारणारा) होता, असें मानण्याला कांहीं प्रत्यवाय नाहीं. व रामाच्या मुख्यत्वेंकरून या कृत्यासाठींच आपण त्याला परमपूज्य मानीत आहों. रामानें रावणास मारलें ही बातमी ऐकल्याबरोबर देवांनीं देखील जर स्वर्गा-तून फुलें उधळलीं आणि नौबदी वाजविल्या, तर मानवांना त्याबद्दल किती तरी आनंद झाला पाहिजे! या व इतरहि रामाच्या अंगच्या गुणांबद्दल आपण आज रामाची जयंती करीत आहों व आपलीं मुलें पुढें करतील. अशा त्या श्रीरामचंद्राचे गुणानुवाद गाण्याची इच्छा सर्वांना सर्व काळीं होवो, अशी त्या सच्चिदानंद परमात्म्यापाशीं करद्वय जोडून प्रार्थना आहे.

# रेजिस्ट्रेशन अथवा सरकारच्या सचोटीच्या किरकोळ विक्रीचें दुकान : : २

रेजिस्ट्रेशन हा शब्द इंग्रजी आहे, पण त्याचा अर्थ आतां बहुतेक मराठी झालेला आहे. या शब्दाचा अर्थ ज्यांना माहीत नाहीं असे लोक आपल्या इकडे इंग्रजांच्या प्रजावात्सल्यामुळें हल्लीं विरळाच असतील. श्रीमंत व गरीब, सावकार व शेतकरी, या सर्वांना हा शब्द सारखाच परिचयाचा झालेला आहे. आपला जमीनजुमला किंवा घरदार गहाण ठेवून आपल्या गरजेकरितां कोणा-लाहि कर्ज काढण्याची पाळी आली कीं, आपल्या कर्जखताचा रोखा रजिस्टर करून दिल्यावांचून त्याला कांहीं किंमत नाहीं, असा हल्लींचा मनु असल्यामुळें व असले कर्ज काढण्याचे प्रसंग हिंदुस्थानांतील दरिद्री होत चाललेल्या प्रजेवर वरचेवर येत असल्यामुळें ' रेजिस्ट्रेशन ' हा शब्द म्हणजे गरीब लोकांच्या निर्धनतेचा एक खुणेचा शब्दच होऊन बसला आहे.

दोन इसमांमध्यें कोणत्याहि महत्त्वाच्या प्रकरणासंबंधानें एखादा दस्तऐवज झाला म्हणजे तो रजिस्टर करण्याचा परिपाठ पडलेला आहे. हा परिपाठ पड-ण्याचें कारण काय, या प्रश्नाचा प्रत्येकानें विचार करणें अवश्य आहे. हल्लीं न्यायाच्या कोर्टामध्यें रजिस्टर केलेला कागद आणि न केलेला कागद ह्यांच्यामध्यें जो फरक दिसून येतो, त्यावरून पाहतां असें दिसतें कीं, ' रेजि-स्ट्रेशन ' हें एक कागदाचा खरेपणा जाणण्याविषयीचें बऱ्याच महत्त्वाचें साधन आहे, असें मानलें जातें. ' रेजिस्ट्रेशन 'ची पद्धत निघण्याच्यापूर्वी बहुधा अशा प्रकारच्या लबाड्या होत असाव्या कीं, ऋणकोनें धनकोला कागद लिहून देतांना एक प्रकारचा द्यावा, व तो कोर्टापुढें येतांना निराळ्याच प्रकारचा यावा. शंभर रुपये कर्जाऊ घेतले असले, तर शंभरांचे जागीं दोनशेंचा

आंकडा व्हावा, व्याज एकोत्र्याचें असलें, तर तें दुहोत्र्याचें व्हावें, गहाण एक शेत लावून दिलेलें असलें, तर एकाच्या ठिकाणीं दोन व्हावींत, अशा प्रकारचे फेरबदल कांहीं लोक करीत असले पाहिजेत. हे सर्व लबाडीचे प्रकार बंद करण्यासाठीं रेजिस्ट्रेशनची युक्ति योजण्यांत आलेली आहे हें उघड आहे. दोघांच्या दरम्यान झालेला कागद कोठें तरी तिसऱ्या ठिकाणीं नोंदून ठेवला गेला असला म्हणजे असल्या लुचेगिऱ्यांना सवड सांपडत नाहीं, किंवा अशांतून कोणीं लुचेगिरी केली आणि त्या दोन पक्षकारांच्या लेखांमध्यें फरक पडला तर या तिऱ्हाइतपणानें नोंदलेल्या आणि प्रामाणिकपणानें कांहींएक फेरबदल न करतां कायम राखलेल्या लेखांशीं तुलना करून पाहण्याला व खरें खोटें ठरविण्याला फार सोइस्कर पडतें, हा या 'रजिस्ट्रेशन' च्या पद्धतीचा फार मोठा उपयोग आहे. 'रजिस्ट्रेशन' चा हा मूळ आणि मुख्य उद्देश होय. आतां हा उद्देश सिद्धीस जाण्याला जें कांहीं अवश्य पाहिजे आहे तें एवढेंच कीं, दोन पक्षकारांच्या दरम्यान् झालेल्या विवक्षित ठरावाची नोंद ज्या तिऱ्हाइताकडे करावयाची, तो त्या केलेल्या नोंदींत कधींहि फेरफार करणार नाहीं, ती जशीच्या तशीच कायम राखील, इतका त्या दोन्ही पक्षांचा त्या इसमावर विश्वास असला पाहिजे. आतां हा विश्वासू मनुष्य अमुकच असला पाहिजे, असा निर्बंध असण्याचें कारण नाहीं. उभय पक्षांचा ज्यावर विश्वास तोच त्याचा रेजिस्ट्रार. तात्त्विक दृष्ट्या पाहतां अशी वस्तुस्थिति असली म्हणजे मनुष्यांचा व्यवहार अव्याहत चालण्याला कांहीं हरकत नाहीं.

दहाव्या शतकाच्या पूर्वीं मनूच्या कायद्याप्रमाणें जेव्हां हिंदुस्थानांतील लोकांना न्याय मिळत होता, किंवा त्यानंतर मोगलांच्या अरेरावी कायद्याप्रमाणें न्याय मिळूं लागला, किंवा त्यापुढें मराठ्यांच्या आणि पेशव्यांच्या कारकीर्दींतून रामशास्त्र्यांसारखे जेव्हां लोकांना न्याय देत होते, तेव्हां दोन पक्षकारांमधील दस्तऐवज कसे लिहीत असत, त्यांतील खरेपणा शपथेवर अधिक अवलंबून असे किंवा साक्षीवर अधिक अवलंबून असे, त्या दस्तऐवजांची नोंद करण्याचें ऑफिस कोठें होतें कीं काय, व अशा नोंदीला न्यायाच्या वेळीं कितपत महत्त्व देण्यांत येत असे, वगैरे प्रश्न हिंदुस्थानांतील जुन्या इतिहासाच्या भागांतील आहेत. हा इतिहास आजमितीला तयार नाहीं.

तेव्हां आपल्या प्रस्तुतच्या प्रश्नाबद्दल माहिती मिळण्याचें आपल्याशीं आज कांहीं एक साधन उपलब्ध नाहीं. परंतु सामान्यत: जुन्या लोकांच्या तोंडून आणि कांहीं कागदपत्रांतून जुन्या न्यायपद्धतीबद्दल जी कांहीं थोडीशी माहिती मिळते, तीवरून ही 'रेजिस्ट्रेशन' ची पद्धत हल्लींच्या इतक्या व्यापकतेनें तरी निदान पूर्वीं चालू असेल असें वाटत नाहीं. ही पद्धत आपल्यामध्यें इंग्रजी अमलाबरोबरच आलेली आहे. इंग्रजांचा अम्मल येथें स्थिरस्थावर झाल्यानंतर त्यांनीं एकामागून एक कायदे करण्याला सुरुवात केली. त्यांत एके दिवशीं त्यांनीं एक 'रेजिस्ट्रेशन'चा कायदा केला आणि जगाला असें फर्माविलें कीं, "आम्ही अतिशय प्रामाणिक आहों! आम्ही अतिशय विश्वासू आहों! व आम्ही अतिशय निःपक्षपाती आहों! आम्ही पूर्णपणें प्रामाणिक, विश्वासू, आणि निःपक्षपाती आहों अशी आमची खात्री असल्या-मुळें आम्हीं 'रेजिस्ट्रेशन' चीं हपिसें ठिकठिकाणीं उघडलीं आहेत. त्यांत येऊन तुम्ही आपले दस्तऐवज निर्धास्तपणें नोंदून घ्या!" अशा प्रकारची द्वाही आमच्या इंग्रज सरकारनें फिरविल्याबरोबर जिकडे तिकडे प्रामाणिक-पणा, विश्वासूपणा, आणि निःपक्षपातीपणा, यांची एकच गर्दी उडून जणूं काय रामराज्यालाच सुरुवात झाली आहे असें लोकांना वाटूं लागलें. पण सरकारनें हें जें रेजिस्ट्रेशनचें काम आपल्याकडे घेतलें आहे, त्यासंबंधानें बऱ्याच गोष्टी विचार करण्यासारख्या आहेत.

दोन पक्षांचा ज्याच्यावर विश्वास आहे असा कोणीहि तिऱ्हाईत 'रेजि-स्ट्रेशन' चें काम करूं लागल्यास त्याला वास्तविकपणें हरकत नसावी, या तत्त्वाचें स्पष्टीकरण पूर्वीं केलेलेंच आहे व तो तिऱ्हाईत मनुष्य प्रामाणिक, विश्वासू, आणि निःपक्षपाती असला म्हणजे तो दोन पक्षांच्या दरम्यान् रेजि-स्ट्रारचें काम करण्याला पात्र होतो, हें त्यावरून उघड होत आहे. असे लोक हिंदुस्थानांत 'रेजिस्ट्रेशन' चा कायदा सुरू केला तेव्हां कोणी नव्हते असें नाहीं. तिऱ्हाइतपणें नोंद ठेवण्यापुरते प्रामाणिक, विश्वासू, आणि निःपक्ष-पाती लोक पुष्कळ सांपडले असते. प्लॅसीच्या लढाईच्या आधीं "तांबडा आणि पांढरा" असे दोन कागद तयार करणाऱ्या, अयोध्येच्या अनाथ बेगमांवर पैशासाठीं अन्यायानें जुलूम करणाऱ्या आणि हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें आम्ही हिंदु लोकांना वागवूं असें अभिवचन देऊन निपुत्रिक हिंदु संस्था-

निकांना दत्तकाची परवानगी न देणाऱ्या इंग्रजांना आपणच पुढें होऊन आपल्याच तोंडानें 'आम्ही प्रामाणिक, विश्वासू व निःपक्षपाती आहों,' असें सांगण्याची पाळी यावी, इतकें प्रामाणिक मनुष्यांचें दुर्भिक्ष हिंदुस्थानांत त्या वेळीं खास नव्हतें. आतां इंग्रज लोकहि प्रामाणिक, विश्वासू, आणि निःपक्षपाती असतील; ते तसे नाहींत असें कोणाचें म्हणणें नाहीं. पण ते प्रामाणिक असले म्हणजे जगांत दुसरे कोणी प्रामाणिक नाहींतच, असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. व त्यांच्याशिवाय दुसरे जर प्रामाणिक लोक आहेत, तर त्यांनींहि तिऱ्हाईत या नात्यानें वर सांगितलेल्या प्रकारची नोंद ठेवण्याला काय हरकत आहे ? व ती त्यांनीं तशी ठेविली असल्यास व ती उभयपक्षांस मान्य असल्यास ती सरकारनेंहि कां कबूल करूं नये ! पण सरकारनें इतर गोष्टींप्रमाणें प्रामाणिकपणाचाहि सगळा मक्ता आपल्याकडेच घेतलेला आहे असें दिसतें. कारण 'रेजिस्ट्रेशन'चा हक्क त्यांनीं दुसऱ्या कोणालाहि ठेवलेला नाहीं.

शिवाय आज अशी स्थिति आहे कीं, सरकारच्या दप्तरांत नोंदलेला कागद न्यायाचीं कोर्टें अत्यंत विश्वसनीय समजून तो पुराव्यांत ग्राह्य आहे असें मानतात. परंतु दोन्ही पक्षकारांचा एखाद्या तिऱ्हाइतावर भरंवसा असला आणि त्यानें ठेवलेली नोंद जर त्या पक्षकारांना मान्य असली तर अशा प्रकारच्या तिऱ्हाइताच्या येथील नोंद पुराव्यात ग्राह्य म्हणून मानण्याला न्यायाच्या कोर्टांना कांहीं हरकत असतां कामा नये. कारण, न्यायाच्या कोर्टाचा आणि सरकारचा अर्थाअर्थी कांहींएक संबंध नाहीं. दोन पक्षांमधील न्याय निवडणें हें कोर्टाचें काम आहे. त्या कामासाठीं लागणारा पुरावा सरकारकडून आलेला असो, किंवा एखाद्या खाजगी मनुष्याकडून आलेला असो, त्यांतील खरेखोटेपणा पाहून त्याप्रमाणें न्यायाधीशानें न्याय दिला पाहिजे. अशी वास्तविक स्थिति असतां न्यायाच्या कोर्टानें एका इसमाच्या रेजिस्टरला पुराव्यांत ग्राह्य मानावें आणि दुसऱ्या इसमाच्या रेजिस्टरला ग्राह्य मानूं नये, म्हणजे हा न्यायाच्या कोर्टांत अन्याय होत आहे, असें म्हणणें भाग पडतें. या बाबतींत सरकार एका कायद्यानें दोन अन्याय करतें. आपण स्वतः प्रामाणिकपणाचा सर्व मक्ता घेऊन लोकांच्या प्रामाणिकपणावर अविश्वास करतें हा एक, आणि स्वतंत्र,

तिऱ्हाईत, आणि निःपक्षपाती अशा न्यायाच्या कोर्टांनाहि आपल्या कायद्याच्या योगानें लोकांवर अविश्वास करण्याला भाग पाडतें हा दुसरा.

पण इतकेंच करून सरकार या रेजिस्ट्रेशनच्या बाबतीत थांबतें तर कोणाचें कांहीं फारसें म्हणणें नव्हतें. तिऱ्हाइतांच्या कागदपत्रांची नोंद ठेवण्याच्या कामांत सरकार विश्वासूपणानें वागतें याबद्दल कोणाला शंका नाहीं. लोकांच्या सनदा, वतनें, इनामें, संस्थानें, जहागिरी, इत्यादि संबंधाच्या कागदपत्रांच्या बाबतींत सरकारकडून पाहिजे तितकी खबरदारी कांहीं कांहीं प्रसंगीं घेण्यांत आली नाहीं, असा कांहींचा सरकारावर आक्षेप आहे. पण ज्या बाबतींत सरकारचें नफानुकसान कांहीं नाहीं, त्या बाबतींत लोकांचे दस्तऐवज वगैरे असतील तसे कायम राखण्याविषयीं आमच्या सरकारची प्रख्याति आहे. व याबद्दल तें स्तुतीस पात्र आहे. या बाबतींत त्यांच्यापाशीं सचोटी आहे याबद्दल कोणाला शंका नाहीं. पण ती सचोटी त्यांनीं विक्रीसाठीं बाजारांत ठेवावी, ही मात्र मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. समुद्राचें पाणी वाळवून त्याचें मीठ पाहिजे त्याला करतां आलें असतें. पण सरकार लोकांना म्हणतें कीं, तें तुम्ही कोणी वाळवूं नका. तें फक्त आम्हींच वाळवूं! आणि तें तुम्ही आमच्यापासून विकत घ्या. हें म्हणणें जसें अन्यायाचें आहे, तसेंच रेजिस्ट्रेशनच्या बाबतींतहि सरकारचें म्हणणें अन्यायाचें आहे. प्रामाणिकपणा ही चीज लोकांपाशीं पुष्कळ असतां त्यांस सांगावयाचें कीं, रेजिस्ट्रेशनच्या बाबतींत तुम्ही आपल्या प्रामाणिकपणाचा उपयोग करतां कामा नये, तर तेथें आम्हींच आपला प्रामाणिकपणा उपयोगांत आणूं, आणि त्याबद्दल तुम्ही आम्हांला पैसे दिले पाहिजेत; हें म्हणणें बरोबर नाहीं. सचोटीसारखी चीज तेलातुपाप्रमाणें दुकानांत विक्रीला मांडणें, हेंच आधीं थोडेंसें गैरशिस्त आहे. ती चीज परमेश्वरानें उदार अंतःकरणानें आपल्याला दिलेली आहे. तेव्हां तितक्याच उदारपणानें तिच्यावर किंमत न घेतां ती आपण दुसऱ्यांना द्यावी हें उचित आहे. पण लोभी माणसांना आपली सचोटी फुकट देण्याची सवड नसली, तर त्यांनीं ती विकावी असेंहि क्षणभर कबूल करतां येईल. पण अशी सचोटी विकण्याचीं दुकानें अनेकांनीं काढलीं असतां त्यांचीं दुकानें बंद करून, सर्व लोकांनीं आमच्याच दुकानांतून सचोटी विकत घ्यावी, असा हुकूम करणें हें शुद्ध दांडगाईचें

आणि पाच्छाई अमलाचें लक्षण आहे. कोणत्याहि मालाचीं दुकानें पुष्कळ असलीं म्हणजे एकमेकांच्या स्पर्धेनें गिऱ्हाइकाला माल स्वस्त मिळतो. परंतु दुसरीं दुकानें बंद करून एकच दुकान चालू ठेविलें तर मग त्या दुकानांत जो सांगतील तो दर गिऱ्हाइकाला द्यावा लागतो. व हीच स्थिति सरकारनें रेजिस्ट्रेशनची आज करून ठेविली आहे. रेजिस्ट्रेशनचें डिपार्टमेंट चालण्याला कांहीं खर्च लागतो हें खरें आहे. म्हणून तो खर्च भागण्यापुरती सरकारनें फी ठेविल्यास कोणाचें कांहीं फारसें म्हणणें येणार नाहीं. परंतु या खात्याच्या जमाखर्चाचे आंकडे पाहिले तर सरकारनें ही एक उत्पन्नाचीच बाब केली आहे, असें म्हणावें लागतें. आपण मुंबई सरकारचें उदाहरण घेतलें, तर या सरकारनें गेल्या दहा वर्षांत या रेजिस्ट्रेशन डिपार्टमेंटपासून किती पैसे उकळले आहेत, हें पुढें दिलेल्या कोष्टकावरून लक्षांत येईल.

| वर्ष | शिल्लक रुपये |
|---|---|
| १८८९–९० | १,८३,५५९ |
| १८९०–९१ | १,८६,४४२ |
| १८९१–९२ | २,०८,२२४ |
| १८९२–९३ | २,४४,६२८ |
| १८९३–९४ | २,५८,५६१ |
| १८९४–९५ | २,९१,४८७ |
| १८९५–९६ | ३,०५,७७९ |
| १८९६–९७ | ३,०८,२४६ |
| १८९७–९८ | २,८०,६४५ |
| १८९८–९९ | २,७१,२४५ |

या आंकड्यांवरून सरकार या धंद्यांत कसा नफा मारीत आहे, हें स्पष्ट दिसून येईल. या प्रामाणिकपणाच्या व्यापारांत सरकारचा नफा दिवसेंदिवस वाढतच जात आहे. दहा वर्षांच्या पूर्वीं जेथें एक लक्ष ब्यांयशीं हजार नफा होत असे, तेथें आतां तो नफा तीन लक्षांच्यावर गेलेला आहे. शेवटचीं दोन वर्षें प्लेग

आणि दुष्काळ असल्यामुळें, या खात्यांतील शिल्लक कांहींशी तीन लक्षांहून कमी झाली आहे. पण प्लेगनें आणि दुष्काळानें सगळ्याच प्रकारच्या दुकानदारीला थोडाबहुत धक्का बसला आहे. त्याचप्रमाणें तो या सचोटीच्या दुकानदारीला बसला यांत कांहीं नवल नाहीं ! सरकार या व्यापारांत इतका नफा मिळवितें म्हणूनच आम्ही याला 'सचोटीच्या किरकोळ विक्रीचें दुकान' असें म्हटलें आहे. दुकानात आणि या खात्यात कांहीं विशेष फरक आहे असें नाहीं. या देशांतील लोक अन्नाला महाग झाले आहेत. अशा देशांपैकीं एका इलाख्यांतील लोकांपासून सरकारनें दोन तीन लक्ष रुपये दरसाल सचोटीच्या व्यापारावर उकळावेत, हें खरोखर अश्लाघ्य आहे. हेच रुपये गरीब लोकांपाशीं राहिले असते तर आज कित्येक कुटुंबाचें थंडीवाऱ्यापासून आणि क्षुधेपासून संरक्षण झालें असतें. सरकार गरीब शेतकऱ्यांची आपण फार कींव करीत आहों असें नेहमीं दाखवीत असतें; पण त्याच गरीब शेतकऱ्यांच्या पैशांतून हें श्रीमंत सरकार दरसाल दोन तीन लाख रुपये निव्वळ मधल्यामध्यें उपटीत असतें. कारण, परिणामीं सर्व खर्चाचा बोजा गरीब ऋणकोवरच पडतो, हें कोणास सांगावयास पाहिजे असें नाहीं. तेव्हां ज्यांची कींव करावयाची त्यांच्यापासून त्या किंवेची किंमत म्हणून दोन तीन लाख रुपये काढून आपल्या खजिन्यांत टाकावयाचे, ही कींव करण्याची पद्धत निदान हिंदुस्थानांतील लोकांस तरी खास हितावह होत नाहीं.

ही स्थिति लक्षात आली म्हणजे, ही स्थिति दूर करण्याला आपल्याला कांहीं उपाय योजितां येईल किंवा नाहीं, असा प्रश्न साहजिकपणें उत्पन्न होतो. सरकारच्या कोर्टांत फिर्याद करावयास गेल्यानें सावकाराला व कुळाला दोघांनाहि बराच खर्च सोसावा लागतो. तो टाळण्याकरितां लवाद कोर्टाची कल्पना निघालेली आहे. त्याचप्रमाणें या रेजिस्ट्रेशनसंबंधाची कांहीं व्यवस्था आपसामध्येंच लोकांनीं केली, तर ती जुळणें अशक्य आहे असें नाहीं. आपल्या हातांत घेऊन चालवितां येतील अशा पुष्कळ संस्था सरकारच्या हातीं आज आहेत. त्या सरकारच्या हातून आपण आपल्याकडे घेतल्यास त्यांत आपला फायदा आहे. खाजगी शिक्षणाच्या शाळा आणि लवाद कोर्टें हीं दोन अशा प्रकारचीं उदाहरणें आहेत व अशा आणखीहि पुष्कळ बाबी सांपडूं शकतील कीं, ज्यांच्याशीं सरकारचा अर्थाअर्थीं कांहीं संबंध नाहीं, व

ज्या लोकांनीं आपल्या हातीं घेतल्या असतांहि चालूं शकतील. कांहीं ठिकाणीं हल्लीं सरकारचे रेजिस्ट्रार आहेत. त्यांच्या ऐवजीं लोकांनीं आपल्या वतीनें निराळे इसम नेमून व्यवस्था केल्यास ती अगदीं कमी खर्चानें व अधिक फायद्यानें पार पडण्याचा संभव आहे. व मिळणाऱ्या हक्काबद्दल मागणी करण्यांत तल्लीन होऊन गेलेल्या मोठमोठ्या संस्थांनीं आपल्या हातून होण्यासारखीं असलेलीं असलीं लहानलहान कामेंच आधीं शेवटास नेलीं, तर त्यांत लोकांचा फायदा आणि त्यांचें महत्त्व अधिक वाढल्यावांचून कधींहि राहणार नाहीं.

---

# आमच्या इंग्रजांच्या इंपीरियालिझमचा शेवट काय होणार ? : : : ३

आम्हांला इंग्रजांनीं आपल्या सत्तेखालीं ओढलें आहे म्हणा, किंवा ईश्वरानें आम्हांला इंग्रजी छत्राच्या शीतल छायेंत आणून ठेविलें आहे म्हणा; कसेंही असलें, तरी आम्ही आज त्यांच्या अंमलाखालीं आहों हें खरें. ज्या अर्थीं आम्ही त्यांच्या अंमलाखालीं आहों त्याअर्थीं त्यांचा अमल उत्तरोत्तर फैलावत गेला तर त्यांत आम्हांला आनंदच आहे. व याचें प्रत्यंतर पाहण्याला फारसें दूर जावयास पाहिजे आहे असें नाहीं. मेफकिंगचा वेढा उठला आणि इंग्रजांच्या सैन्यानें प्रिटोरियामध्यें प्रवेश केला, ह्या बातम्या ऐकून आम्ही कसे नाचलों; वगैरे गोष्टी

जे अजून विसरले नसतील, त्यांना आमच्या वरील म्हणण्याची सत्यता तेव्हांच कळून येईल. पण एका दृष्टीनें जरी अशा गोष्टींपासून सर्वांना आनंद झाला, तरी त्याच गोष्टींपासून विचारी मनुष्यांना कधीं कधीं मोठी काळजी उत्पन्न होते. व ट्रान्सवालांतील जयप्रीत्यर्थ झालेला दिव्यांचा लखलखाट, टाळ्यांचा गजर, व्याख्यानांचा कहर, आणि गरिबांचीं ब्राह्मणभोजनें, यांच्या गोंगाटांतून आणि कलकलाटांतून मन जरा मोकळें झालें, व त्याला जरा निवांतपणा मिळाला, म्हणजे त्या मनांत 'आमच्या इंग्रजांच्या इंपीरियालिझमचा शेवट काय होणार ?' हा प्रश्न उत्पन्न होतो. हा प्रश्न या पूर्वींहि अनेक वेळां लोकांचे मनांत उत्पन्न झाला असेल. पण हल्लीं तर तो फारच वारंवार उत्पन्न होऊं लागला आहे. व त्याला कारणेंहि आहेत. तीं अशीं कीं, आमच्या इंग्रजांचें राज्य मुळचेंच फार अफाट आहे. त्यांतून नुकतीच जी दक्षिण आफ्रिकेमध्यें लढाई झाली तिच्या योगानें इंग्रजांच्या राज्यांत आणखी भरच पडली. पण ही राज्यविस्ताराची भीति सुदैवानें येथेंच थांबती, तर फार बरें झालें असतें. पण तसें कोठून होणार ? काल ट्रान्सवालला इंग्रजांनीं आपल्या छत्राखालीं घेतलें कीं नाहीं तोंच आज चीन देशांतील कांहीं भाग 'मला तुमच्या छत्राखालीं घ्या, मला तुमच्या छत्राखालीं घ्या,' असें म्हणत त्यांच्या पाठीस लागला आहे. व सर्व जगाला आपल्या कायद्यानें धर्मशील, आपल्या सुधारणेनें सुखी, आणि आपल्या कायद्यानें शांतताप्रिय करूं इच्छिणाऱ्या आमच्या इंग्रजांना असें कोणीं म्हटलें म्हणजे, त्याचा शब्द त्यास मोडवत नाहीं. हा त्यांच्या सद्गुणामुळें त्यांच्या अंगीं एक मोठा दोष जडलेला आहे. पण 'भिडें भिडें आणि पोट वाढे' या म्हणीप्रमाणें आपली राज्यमर्यादा आपल्या आहाराबाहेर जात आहे. ही गोष्ट आमच्या राज्यकर्त्यांच्या लक्षांत येत नाहीं हें फार वाईट आहे. पण या गोष्टीकडे त्यांचें लक्ष जात नसलें तर तें आपण दवडलें पाहिजे. आणि इतकें करूनहि त्यांचें लक्ष तिकडे गेलें नाहीं, तरी लोकांचें लक्ष तरी निदान तिकडे जाणें फार जरूर आहे.

आज पृथ्वीच्या पाठीवर एकट्या इंग्रजांचेंच साम्राज्य ( Empire ) आहे असें नाहीं. इतरहि कांहीं लोकांचीं साम्राज्यें आहेत. हल्लीं आम्हीं येथें साम्राज्य हा जो शब्द वापरला आहे, त्याची कल्पना मुख्यत्वें-

करून म्हटली म्हणजे अशी कीं, एक मुख्य देश आणि त्यानें जिंकून किंवा वसाहती करून वगैरे मिळविलेले दुसरे प्रांत हे सर्व मिळून जो एक पृथ्वीचा प्रदेश, त्याला साम्राज्य असें म्हणावयाचें. उदाहरणार्थ, युनायटेड किंग्डम, म्हणजे इंग्लंड, स्कॉटलंड, आणि आयर्लंड, या तिन्हीं मिळून बनलेला जो एक देश, तो मुख्य व त्यानें जिंकून काबीज केलेले हिंदुस्थानासारखे देश, व वसाहतीच्या योगानें हस्तगत करून घेतलेले कानडा वगैरेसारखे देश, हें सर्व मिळून जो एक प्रदेश एका राजकीय छत्राखालीं आलेला आहे त्याला आपण ' ब्रिटिश एम्पायर, ' किंवा ' इंग्रजांचें साम्राज्य ' असें म्हणतों. याचप्रमाणें राशीयन एम्पायर, जर्मन एम्पायर, फ्रेंच एम्पायर, वगैरे अनेक साम्राज्यें आहेत. व साम्राज्य ही संज्ञा जरी कांहीं देशांना लागू नसली तरी वरील साम्राज्यांच्याच योग्यतेचे असे दुसरेहि कित्येक देश आहेत. या वर्गांत स्पेन व अमेरिकेंतील युनायटेड स्टेट्स वगैरे येऊं शकतील. वर जीं साम्राज्यांचीं किंवा साम्राज्यासारख्याच मोठमोठ्या देशांचीं नावें दिलीं आहेत, त्या प्रत्येकांतील लोकसंख्येचे एका विशिष्ट दृष्टीनें आपण दोन वर्ग करूं. उदाहरणार्थ, आपण फ्रेंच एम्पायर घेतलें, तर त्यात खुद्द फ्रान्सचे लोक आणि त्या फ्रान्सच्या लोकांनीं जिंकून आपल्या ताब्यांत आणलेले परदेशचे लोक, अशा दोन प्रकारच्या लोकाचा फ्रेंच एम्पायरमध्यें समावेश होत आहे. सारांश, कोणतेंहि राज्य किंवा साम्राज्य घेतलें तर त्यात मूळचे जिंकणारे लोक आणि त्यांनीं जिंकलेले लोक असे दोन वर्ग होतात. या दोन वर्गांची निरानिराळ्या राष्ट्रांशीं तुलना केली असतां इंग्लंडची स्थिति किती भयंकर आहे, व आतां यापुढेंहि इंग्लंडनें आपली राज्यमर्यादा वाढविण्याचा प्रयत्न केल्यास तो किती धोक्याचा आहे, हें सहज कळून येणार आहे. म्हणून त्या संबंधाचें एक कोष्टक तयार करून आम्ही खालीं देतों:—

| साम्राज्य किंवा राज्य | मूळचे लोक | त्यांनीं जिंकलेले परदेशांतील लोक |
|---|---|---|
| फ्रान्स | ३,८५,१७,९७५ | ५,२६,४२,९३० |
| जर्मनी | ५,२२,७९,९०० | १,०६,६०,००० |
| रशिया | ९,४२,१५,४११ | ३,४७,८४,५८५ |
| स्पेन | १,७५,६५,६३२ | १,७३,००० |
| युनायटेड स्टेट्स | ६,२६,२२,२५० | १,०५,४८,२८२ |
| ब्रिटिश एम्पायर | ४,०१,८८,९२७ | ३४,५०,९१,२१३ |

वरील कोष्टकांतील तिसऱ्या कॉलमात डिपेन्डन्सीज, कॉलनीज वगैरेंची लोकसंख्या दिलेली आहे, व दुसऱ्या कॉलमांत त्या डिपेन्डन्सीज आणि कॉलनीज ज्या ज्या देशांच्या ताब्यांत आहेत त्या त्या देशांतील लोकसंख्या दिलेली आहे. हे आंकडे आज १९०० सालांत अगदीं बरोबरच भरतील असें नाहीं, तरी पण आपल्याला सध्यां जो विचार कर्तव्य आहे, त्या संबंधानें पाहिलें असता हे आकडे बरोबर आहेत असें धरून चालण्यास कांहीं हरकत नाहीं. या वरील आंकडयासंबंधानें विचार करतां आपल्याला असें दिसून येतें कीं, जर्मनी, राशीया, स्पेन आणि युनायटेड स्टेट्स हीं चार राज्यें अगर साम्राज्यें एका वर्गांत मोडतात; म्हणजे अशीं कीं, या चारांपैकीं प्रत्येक मूळच्या देशांतील लोकसंख्या त्यांनीं जिंकलेल्या देशांतील लोकसंख्येपेक्षां पुष्कळ पटीनें अधिक आहे. म्हणजे याचा अर्थ असा कीं, या चार राज्यांना जिंकलेल्या लोकांपासून फारशी भीति नाहीं. पण हीं चार खेरीज करून बाकी राहिलेल्या दोन साम्राज्यांची तशी स्थिति नाहीं. फ्रेंच एम्पायर आणि ब्रिटिश एम्पायर यांतील फ्रान्स आणि युनायटेड किंग्डम यांची लोकसंख्या त्यांनीं जिंकलेल्या लोकांच्या सख्येहून कमी आहे. फ्रान्सच्या लोकांपेक्षां फ्रान्सनें जिंकलेले लोक सरासरी दीडपटीनें अधिक आहेत. पण ब्रिटिश एम्पायरचें प्रमाण यापेक्षां कितीतरी पटीनें भयंकर आहे. वरील कोष्टकांत ४,०१,८८,९२७ ही युना-

यटेड किंग्डममधील जिंकणाऱ्या लोकांची म्हणून संख्या दिलेली आहे. परंतु वास्तविक पाहतां आयर्लंड हें या ठिकाणीं युनायटेड किंग्डममध्यें न धरतां, तें डिपेन्डन्सीज आणि कॉलनीजमध्येंच धरलें पाहिजे. कारण आज जसे इतर जिंकलेले लोक आहेत, तसेच आयर्लंडचे लोकहि लेखले जात आहेत. व ब्रिटिश एम्पायरला किती भीति आहे, या प्रश्नाचा विचार जिंकलेल्या लोकांच्या संख्येच्या धोरणानें जेव्हां करावयाचा असेल, तेव्हां आयर्लंडच्या लोकसंख्येचा समावेश जिंकणाऱ्या लोकांत न करतां, जिंकलेल्या लोकांतच केला पाहिजे; व असें केलें म्हणजे जिंकणारे लोक ३,५४,८४,१७७ होतात, व जिंकलेल्या लोकांची संख्या ३४,९८,९५,९६३ होते. पण ही जिंकलेल्या लोकांची संख्या नुकतीच आणखीहि वाढली आहे. ट्रान्सवाल आणि ऑरेन्ज फ्री स्टेट येथील लोकसंख्याहि वरील आकड्यांत मिळविणें जरूर आहे. ती मिळविली असता ब्रिटिश एम्पायरमधील एकंदर जिंकलेल्या लोकांची संख्या ३५,१०,९७,६२२ होते म्हणजे आज ब्रिटिश एम्पायरमध्यें जिंकणारे साडे तीन कोटी आणि जिंकलेले पस्तीस कोटी लोक आहेत असें होतें. व एक जिंकणारा व दहा जिंकलेले, असें यावरून प्रमाण दुसऱ्या कोणत्याहि राज्यांत अगर साम्राज्यांत नाहीं, हें वरील कोष्टकावरून उघड दिसून येईल. व कोष्टकांत जीं राज्यांचीं नांवें दिलीं आहेत त्यांच्याशिवाय अधिक मोठीं राज्यें जगाच्या पाठीवर कोणतींहि नाहींत, तेव्हां यावरून उघड असा अर्थ झाला कीं, एक जिंकणारा आणि दहा जिंकलेले, असें विलक्षण अघटित, आणि भीतिप्रद प्रमाण जगाच्या पाठीवर दुसऱ्या कोठेंहि नाहीं. पूर्वीच्या इतिहासांत मोठमोठीं साम्राज्यें होऊन गेलीं. असीरिया, रोम, स्पेन, वगैरेचीं पूर्वीं फार विस्तीर्ण साम्राज्यें होतीं. परंतु त्या वेळची लोकसंख्या निश्चयात्मक रीतीनें कोठें दिलेली नसल्यामुळें त्यांनीं या बाबतींत किती कहर उसळून सोडला होता हें समजणें कठीण आहे. तेव्हां आजच्या उपलब्ध माहितींत आमच्या इंग्रजांचाच पहिला नंबर लागतो, यांत संशय नाहीं.

वरील विवेचनावरून दृष्टोत्पत्तीस येणारी ब्रिटिश साम्राज्याची स्थिति कोणत्याहि प्रकारें समाधानकारक नाहीं, असें म्हटल्याशिवाय कोणाच्यानेंहि राहवणार नाहीं. हा इंग्रजी साम्राज्याचा मनोरा फार भव्य व उंच होत आहे खरा; पण मनोरे बांधण्याचा नियम असा आहे कीं, बुंधाशीं त्यांची जितकी

लांबीरुंदी असेल, त्याच्यापेक्षा लांबीरुंदीचा घेर वर अधिक अधिक वाढत जातां कामां नये, तर तो कमी कमीच होत गेला पाहिजे. जर कोणी या नियमाकडे दुर्लक्ष करून आपल्या मनोऱ्याचा घेर वर अधिक अधिक वाढ-वीत जाईल, तर गुरुत्वाकर्षणाचा कायदा त्याचें कधीं ऐकणार नाहीं. आणि तो त्या मनोऱ्याला केव्हां तरी खालीं ओढल्यावांचून राहणार नाहीं, सृष्टीचे नियम मोडून आणि गुरुत्वाकर्षणाचा उपमर्द करून जर एखादा मनोरा आपलें डोकें वर उचलूं लागला, तर ते मोडलेले सृष्टीचे नियम आणि ते उपमर्द पावलेले गुरुत्वाकर्षणाचे कायदे, त्या मनोऱ्यावर आपला सूड उग-विल्यावांचून व त्या मनोऱ्याचें वर निघणारें डोकें जमीनदोस्त केल्यावांचून कधींहि राहणार नाहींत. व जे नियम मनोरा बांधतांना गवंड्यांनीं लक्षांत ठेविले पाहिजेत, तेच नियम राज्याची इमारत उभारतांना राज्यकारस्थानी पुरुषांनींहि लक्षांत ठेवले पाहिजेत. त्या नियमांचें उल्लंघन करणें दोघांनाहि श्रेयस्कर नाहीं. पण एक जिंकणारा आणि दहा जिंकलेले ही राज्याची इमारत म्हणजे पायाच्या बाहेर शिखराचा घेर जाणाऱ्या मनोऱ्यासारखीच आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. असल्या इमारतीला कोणता सोसाट्याचा वारा केव्हां खालीं पाडील, याचा नेम नाहीं. इतकी पतनोन्मुख इमारत कोणत्याहि राष्ट्रानें बांधली नाहीं, हें वरील कोष्टकावरून दिसतच आहे. मग आमच्या इंग्रजांनीं तरी ही राजकीय शिल्पशास्त्रांतील असंभाव्य रचना करण्याच्या भरीस काय म्हणून पडावें? बुंध औरस चौरस एक मैल व शिखर औरस चौरस दहा मैल असा न टिकणारा मनोरा आज उभारावा आणि उद्यां तो कोसळावा, यापेक्षां जी पायाची लांबीरुंदी त्याच्यापेक्षां शिखराची लांबी रुंदी कमी, असा पण चिरकाळ टिकणारा, असा मनोरा उभारण्यांत अधिक भूषण आहे.

एक जिंकणारा व दहा जिंकलेले ही स्थिति सुरक्षितपणाची आहे असें कधींहि म्हणतां यावयाचें नाहीं. एक जिंकणारा आणि दहा जिंकलेले म्हणजे एकाला दहा शत्रू असा अर्थ होतो. एखादा नवीन मुलूख जिंकून साम्रा-ज्याला जोडला म्हणजे आपण सर्व आनंदित होतो. पण त्याच्या दुसऱ्या बाजूकडे कोणाचेंहि लक्ष जात नाहीं. पण आपलें त्या दुसऱ्या बाजूकडे लक्ष गेलें नाहीं म्हणून ती दुसरी बाजू नसते असें मात्र नाहीं. ऑरेंज रिव्हर

कॉलनी ब्रिटिशसाम्राज्यांत सामील केली आहे म्हणून आपल्याला आनंद होत आहे. पण त्याबरोबर इंग्लंडला किती नवीन शत्रू झाले याचा आपण विचार करीत नाहीं. तेथील लोकांचें स्वातंत्र्य गेलें, यांत त्यांना कांहीं मौज वाटत असेल काय ? व आतां पारतंत्र्य उपभोगावयास सांपडणार, म्हणून त्यांना गुदगुल्या होत असतील काय ? नाहीं. असें कधींहि व्हावयाचें नाहीं, हें सृष्टिनियमाच्या आणि मनुष्यस्वभावाच्या विरुद्ध आहे. ते बाहेरून हंसतांना आंतून जळत असतील, बाहेरून माना वांकावितांना आंतून त्यांचें हृदय दुभंग होत असेल, ते राजनिष्ठेची नवीन शपथ घेत असतांना त्याना आपल्या जुन्या स्वतंत्रतेची आठवण होत असेल, व आपलीं शस्त्रें इंग्रजांच्या स्वाधीन करण्याकरितां आपल्या हातांतून खालीं ठेवीत असतांना, ‘ हीं आपण फिरून केव्हां हातांत घेऊं ! ’ असें त्यांना वाटत असेल. अशी स्थिति असेल, तर ऑरेंज रिव्हर कॉलनी आपल्या साम्राज्यांत सामील झाल्याबद्दल आनंद वाटण्यापेक्षां इतके अधिक शत्रू आपण आपल्या साम्राज्याला जोडून ठेविले म्हणून आपल्याला वाईट वाटलें पाहिजे. यावर कोणी असें म्हणेल कीं, आज ह्या लोकांच्या मनांत शत्रुत्व असलें तरी कांहीं दिवसांनीं तें जाऊन त्यांच्या मनांत मित्रत्व उत्पन्न होईल. पण ही कल्पना खोटी आहे. आपण जिंकलेले लोक आतां आपल्याशीं मित्रत्वानें वागूं लागले, अशी कांहीं दिवसांनीं सरकार आपल्या मनाची समजूत घालून घेतें. पण ही सरकारची समजूत चुकीची असते. सरकारची अशी कल्पना कशावरून होते ? तर कांहीं तोंडपुजे लोक स्वार्थ साधण्याकरितां हंसत हंसत सरकारच्या पुढें येतात, फार फार लवून मुजरा करतात, आणि ‘ त्वमेव सर्वं मम देवदेव । ’ इत्यादि स्तोत्रें त्यांच्यापुढें गातात. त्यावरून सरकारला वाटतें कीं आतां यांच्या-प्रमाणेंच सर्व लोकांच्याहि मनांतील किल्मिष गेलें असलें पाहिजे. पण कोणत्याहि राष्ट्रांत झालें तरी असले उदे उदे करणारे भुते किती असणार ! फार थोडे. त्यांच्यावरून बाकीच्यांच्या मनाची परीक्षा केल्यास ती खरी कशी ठरावी ? व लोक तरी आपल्या पूर्व इतिहासांतील सर्व गोष्टी विसरून जाऊन यांच्यावर कशी प्रीति करूं लागतील ? त्यांच्या पूर्वीच्या वैभवाचा विसर पडण्यासारखें काय झालेलें असतें ? त्यांचें गेलेलें स्वराज्य परत मिळा-लेलें असतें काय ? त्यांचे मृत्युमुखीं पडलेले राजे त्यांना फिरून मिळालेली

असतात काय? किंवा त्यांची नष्ट झालेली संपत्ति त्यांना फिरून मिळालेली असते काय? यांपैकीं जर कांहींच झालेलें नसतें, तर मग त्यांना त्याचा विसर पडणार कशानें? एक तोंडपुजा हंसला म्हणजे साऱ्या राष्ट्राच्या अंतः-करणांत आनंद आहे असें होतें काय? खुद्द त्या हंसणाऱ्या तोंडपुजाच्याहि अंतःकरणांत आनंद नसतो, मग तो इतरांच्या कोठून असणार?

याप्रमाणें स्वतंत्रता नष्ट होऊन साम्राज्यांत सामील झालेल्या लोकांच्या मनाला खरा आनंद न होतां उलटा उद्वेग होण्याचीं हीं मानवी कारणें झालीं. पण याशिवाय सृष्टींतीलहि अशीं कारणें आहेत कीं तीं परतंत्र झालेल्या मनुष्याच्या मनाला त्याच्या पूर्वीच्या स्वातंत्र्याचा कधींहि विसर पडूं देत नाहींत. पर्वत आणि समुद्र व डोंगर आणि नद्या, ह्या निरानिराळ्या राष्ट्रांच्या नैसर्गिक मर्यादा होत. हल्लीं ज्याला ब्रिटिश चॅनेल म्हणतात, त्या समुद्राचें पाणी ठेवण्याला परमेश्वराला दुसरी कोठें जागा नव्हती म्हणून त्यानें तें इंग्लंड आणि फ्रान्स यांच्यामध्यें आणून ठेविलें असें नाहीं. तर या पाण्याच्या ओघाच्या एका बाजूला इंग्रजांनीं नांदावें आणि दुसऱ्या बाजूला फ्रेंचांनीं सुखानें राहावें, म्हणूनच त्यानें तें तेथें ठेविलें आहे. आणि ज्याला भूगोला-मध्यें हल्लीं पिरीनिज पर्वत असें म्हणतात, त्या उंच ढिगाऱ्यांतील माती आणि दगड ठेवण्याला परमेश्वराला दुसरीकडे कोठें जागा नव्हती, म्हणून त्यानें ते फ्रान्स आणि स्पेन यांच्या दरम्यान आणून ठेविले, असें नव्हे; तर त्याच्या एका बाजूचा फ्रेंच लोकांचा मुलूख आणि दुसऱ्या बाजूचा स्पॅनिश लोकांचा मुलूख, असा विषयविभाग करण्याचीच त्यांत परमेश्वराची इच्छा होती, हें उघड आहे. ह्या ईश्वरानें आंखून दिलेल्या मर्यादा—हे पर्वत आणि हे समुद्र—हे डोंगर आणि ह्या नद्या—हीं स्वराज्याचा विसर पडत चाललेल्या लोकांना प्रत्येक क्षणीं झोपेंतून जागें करीत असतात. व 'आमच्या हद्दीच्या आंतमध्यें अस-लेला मुलूख हा देवानें तुम्हांला दिलेला आहे, हा तुमच्यासाठीं आहे, दुसऱ्या-साठीं नाहीं!' असें ते प्रत्येकाच्या कानीं कपाळीं ओरडत असतात! व जेव्हां पर्वत आणि समुद्र, व डोंगर आणि नद्या, हीं अशा रीतीनें ओरडूं लागतात तेव्हां त्या त्यांच्या ओरडण्यानें आणि त्या ओरडण्याच्या प्रतिध्वनीनें कानठळ्या बसून जात असतां, लोकांना पूर्वीच्या वैभवाचा विसर कसा पडणार? याप्रमाणें त्या त्या हद्दीवरील पर्वतांवरचे सोसाट्याचे वारे मनुष्यांच्या

मनांत वादळ उत्पन्न करीत असतां, आणि समुद्रांवरील भयंकर तुफानें मनुष्यांचीं मनें खवळून टाकीत असतां, त्यांना आपल्या पूर्वीच्या वैभवाचा विसर कसा पडेल ? जेव्हां पर्वत आणि समुद्र असें सांगतात, तेव्हां तें प्रत्यक्ष परमेश्वरच सांगत आहे, असें कोणाला वाटणार नाहीं ? यावरून सारांश इतकाच घ्यावयाचा कीं, पूर्वस्थितीचा कांहीं दिवसांनीं विसर पडतो अशी जी कल्पना आहे, ती खोटी आहे. व जर लोकांना पूर्वस्थितीचें स्मरण कायम आहे, तर ते नवीन अमलाचे खरे मित्र कधींहि होऊं शकणार नाहींत. म्हणजे ते गुप्त शत्रूच असले पाहिजेत असें होतें. व अशा दृष्टीनें पाहिलें म्हणजे आम्हीं, एकाला दहा शत्रू असें जें वर म्हटलें आहे, तेंच खरें होतें. कालगतीनें व ऐहिक फायद्याच्या लालचीनें कित्येक शत्रूंचे मित्र होतात हें खरें. पण हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, शंभरापैकीं पंचाण्णवांना स्वदेशभक्ति ( Patriotism ) समजते. व फक्त पांच जणांना साम्राज्यभक्ति ( Imperialism )चें महत्त्व कळतें. स्वदेशभक्तीनें एखाद्या गावढळाचेंहि मन तिळातिळ तुटत असतें, पण साम्राज्यभक्तीची गोडी लागण्याला वेदांतीच मनुष्य पाहिजे. स्वदेशभक्ति ही स्वाभाविक उत्पन्न होते. आणि साम्राज्यभक्ति ही उसनी आणावी लागते. या कारणांमुळेंहि साम्राज्यभक्तीचें पारडें लंगडें पडतें. म्हणून आमचें असें म्हणणें आहे कीं, एकाला दहा या प्रमाणावर साम्राज्य वाढविण्याचा जो इंग्रजांनीं प्रयत्न चालविला आहे, तो कितपत यशस्कर होणार आहे, याबद्दल वरील आंकड्यांवरून तरी निदान संशय येण्याला जागा आहे. दहांना खालीं दडपून एकाने त्यांच्यावर उभें राहणें हें कितपत टिकणार आहे याचा विचार करून, ही अशक्य गोष्ट शक्य करण्याच्या भरीस न पडतां, इंग्रजांनीं आजपर्यंत जें कमावलेलें आहे, तें दृढ करण्याचा जर ते प्रयत्न करतील, तर त्यांचा आणि त्यांच्या साम्राज्यांत जे लोक आहेत त्यांचाहि फायदा होणार आहे. म्हणून तें साम्राज्य दृढ करणें हें आपलेंहि कर्तव्यकर्म आहे, असें समजून आम्हीं त्यांतील दोष, ते सुधारले जावे म्हणून, स्पष्टपणें दाखवून दिले आहेत.

———

# दुष्काळाला कारण कोण ? : : ४

हिंदुस्थानांत अलीकडे वारंवार दुष्काळ पडूं लागल्यानें ते असे कां पडतात, या गोष्टीचीं कारणें शोधून काढण्याकडे पुष्कळ विद्वानांचें लक्ष लागलेलें आहे; व प्रत्येकजण आपापल्या बुद्धीप्रमाणें त्या कारणांचा ऊहापोह करीत आहे. या विषयावर वर्तमानपत्रांतून आर्टिकलें लिहिलीं आहेत, व्याख्यानांतून कंठ कोरडे पाडले जात आहेत, स्वतंत्र लहान पुस्तकें प्रसिद्ध करण्यांत पैसे फुकट दवडले जात आहेत, या विषयावर उत्तम निबंध लिहिणारांना बक्षीस देण्यासाठीं रकमा काढून ठेवण्यांत येत आहेत, दुष्काळ निवारण्याचें उपाय सुचविण्यांत येत आहेत, अशा प्रकारें लोकांकडून अनेक प्रयत्न होत आहेत. पण इतकेंच नव्हे, तर खुद्द सरकारनेंहि या दुष्काळाचीं कारणें काय व त्यांचें कसें निवारण करावें, याविषयीं कमिशन बसवून तें विचार करीत असतें. हा क्रम आज कैक वर्षें चालला आहे. तरी पण दुष्काळ पडण्याचा क्रम अजून बंद होत नाहीं. मोठमोठया गृहवैद्यांचीं आणि राजवैद्यांचीं औषधें चालू असतां जर रोग हटत नाहीं असें कोणाला दिसलें, तर अशा ठिकाणीं त्या वैद्यांना त्या रोगाचें निदानच कळलें नाहीं, ह्यावांचून तो दसरें काय म्हणेल ? त्याचप्रमाणें ह्या हिंदुस्थान देशांतील दुष्काळाचे कारणांची अवस्था झाली आहे. कोणी कांहीं म्हणतो, कोणी कांहीं म्हणतो, पण खरें आणि साक्षात् कारण कोणीच कांहीं सांगत नाहीं. हें खरें आणि साक्षात् कारण फारसें खोल आहे असें नाहीं. एक भाकरी एका माणसाला पुरते, अशी आपण कल्पना करूं. आतां जर त्या भाकरीमध्यें दुसरा एक वांटेकरी आला, तर अर्थात् पूर्वीं जी एका मनुष्यासच सबंध भाकरी खावयास मिळत होती, ती

आतां दुसरा आल्यामुळें पहिल्याला अर्धीच मिळूं लागली; म्हणजे तो अर्धपोटी राहूं लागला, असा त्याचा अर्थ होतो आतां हा जो पहिला मनुष्य अर्धपोटी राहूं लागला, त्याच्या उपाशी राहण्याचें कारण काय, त्याच्या त्या दुष्काळाचें कारण काय, असा प्रश्न जर कोणाला केला, तर त्या उत्तरामध्यें कोणाचा तरी मतभेद पडेल काय ? इंग्रजसरकारच्या रॉयल कमिशनपासून तों तहत एखाद्या ल्हान पोरापर्यंत कोणालाहि हा प्रश्न विचारा; दुसरा मनष्य पहिल्याच्या उपासमारीचें कारण आहे असेंच तो सांगणार. पण हाच प्रश्न जरा निराळ्या स्वरूपामध्यें पुढें आणा, म्हणजे सर्वांच्या बुद्धीला जणूं काय भ्रम पडल्यासारखा होतो. आणि बुकांतलेंच उदाहरण आंकडे बदलून घातलें असतां ज्याप्रमाणें एखादा अज्ञ मुलगा परीक्षेंत गोंधळून जातो त्याप्रमाणें सर्व गोंधळून जातात. एका भाकरींत दोन वांटेकरी झाल्यानें पहिल्याची होणारी उपासमार आणि हिंदुस्थानांतील दुष्काळ याच्या कारणांत फारसा फरक नाहीं. तरी पण पहिल्याचीं कारणें बरोबर सांगूनहि दुसऱ्याचीं सांगतं वेळीं ल्हान पोरापासून तों रॉयल कमिशनच्या मेंबरापर्यंत सर्वजण एकसारखेच गोंधळून जातात. आगगाडीच्या एका कंपार्टमेंटमध्यें दहा माणसांना बसण्याकरितां जागा असते, त्यांत आधींच दहा माणसें बसलेलीं असतां आणखी दहा माणसें त्यात येऊन बसलीं, तर तेथें होणाऱ्या गर्दीचें कारण कोण ? असा प्रश्न विचारला, तर मागून तेथें येऊन बसलेलीं १० माणसें त्या गर्दीचें कारण होत, याशिवाय दुसरें कांहीं उत्तर कोणाच्या तरी तोंडून येईल काय ! पण ह्याच प्रश्नांत थोडेसें रूपांतर करून त्यांना असा प्रश्न विचारा कीं, हिंदुस्थानांतील दुष्काळाचें कारण काय ? म्हणजे चांगले शहाणेसुरते लोकदेखील कसे भलतीकडे वाहवत जातात तें पहा. मग त्यांची मति इतकी गुंग कशानें होत असेल ती होवो; दिवसास उजेड पडला तर त्या उजेडाचें कारण सूर्य आहे. आणि रात्रीं काळोख पडला तर त्या काळोखाचें कारण सूर्याचा अभाव हें आहे. हें सांगणें जितकें सोपें आहे तितकेंच हिंदुस्थानच्या दुष्काळाचें कारण सांगणें फार सोपें आहे. पण हा सोपेपणा कोठें प्रत्ययाला येत नाहीं ह्याचें मोठें आश्चर्य वाटतें. नाहीं म्हणायला मि. दादाभाई नवरोजी यांनीं मात्र वॉल्थॅमस्टो येथें हिंदुस्थानांतील दुष्काळाचें खरें आणि साक्षात् कारण तेथील इंग्रजी लोकांच्या पुढें नुकतेंच सांगितलें आहे. ते म्हणतात कीं,

तुम्ही परकीय इंग्रज लोक हिंदुस्थानावर राज्य करीत असल्यामुळें त्याचा स्वाभाविक परिणाम असा होतो कीं, एकंदर हिंदुस्थानचें उत्पन्न शंभर कोटी रुपये असले, तर त्यांतील कमींत कमी वीस कोटी रुपये तरी निदान प्रत्येक वर्षी इंग्लंडमध्यें जातात. ह्याशिवाय इंग्लंडचे लोक हिंदुस्थानांत येऊन नेटिवांच्या तोंडचें काढून त्यावर आपली चैन चालवितात ती निराळीच. परकीय अमलामध्यें हा इतका दोष असावयाचाच व तो बहुतेक अंशीं अपरिहार्यच आहे; व त्याबद्दल कोणाचेंहि झालें तरी एवढेंच म्हणणें असणार कीं, असल्या ढळढळीत दोषावर पांघरूण घालण्यांत कांहीं अर्थ नाहीं. जो आहे त्याला दोष असें म्हणूनच पुढें चालण्यांत जो उदात्तपणा आहे, तो त्या नैसर्गिक दोषांच्या छपवाछपवीमध्यें नाहीं. सरकारचा दुष्काळावरील कमिशनचा रिपोर्ट घेतला, तर त्यांत ज्या अनेक कारणांचीं भारुडें लाविलीं आहेत, त्यांत ह्या मि. दादाभाई नवरोजींनीं सांगितलेल्या कारणाचा कोठें तरी अंतर्भाव केलेला आढळतो काय?

परकीय राजांच्या अतोनात खर्चाची राज्यपद्धत हेंच दुष्काळाचें अनेक मुख्य कारणांपैकीं एक असतांना, त्याच सरकारानें कमिशन नेमून दुष्काळांच्या कारणांची चौकशी करणें म्हणजे ह्याचा अर्थ कसा होतो बरें? दुसऱ्यांच्यांतील निम्मी भाकर खाऊन ढेकर देऊन पोटावर हात फिरवीत आणि मुखशुद्धीच्या ऐवजीं विडीच्या धुराचे झुरके ओढीत, 'तात्या, आतांशा तुम्ही अगदीं रोड कां बरें दिसत चालला? तुम्हाला कांहीं तरी औषध दिलें पाहिजे,' असें म्हणण्यासारखीच वरील कमिशनें नेमण्याची कृति नाहीं काय? ज्या कंपार्टमेंटमध्यें आधींच दहा माणसें बसलीं आहेत, तेथें शिरून त्यांच्या जाग्यावर आपण बसून, आपलें सामानसुमान नीट लावून, टेंकून बसून आणि हात पाय पसरून, मग आपल्यामुळें ज्यांना उभे राहावें लागलें आहे त्यांच्याकडे सदय अतःकरणानें पाहून, आणि त्यांचे पाय दुखत असतील म्हणून दयेचा पाझर फुटून, त्यांना म्हणावयाचें कीं, 'कां हो तात्या, तुम्हांला उभे राहावें लागतें ह्याचें कारण काय बरें असावें? अलीकडे ह्या आगगाड्यांचे डबे फार लहान करूं लागले आहेत, हें या गर्दीचें कारण असावें, असें तुम्हांला वाटत नाहीं काय?' अशासारखीच ही कमिशनें नेमण्याची कृति नाहीं काय? छत्री ही बहुधा एका माणसाचेंच पावसा-

पासून रक्षण होण्याच्या बेताची केलेली असते. ती छत्री एकजण घेऊन चालला असतां तिच्यांत जर दुसरा घुसला, तर अर्थातच पहिल्या इसमाचें अंग पावसानें भिजल्यावांचून राहणार नाहीं. पण तसें अंग भिजलेलेंहि एक वेळ पुरवेल. पण दुसऱ्याच्या छत्रींत शिरून त्याचें अंग भिजविण्याला कारणीभूत होऊन फिरून त्याच्या पाठीवरून कुरवाळून ममतेनें विवळून जाऊन म्हणावयाचें कीं, ' अरेरे ! काय हो हें तात्या ! तुमचें सारें अंग की हो पावसानें भिजविलें आहे ! ह्याचें कारण काय बरें असावें ? तुम्ही छत्री डोकीवर असतांना इतके भिजलांत तेव्हां अलीकडे पाऊस आकाशांतून खालीं न पडतां जमिनींतून तर वर येत नसेल ना ? ' अशासारखीच हीं कमिशनें नेमण्याची कृति नव्हे काय ? कमिशनें जीं कारणें सांगतात, तीं दुष्काळाचीं अंशत:देखील कारणें नसतात असें नाहीं. पण हीं कमिशनें राजाच्या घरच्या राजवैद्यांसारखीं होत. ह्यांना राजाला गोड गोड औषधें देण्याची संवय लागलेली असते. ' अप्रियस्य च पथ्यस्य श्रोता वक्ता च दुर्लभः । ' या न्यायानें राजाला त्याचे खरे दोष सांगणारा आणि कडू औषध देणारा भेटणें दुर्मिळच आहे. दुष्काळाचीं जीं कारणें कमिशनमध्यें ठरलीं जातात त्यांचाच अनुवाद वर्तमानपत्रांच्या लेखांतून आणि वक्त्यांच्या भाषणांतून होऊं लागतो व तींच मतें लोकांत पसरतात, व याचा परिणाम असा होतो कीं दुष्काळाचीं खरीं कारणें एकाच बाजूला राहून, भलत्याच कारणांना अनुलक्षून उपायांची योजना होऊं लागते. दुखत असतें पोटांत आणि आल्याचा रस चोळला जातो डोक्याला, म्हणजे त्यापासून दुप्पट त्रास. पोटांत दुखावयाचें तें दुखतेंच आणि आल्याच्या रसानें कपाळाची आग होते ती निराळीच.

हिंदुस्थानांतील शेतकऱ्यांची वाईट स्थिति, हें एक दुष्काळाचें कारण म्हणून सांगण्यांत येतें. पण या शेतकऱ्यांची वाईट स्थिति केली कोणीं ? ह्या प्रश्नावर सरकारतर्फेचें उत्तर ठरलेलें आहे. सरकार म्हणतें, ती सावकारांनीं केली. पण ह्यांत सत्य नाहीं. हिंदुस्थान देश ही एक विहीर आहे, अशी कल्पना करा. हिच्यामध्यें पाणी वर काढण्याच्या बंबाची एक नळी आंत सोडलेली आहे व त्या बंबाचे दांडे हालवून पाणी वर शोषून घेण्याचा एकसारखा सपाटा लागला आहे. व त्याचा परिणाम असा झाला आहे कीं,

त्या विहिरींतील बहुतेक पाणी आटत चाललें आहे. असें होतां होतां अगदीं तळच्या नळीच्या पांच दहा फूट पोकळींमध्यें पाणी मुळींच उरलें नाहीं. अशा स्थितींत आतां असा प्रश्न उद्भवला आहे कीं, ह्या तळच्या दहा फुटांमधील पाणी झालें काय ? पाणी वर शोषून घेणारा गृहस्थ ह्याचें उत्तर असें देतो कीं, खालच्या दहा फुटांतलें सारें पाणी त्याच्या वरच्या दहा फुटांमध्यें येऊन भरलेलें आहे. हें त्यानें उत्तर खरें आहे. पण खोटेंहि नाहीं काय ? ह्या गृहस्थानें हें सगळें पाणी वर शोषून घेतलें, म्हणून खालच्या दहा फुटांतलें पाणी वरच्या दहा फूट जागेंत येऊन राहिलें, असें नाहीं काय ? जसे पाण्याचे थर असतात तसेच समाजाचे थर आहेत. त्यांतून द्रव्यरस जर कोणी शोषून घेऊं लागला, तर अर्थातच समाजाचे अगदीं खालचे थर पहिल्यानें कोरडे पडणार. पण त्याबद्दल त्याच्यावरचे थर म्हणजे सावकार, हे वास्तविक जबाबदार नसून, त्या बंबाचा दांडा हलविणारें सरकार हेंच जबाबदार आहे. अशी जरी वास्तविक स्थिति आहे, तरी शेतकऱ्यांची दैन्यावस्था हेंच दुष्काळाचें कारण आहे असें मानून कित्येक वेडेपीर त्यावर औषधाची योजना करूं पाहात आहेत. सारांश, कोणी झुकानेवाला मिळेल तर आमची हिंदुस्थानी दुनिया पाहिजे तशी झुकण्याला तयार आहे. व याचें एक ताजें उदाहरण दिवाणबहादुर आर. रघुनाथराव यांनीं पुढें आणिलें आहे. यांनीं दुष्काळाचीं अठरा वीस कारणें सांगितलीं आहेत. त्यांतच ते ज्या राष्ट्रीय सामाजिक परिषदेचे नांवाचे सेक्रेटरी आहेत, त्यांतील बालविवाह हें एक दुष्काळाचें कारण आहे, असें त्यांनीं प्रतिपादन केलें आहे. घटाचें कारण काय ? तर शास्त्रीबोवा म्हणाले, 'रासभ' ( गाढव ); कारण घटाची मृत्तिका आणण्याला रासभ लागतो कीं नाहीं, हें तर्कशास्त्रांतील जितकें हास्यास्पद कारण आहे, तितकेंच दुष्काळाचें बालविवाह हें कारण हास्यास्पद आहे. पण खरीं कारणें टाकून अन्यथासिद्ध कारणांकडे या एका रावबहादुरांचीच प्रवृत्ति झालेली आहे असें नाहीं. किंबहुना अन्यथासिद्ध कारणाकडे लक्ष आणि उपादान कारणांकडे दुर्लक्ष झालें, म्हणजेच रावबहादुरी मिळत असते. आर. रघुनाथराव हे सत्यप्रियतेचा ऱ्हास, हें एक दुष्काळाचें कारण म्हणून सांगतात. सत्ययुगांत सत्याला किंमत असेल पण हल्लींच्या ह्या कलियुगांत सत्याला काय किंमत आहे ? सत्य बोलल्या-

पासून कोणाला पगार वाढला आहे, किंवा कोणाला पदवी मिळाली आहे ? खुद्द रावबहादूर जे सत्याची प्रौढी गातात, त्यांनी तरी हीं दुष्काळाचीं कारणें सांगतांना सर्व सांगितलें आहे काय ? हिंदुस्थानांत येऊन लक्षावधी इंग्रज लोक आम्हांला वांटेकरी झाले नसते, तर आमची भाजीभाकरी आम्हांला पुरली असती, हें उघड आहे. तेव्हां ही परकीय राजांची आणि त्यातून अति खर्चाची राज्यपद्धति येथील दुष्काळाचें मुख्य कारण होय, ही जी गोष्ट एखाद्या लहान मुलालाहि समजते, ती रावबहादुरांच्या लक्षांत आली नसेल असें मानणें शक्य नाहीं. तेव्हां हें कारण त्यांच्या लक्षांत येऊन त्यांनीं सांगितलें नाहीं म्हणजे त्यांनीं सर्व सत्य सांगितलें नाहीं असें होत नाहीं काय ? अशी जर मोठमोठ्या रावबहादुरांची स्थिति आहे, तर मग सत्यप्रियतेचा ऱ्हास न होईल तर काय होईल ?

मि. दादाभाई नवरोजी यांच्याच बहुतेक शब्दांनीं आम्हीं वरील दुष्काळाचें खरें आणि साक्षात् कारण सांगितलें आहे. दुष्काळाचें कारण म्हटलें म्हणजे त्याचें निवारण ही कल्पना त्याच्या पाठोपाठ येतेच. पण इंग्रजांपासून हिंदुस्थानाला इतके फायदे झाले आहेत व पुढें इतके होण्याचा संभव आहे कीं, त्यांच्यामुळें जरी इकडे कधीं कधीं दुष्काळ पडले, तरी देखील त्यांचें आम्हांला फारसें वाईट वाटत नाहीं. त्यांच्या यांत्रिक कला, त्यांच्या राजकीय संस्था, त्यांचें उदात्त वाङ्मय, आणि त्यांचें गहन तत्त्वज्ञान यांची आम्हांला अजून इतकी गरज आहे कीं, त्यासाठीं आम्हांला कांहींहि खर्च पडला तरी तो करणें भाग आहे. म्हणून त्यांतल्या त्यांत आमची इंग्रजांपाशीं एवढीच विनंति आहे कीं, तुमचें राज्य बोलून चालून परकीय तर खरेंच, परंतु तरी देखील तुम्ही आम्हांला तें स्वकीय असें भासविण्याचा जो स्तुत्य प्रयत्न करीत आहां, त्यांतल्या त्यांत आमच्यांतील उपाशी मरणाऱ्या गरिबांवर जरा विशेष कृपादृष्टि असूं द्या. व राज्यकारभारांतील खर्च कमी केला, विलायतेला पैसा न पाठवितां येथला पैसा येथेंच राहूं दिला, व नेटिवांना मोठ्या चाकऱ्या दिल्या, म्हणजे ही गोष्ट साध्य होण्यासारखी आहे.

---

## शिंदे सरकार आणि इंग्रज सरकार : : ५

वाचकांना ही गोष्ट कळून चुकलेली असेल कीं, चीन देशांत हल्लीं जी लढाई सुरू झाली आहे, त्या लढाईंत इंग्रजांना मदत करण्यासाठीं आपले शिंदे सरकार पुढें आले असून त्यांनीं एक हॉस्पिटलशिपच्या खर्चासाठीं म्हणून वीस लक्ष रुपये देण्याचें अभिवचन दिलें आहे. व लॉर्ड जॉर्ज ह्यामिल्टन यांनीं त्याजबद्दल 'प्रतिगृण्हामि' असें प्रतिवचनहि दिलें आहे. त्याचप्रमाणें बडोद्याचे गायकवाड सरकार जे हल्लीं विलायतेंत आहेत त्यांनींहि अशाच प्रकारची कांहीं देणगी पुढें केली आहे ह्या देणग्यांबद्दल इकडे बरीच चर्चा हल्लीं चालू आहे. हिंदुस्थानांत हल्लीं भयंकर दुष्काळ पडलेला आहे. अशा वेळीं आपल्या देशांतील लोकांना मदत करावयाची टाकून, शिंदेसरकारांनीं आपल्या औदार्याचा ओघ इंग्लंडकडे वळविला, ही खरोखर वाईट वाटण्यासारखीच गोष्ट आहे. हिंदुस्थानात इंग्रजांच्या कृपेनें बरेच खरोखरीचे महाराज अस्तित्वांत आहेत. त्यांपैकीं ग्वाल्हेरचे महाराज आणि जयपूरचे महाराज हे बरेच प्रमुख होत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण या दोघां महाराजांची कृती पाहिली तर ती किती एकमेकांच्या विरुद्ध ! जयपूरच्या महाराजांनीं १५ लक्ष रुपये दुष्काळासाठीं हिंदुस्थानाला दिले आणि ग्वाल्हेरच्या महाराजांनीं २० लक्ष रुपये लढाईसाठीं इंग्लडला दिले. आणखी दोघांच्या कृतींमध्यें एक विषेश फरक आहे तो हा कीं, ट्रान्सव्हालमध्यें लढाई चालली असतांना जयपूरच्या महाराजांनीं हिंदुस्थानांतील लोकांचे प्राण वांचाविण्यासाठीं आपले पैसे पुढें केले, आणि ग्वाल्हेरच्या महाराजांनीं हिंदुस्थानांत दुष्काळानें लोक मरत असतांना आपले पैसे चिनी लोकांना मारण्याच्या कामीं मदत करण्यासाठीं दिले.

एकाच्या कृत्याबद्दल हिंदुस्थानांतील उपाशी मरणारे लोक त्यांना दुवा देतील, आणि दुसऱ्याच्या कृत्याबद्दल स्वातंत्र्याला मुकणारे चिनी लोक त्यांना शाप देतील. हिंदुस्थानांत दुष्काळ पडला असतांना तेथील लोकांना ज्याप्रमाणें जयपूरच्या महाराजांनीं मदत केली आहे त्याचप्रमाणें त्यांना मदत करणारे दुसरेहि महाराज आहेत. सर्वच ग्वाल्हेरच्या किंवा बडोद्याच्या महाराजांसारखे नाहींत. दुष्काळाच्या बाबतींत इंदरचे होळकर महाराज यांचेंहि नांव लोकप्रिय झालेलें आहे. परन्तु असल्या महाराजांवर सरकारचें फारसें प्रेम नाहीं. इंदूरच्या महाराजांनीं कोणकोणत्या ठिकाणीं लोकांना अन्न वाटलें किंवा इतर रीतीनें दुष्काळांतील लोकांना मदत केली, याबद्दल सरकार गुप्तपणें चौकशी करीत आहे, असें वर्तमानपत्रांतून वाचल्याबद्दल पुष्कळाना आठवत असेल. दुष्काळांत लोकांना मदत करणारांवर सरकारचा इतका कडक डोळा असतो, असें दृष्टोत्पत्तीस आल्यानंतर कोणत्या मळमळीत महाराजांची दुष्काळपीडितांना मदत करण्याची छाती होणार आहे? ह्याचा परिणाम असा होतो कीं, स्वाभाविकपणेंच हिंदुस्थानांतील महाराज हिंदुस्थानांतील लोकाचे प्राण वांचविण्याच्या भानगडींत न पडतां इंग्रजांबरोबर परकीयांचे प्राण घेण्याच्या सत्कृत्याकडे ते आपलें सर्व तनमनधन अर्पण करितात. या कामीं वास्तविक पाहिलें असतां इंग्रज सरकारनें आमच्या हिंदुस्थानांतील महाराजांच्या औदार्याला आळा घातला पाहिजे. पण इंग्रज सरकार हें इतर सर्व गोष्टींपेक्षां पैशाचे जरा जास्त लोभी असल्यामुळें तस करणें अगदीं दुरापास्त होतें. पण हल्लींच्या प्रसंगीं तरी निदान त्यांनीं आपल्या लोभी स्वभावाला दाबांत ठेवावयास पाहिजे होतें. व निदान दुसऱ्या कोणत्या कारणासाठीं नसलें, तरी एका महत्त्वाच्या कारणासाठीं, इंग्रज सरकारनें हल्लींच्या या वीस लाखाच्या दक्षिणेचा प्रतिग्रह करावयाचा नव्हता. दुष्काळासाठीं हिंदुस्थानाला इंग्लंडनें कांहीं रक्कम फुकट द्यावी म्हणून पार्लमेंटमध्यें प्रश्न आला असतांना त्यासंबंधानें हिंदुस्थानाला फुकट रक्कम देतां येत नाहीं, हिंदुस्थानाला पाहिजे तर कर्ज काढण्याची मोकळीक आहे, हें आपण दिलेलें उत्तर इंग्लंडनें इतक्या लवकर विसरतां कामा नव्हतें. ज्यानें हिंदुस्थानाला धर्मादाय मदत देण्याची सवड नाहीं म्हणून सांगितलें, त्याला हिंदुस्थानापासून वीस लाखांची दक्षिणा घेण्याचा काय अधिकार आहे? हा विचार वास्तविक कोणाच्याहि मनांत आला असता, पण

लॉर्ड जार्ज हॅमिल्टन यांची बुद्धि त्या वेळेला कोठें गेली होती कोण जाणे. त्यांच्याकडे ही वीस लाखांची देणगी आल्याबरोबर त्यांची मान खांद्याकडे वळली. हिंदू लोकांमध्यें अशी एक चाल आहे कीं, कोणाच्या घरीं उपनयनाचें मंगलकार्य निघालें, म्हणजे उपनयन झालेल्या मुलाच्या पायाचें तीर्थ घेऊन त्याला भिक्षावळ घालावयाची. तसाच कांहींसा प्रकार आमच्या इंग्रज सरकारचा अलीकडे होत आहे असें दिसतें. ह्या एक दोन वर्षांत आमच्या इंग्रजांच्या घरीं मंगलकार्यें बरींच निघालीं, व एक संपलें नाहीं तोंच दुसऱ्याला सुरुवात होत आहे. ह्या ट्रान्सवालाच्या, चीनच्या वगैरे इंग्रजांच्या दूरच्या मंगलकार्यांत त्यांना भिक्षावळ घालून त्यांच्या पायांचें तीर्थ घेऊन आपण पुनीत व्हावें, असें त्यांचें आप्तसोयरे वगैरे जे हिंदुस्थानचे राजे त्यांना नेहमीं वाटत असतें. हा एक शिष्टाचारच होऊन बसला आहे. व तो इतका दृढ झाला आहे कीं त्याचें उल्लंघन करण्याची छाती फारच थोड्या राजांना होते. ही वाईट संवय हिंदुस्थानांतील राजांना प्रथमतः इंग्रजांनींच लावून दिली. व आतां तिचा ग्वाल्हेरच्या महाराजांच्या हातून जेव्हां अतिरेक झाला, तेव्हां लंडन टाईम्स वगैरेसारख्या पत्रकारांचे डोळे उघडून ते असल्या प्रकाराविरुद्ध लेख लिहूं लागले आहेत. इंग्लंडनें हिंदुस्थानासाठीं पुष्कळ चांगल्या गोष्टी केल्या आहेत व त्याबरोबर कांहीं वाईटहि झाल्या आहेत. पण त्या सर्वांत वाईट ही आहे कीं, इंग्रजांनीं हिंदुस्थानांतील राजांना आणि लोकांना तोंडपुजेपणांत पहिला नंबर मिळविण्याच्या नादीं वाजवीपेक्षां फाजील लावून ठेविलें आहे. त्याचा हा सर्व परिणाम आहे. ग्वाल्हेरच्या महाराजांसारख्या सुज्ञ राजांना आज इंग्लंडपेक्षां हिंदुस्थानाला आपल्या वीस लाख रुपयांची अधिक गरज आहे, हें समजलें नसेल असें नाहीं. पण समजून काय उपयोग ? लहानपणापासूनचें शिक्षण, सद्यःकालांत भोंवतालची परिस्थिति वगैरे गोष्टींचें नेटिव राजांच्या भोंवतीं इतकें वेष्टन असतें कीं, तें तोडून टाकणें हें सामान्य प्रतीच्या राजांना फार दुरापास्त असतें. ते पडलेल्या चालीपुढें आपली मान वाकवितात आणि द्यावयाची तेवढी भिक्षावळ देऊन आनंदानें स्वस्थ बसतात. आसपासचे व वरचे अधिकारी तसे असतात, म्हणून राजांना आणि महाराजांनाहि त्यांच्याच कलानें वागणें भाग पडतें. परंतु लॉर्ड कर्झनसारखे अंमलदार असतील तर

असले प्रकार बंद होण्याचा कांहीं संभव आहे. कर्झनसाहेब हल्लीं गुजराथें-तील दुष्काळाची स्थिति पाहण्याकरतां सुरत, भडोच, आमदाबाद वगैरे ठिकाणीं आलेले आहेत. व आपल्या प्रवासांत आपल्यास कोणीं मानपत्रें देऊं नयेत, आपल्यासाठीं कोणीं दारू उडवूं नये, किंवा आपल्यासाठीं कोणीं कमानी उभारूं नयेत, म्हणून सक्त हुकूम त्यांनीं सोडले आहेत. ह्या त्यांच्या कृतीनें तोंडपुजे लोकांची बरीच निराशा होत आहे. कर्झनसाहेबासारखे बडे लाट साहेब एखाद्या शहरीं येऊन, तेथील लुडबुड्या तोंडपुजांना पुढें पुढें करण्याची संधि न यावी, ही एक प्रकारें मोठी दुःखाची गोष्ट आहे. वकील आहे तो कोर्टांत काम करून पुढें येईल. ग्रॅज्युएट आहे तो आपली बुद्धिमत्ता दाखवून पुढें येईल आणि श्रीमंत आहे तो आपले पैसे सत्कर्मी खर्च करून लोकांच्या पुढें येईल, पण ज्यांच्यापाशीं ह्यांपैकी कांहींच नाहीं, तर केवळ साहेबांच्या तैनातीवर ज्यांचा चरितार्थ, साहेबाच्या पुढें पुढें करण्यांत ज्यांचें वर्चस्व आणि साहेबांचा तोंडपुजेपणा करण्यापासून ज्यांचा उत्कर्ष अशा बिनअकली आणि बिनभांडवली तोंडपुजांनीं काय करावें ! त्यांनीं खानसाहेब किंवा रावबहादूर कशानें व्हावें ! त्यांना दुसरीं काय बरें साधनें आहेत ! कर्झनसाहेब, तुमच्या या ठरावानें अकलेवांचून रावबहादूर होऊं इच्छिणाऱ्या ह्या तोंडपुजे लोकांना किती दुःख होत असेल, याची तुम्हांला क्वचितच कल्पना असेल ! ह्या लोकांची अशामुळें फार निराशा होतें हें खरें. पण त्यापासून इतर लोकांचें बरेंच कल्याण होतें. व सर्वांत मुख्य फायदा हा होतो कीं, लोकांना साधेपणाचें वळण लागतें. खुद्द यजमानांनांच डामडौलाची हौस नसली म्हणजे खालील अधिकाऱ्यांना ती असली तरीं गुंडाळून ठेवावी लागते. कर्झनसाहेबासारखे जर सगळे हिंदु-स्थानचे गव्हरनर जनरल आणि स्टेट सेक्रेटरी असते, तर ही मंगलकार्याच्या वेळीं भिक्षावळ घालण्याची जी रूढि अनावर झालेली आहे, ती खरोखर अस्तित्वांत देखील आली नसती. जसें लॉर्ड कर्झन साहेबांचें उदाहरण आहे, तसेंच दुसरें एक उदाहरण अभिनंदनाला योग्य असें आज आपल्या डोळ्यांपुढें आहे, आणि तें उदाहरण आपल्या हिंदुस्थानांतील नेटिवांपैकीं आहे; म्हणून आपल्याला त्यांत विशेष आनंद आहे. हैद्राबादचे निजाम सरकार यांचा वाढदिवस हल्लीं अगदीं जवळ आलेला असून त्याबद्दल निजामशाहींत चोहोंकडे आनंद प्रदर्शित करण्यासाठीं जारीनें तयारी चालू होती. परंतु निजामसरकारानें असा हुकूम

फर्माविला आहे कीं, सालमजकुरीं दुष्काळ असल्यामुळें वाढदिवसानिमित्त होणार सर्व खर्च दुष्काळपीडितांना मदत करण्याकडे लावावा. असा हुकूम झाल्यामुळें लोक लिहिलेलीं मानपत्रें फाडून टाकीत आहेत, आणि उभारलेल्या कमानी मोडून टाकीत आहेत. पण ह्या कमानी जरी मोडल्या, तरी उपाशी मरणाराला अन्न देणाराची कमान स्वर्गलोकापर्यंत जाते, हें निजाम सरकाराला चांगलें समजलेलें आहे. ग्वाल्हेरच्या महाराजांना अजून तें शिकावयाचें आहे. ऐहिक मनोविकारांत गुरफटून गेल्यामुळें स्वर्गापेक्षां इंग्लंडच उंच आहे, असें त्यांना वाटत आहे. पण स्वर्ग हा आपली इंग्लंडपेक्षां अधिक असलेली उंची केव्हांतरी व्यक्त करून दाखविल्यावांचून राहणार नाहीं. जयपूरचे महाराज, इंदूरचे महाराज, हैद्राबादचे निजाम आणि हिंदुस्थानचे कर्झनसाहेब हे सारे महात्मे काय करीत आहेत, आणि ग्वाल्हेरचे महाराज काय करीत आहेत, हें पाहिलें म्हणजे ग्वाल्हेरच्या महाराजांची कींव येते. ट्रान्सवालच्या लढाईचे वेळीं ग्वाल्हेरच्या महाराजांनीं घोडे देण्याच्या कामीं असेंच औदार्य दाखविलें होतें. पण ते घोडे आज कोठें आहेत ? कदाचित् त्यांच्यांतील कित्येकांवर दक्षिण आफ्रिकेंतील गिधाडे धष्टपुष्ट झालीं असतील. त्या वेळच्या व ह्या वेळच्या महाराजांच्या उदार देणग्यांवरून त्यांची राजनिष्ठा व्यक्त होत असेल, पण आपल्या देशबांधवाविषयीं कळकळ मुळींच व्यक्त होत नाहीं, हें फार वाईट आहे. महाराज पाहिजे तितकी रक्कम देण्याला आणि हॅमिल्टनसाहेब ती घेण्याला मुखत्यार आहेत; त्यांत तिऱ्हाइतांना बोलण्याचें कारण नाहीं, हें खरें. पण ह्या महाराजांच्या देणगीमुळें असा परिणाम झाला आहे कीं, बाप जेऊं घालीत नाहीं आणि आई भीक मागूं देत नाहीं, अशी गरीब लोकांची स्थिति झाली आहे. महाराज गरीबांना पैसे देत नाहींत ते नाहींतच; व हिंदुस्थानांतील राजांपाशीं दुष्काळाच्या वेळींहि अशा कामीं उधळण्याला पैसे आहेत असें पाहून, बाहेरचे लोक येथील गरिबांना मदत करण्याला काकूं करूं लागले आहेत. म्हणून या बाबतींत तिऱ्हाइतांना बोलण्याचा प्रसंग येतो. इकडे लक्ष देऊन हिंदुस्थानांतील महाराजांनीं माणसें मारण्याच्या कामीं आपले पैसे न उधळतां माणसें जग-विण्याच्या कामीं त्यांचा उपयोग केल्यास बरें होईल. ह्या योगानें हॅमिल्टन साहेब खूष होतील किंवा न होतील, हें सांगतां येत नाहीं; पण परमेश्वर खास होईल.

# परराज्य जिंकण्याची नवी आणि जुनी पद्धत ६

जोंपर्यंत सबळ आणि दुर्बळ असा मनुष्यांमध्यें भेद आहे, तोंपर्यंत एकानें दुसऱ्याला जिंकावें ही गोष्ट चालावयाचीच. दुर्बळ मनुष्याला जिंकावें, ही सबळ मनुष्याची स्वाभाविक प्रवृत्तिच होय. ज्याप्रमाणें लहान माशांना मोठे मासे खातात, मोठया माशांना पक्षी खातात, पक्ष्यांना पशु खातात, आणि पशूंना मनुष्यें खातात, त्याप्रमाणेंच दुर्बळ मनुष्यांना सबळ मनुष्यें खातात. या वर दिलेल्या सर्व ठिकाणीं स्वाभाविक प्रवृत्ति हेंच कारण होय. परंतु पशुपक्ष्यादिकांपेक्षां मनुष्याला अधिक ज्ञान असल्यामुळें कांहीं शहाण्या मनुष्यांच्या असें दृष्टोत्पत्तीस आलें कीं, पशूंप्रमाणेंच जर सबळ मनुष्यें निर्बळ मनुष्यांवर आपलें उपजीवन करूं लागलीं, तर आज जो सबळ म्हणून आहे त्याच्यापेक्षां उद्यां दुसरा अधिक सबळ आला म्हणजे तो त्याला खाणार, व त्याच्यापेक्षां अधिक सबळ त्याला खाणार; अशा रीतीनें अव्यवस्था उत्पन्न होण्याचा संभव आहे. ही गोष्ट लक्षांत आणून त्यांनीं सद्वर्तनाचे कांहीं नियम केले. कोणी दुर्बळ असो वा सबळ असो, प्रत्येकाचें आपापल्या वस्तु-वर स्वामित्व सारखेंच असावें, सर्वांनीं खरें बोलावें, कोणीं कोणाची चोरी करूं नये, वगैरे नियम वर दिलेल्या कारणांसाठीं करण्यांत आले. हे नियम करण्यांतील मुख्य तात्पर्य दुर्बळ लोकांचें संरक्षण आणि सबळ लोकांचें नियमन हें होय. हा हेतु ह्या नियमांनीं कांहींसा साधला जात आहे खरा, पण तो हेतु सर्वस्वीं साधला जात आहे, असें मात्र म्हणतां येत नाहीं. कारण ह्या नियमांनीं दुर्बळ लोक मात्र फसले जातात; परंतु जे सबळ असतात ते सहसा ह्या नियमांना भीक घालीत नाहींत. हे नीतिशास्त्राचे नियम दुर्बळ लोक पाळताव

म्हणून ते गुलाम होतात, आणि सबळ लोक मोडतात म्हणून ते राजे होतात. हे नियम पाळण्याबद्दल पुण्य आणि मोडल्याबद्दल पाप लागून, त्यांपासून परलोकीं सुखदुःखें काय भोगावीं लागत असतील तीं असोत. पण इहलोकीं तर हे नियम पाळल्याबद्दल गुलामगिरीचें शासन आणि मोडल्याबद्दल राज्यपदाचें बक्षीस मिळतें, असाच बहुतेक अनुभव येतो. दुसऱ्याचें असेल तें घ्यावयाचें नाहीं, ह्या नियमानें जर सगळे लोक चालले आहेत असें मानलें, तर आज राजांच्यापाशीं जो मुलुख आणि पैसा जमलेला आहे तो त्यांच्यापाशीं कोठून आला ? जर बळी तो कान पिळी या न्यायानें जगांतील कोणीच लोक चालले नसते, तर आज जे राजे म्हणून दिसत आहेत ते राजे कसे झाले असते आणि ज्यांच्या पायांत गुलामगिरीच्या शृंखळा पडलेल्या आहेत ते गुलाम कां झाले असते ? झोप घेणें हें प्रकृतीला फार चांगलें, रात्र ही देवानें झोपेसाठींच केलेली आहे, झोपेनें विश्रांति मिळाली म्हणजे फिरून काम करण्याला उत्तेजन येतें, वगैरे सात्त्विक वचनांनीं सर्वांना झोपीं जाण्याचा उपदेश करून आपण स्वतः जागत बसले नाहींत तर चोरांना त्या झोपी गेलेल्या लोकांचीं घरें फोडतां यावयाचीं नाहींत. त्य प्रमाणें बाकीचे लोक खरें बोलणें, परस्वाचा अपहार न करणें इत्यादि नीतिमार्गाच्या मागें न लागले तर अपस्वार्थी लोकांना दुसऱ्याच्या पैशावर व मुलुखावर आपली तुंबडी भरून घेऊन गबरू होतां आलें नसतें. म्हणून भोळसर लोकांना नीतीच्या नादीं लावून देऊन, खिसेकापू लोकांनीं आपली हातचलाखीचीं कामें सुरू करून आपला तळिराम गार करून घेतला आहे. अशी वास्तविक स्थिति आहे. तरी पण कित्येक वेडगळ लोकांना असेंच वाटतें आहे कीं, रात्रींच आपण जेव्हां झोप घेतों, तेव्हां चोरानांहि झोपाच लागलेल्या असतात. आणि आपण जेव्हां सन्मार्गानें चाललेले असतों, तेव्हां लुच्चे, राजे वगैरे लोकहि सदाचरणानेंच वागत असतात. पण हा त्यांचा भ्रम आहे.

सारांश, ' जीवो जीवस्य जीवनम् । ' या न्यायानें कोणत्या तरी युक्तीनें सबळ राष्ट्र दुर्बळ राष्ट्रावर अंमल बसवितें व हा सृष्टीचा क्रम पुरातन काळापासून चालत आलेला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु पूर्वीची जिंकण्याची रीत आणि हल्लींची जिंकण्याची रीत ह्यामध्यें हल्लींच्या लोकांच्या दुर्दैवानें फारच अंतर पडलेलें आहे. पुराणांतील गोष्टींमध्यें ऐतिहासिक दृष्ट्या फारसें महत्त्व आहे असें नाहीं, तरी पण त्यांत स्थूलमानानें ज्या गोष्टीचा उल्लेख करण्यांत आलेला आहे;

त्या सर्वांशीं अग्राह्य आहेत असें मानण्याचें कारण नाहीं. त्या पुर्वीच्या पुराणावरून किंवा रामायण, महाभारत इत्यादि इतिहासांवरून असें दिसून येतें कीं, पूर्वीचे राजे परकीयांना जिंकीत असत, परंतु जिंकल्यानंतरची त्यांची पद्धत अगदीं वेगळी होती. जिंकलेल्या लोकांच्या हितकारक चालीरीती मोडून टाकण्याची त्यांची कधींहि इच्छा नसे. जिंकलेल्या लोकांच्या धर्मात ते कधींहि साक्षात् किंवा गुप्त ढवळाढवळ करण्याचा प्रयत्न करीत नसत. देशाचार आणि कुलाचार ह्यांमध्यें स्वतः किंवा दुसऱ्याकडून ते हात घालीत नसत. किंवा जेथें तेथें जिंकलेल्या लोकांत आपले लोक पसरवून जिंकलेल्या राज्यांतील मूळच्या लोकांना ते अन्नाला महाग करीत नसत. 'यस्मिन्देशे य आचारो व्यवहारः कुलस्थितिः । तथैव परिपाल्योऽसौ यदा वशमुपागतः ॥' याप्रमाणें याज्ञवल्क्यानें या बाबतींत नियमच घालून दिलेला आहे. व त्याचें पूर्वीच्या राजांनीं उल्लंघन केलेलें नाहीं. शिवाय परराज्य जिंकण्यामध्यें पूर्वीच्या राजाचे उद्देश फारसे नीचपणाचे होते, असें दिसत नाहीं. कारण दुसऱ्या देशाच्या राजाला जिंकून तेथील गादीवर आपण बसावें किंवा आपला गव्हर्नर तेथें नेमावा, अशी त्यांची मुळींच इच्छा नसे. 'स्थापयेत्तत्र तद्वंश्यं कुर्याच्च सामयक्रियाम् ।' या श्लोकानें मनूनें पूर्वीच्या राजांना असा नियम घालून दिलेला होता कीं, जिंकून हस्तगत करून घेतलेल्या राजाच्या गादीवर त्याच्याच वंशांतील कोणी तरी बसवावें आणि त्यांनीं अमुक अमुक रीतीनें वागावें अशाबद्दल त्यांना नियम करून द्यावे व त्याप्रमाणें त्यांना वागूं द्यावें. ह्या मनूच्या पद्धतीप्रमाणें पूर्वीचे राजे वागत असत. हा मनूचा नियम इंग्रज लोक ५७ सालीं शिकले आणि तेव्हांपासून तेहि तो पाळीत आहेत. आपल्या शत्रूला जिंकलें तर त्याजपासून योग्य ती खंडणी घेऊन त्याला जुने राजे आपलें राज्य पूर्ववत् चालवूं देत असत. एखाद्या ब्रह्मसमंधाप्रमाणें रात्रंदिवस जिंकलेल्या लोकांच्या मानेस ते बसलेले नसत. रामानें लंकेचें राज्य जिंकलें, पण म्हणून रामानें आपला तेथेंच तळ दिला नाहीं. किंवा लंका ही अयोध्येची कॉलनी केली नाहीं. शिवाय रावणाला मारल्यावर लंकेच्या गादीवर रामानें रावणाचा भाऊ बिभीषण यालाच बसविलें. रामाला भाऊ नव्हते असें नाहीं. व त्यांतील एखाद्याला रामानें लंकेच्या राज्यावर व्हाइसराय नेमिलें असतें तर त्याचा कोणीं हात धरला नसता. पण तीच अलीकडच्या जिक-

णारांची गोष्ट घ्या. नेपोलियननें जीं जीं परराज्यें जिकलीं तेथें तेथें कोणी तरी आपले भाईबंद नेमून, त्याना त्या ठिकाणचे बादशहा करून ठेविलें. पूर्वी पांडवांनीं राजसूय आणि अश्वमेघ असे दोन यज्ञ केले व त्यावेळीं त्यांनीं पृथ्वीवरील सर्व राजे जिंकले, अशीं वर्णनें आहेत. पण त्यांनीं ते राजे जिंकले म्हणजे काय केलें ? त्यांचीं पाळेंमुळें खणून त्यांच्या नांवाचा सुद्धां मागमूस राहूं दिला नाहीं, असें केलें काय ? नाहीं. तर त्यांच्यापासून खंडणी घेऊन त्या द्वारानें त्यांना आपलें वर्चस्व कबूल करायला लावून, पण त्यांच्या राज्याच्या अंतर्व्यवस्थेमध्यें हात न घालितां, त्यांचें राज्य परत त्यांच्या हवालीं केलें. कृष्णानें कंसाला मारलें तेव्हां मथुरेच्या राज्याची व्यवस्था वाटेल तशी करण्याचे कृष्णाच्या हातांत होतें. पण कृष्णानें काय केलें ? आपण मथुरेच्या राज्यावर बसला काय किंवा त्यानें आपला भाऊ बलराम याला गादी दिली काय ? नाहीं. तर कृष्णानें मथुरेचा मूळचा राजा उग्रसेन यालाच गादीवर बसविलें. कृष्णाचे त्यावेळीं इतकें वजन होतें कीं, तो जें म्हणतां तें त्याला करतां आलें असतें. व कृष्णाचे पुष्कळ गवळी सोबती व जातभाई होते, त्यांतल्या एखाद्या गाई वळणाऱ्या आपल्या जातभाईला प्रधान करा, असें कृष्णानें म्हटलें असतें तर झालें नसतें काय ? पण कृष्णानें तसें म्हटलेंच नाहीं. त्या वेळची तशी पद्धतच नव्हती. पूर्वी परराज्याक्रमण हें शौर्यप्रदर्शनासाठीं होतें, स्वार्थसाधनासाठीं नव्हतें. असें पूर्वीच्या उदाहरणांवरून दिसतें.

पण आतांचें मन्वंतर त्याहून अगदीं भिन्न आहे. पूर्वीची राज्य जिंकल्यानंतरच्या व्यवस्थेची उदात्त पद्धत हल्लीं अगदीं लुप्तप्राय झालेली आहे, असें दिसतें, आमच्या हिंदुस्थानांतील पूर्वपीठिकेप्रमाणें आमच्यामध्यें गेल्या शतकापर्यंत देखील खंडणी घेऊन राजांना सोडून देण्याची वहिवाट असे. खुद्द पेशव्यांनींहि उत्तर हिंदुस्थानांतील कित्येक राजांजवळून खंडणी घेऊन त्यांना आपल्या राज्याची अंतर्व्यवस्था करण्याच्या कामीं पूर्णपणें स्वतंत्र ठेविलें होतें. पण हल्लींच्या राजांची तशी गोष्ट नाहीं. आतांच्या जिकणारांची एकदां मिठी पडली म्हणजे मग ती शुद्ध मगरमिठीच; ती कांहीं केल्यानें सुटावयाची म्हणून नाहीं. उलट ती मगरमिठी उत्तरोत्तर अधिक घट्ट कशी होत जाईल, याविषयीं राजकारस्थानी पुरुषांचे विचार चाललेले असावयाचे. हल्लींच्या या पद्धतीचा मूळ उगम रोमन लोकांपासून झालेला आहे. रोमन लोकांचा मूळ

प्रदेश फार लहान. त्यामुळें दुसऱ्याचा प्रदेश लढाईत मिळाला म्हणजे तो आपल्याकडेच राखण्याची त्यांना आवश्यकता फार. शिवाय शिपाई लोकांना लढाईत शौर्य दाखविण्याला उत्तेजन यावें म्हणून रोमन सेनापती नवीन काबीज केलेला मुलूख आपल्या हाताखालच्या शिपायांना वसाहती करण्याकरितां वांटून देत असत. त्यामुळें हे जिंकणारे लोक जिंकलेल्या लोकांच्या अति निकट राहूं लागल्यामुळें व त्यांच्यांत वांटेकरी होऊं लागल्यामुळें, जिंकलेल्यांना वर डोकें काढण्याला मुळींच जागा होईनाशी झाली. याशिवाय रोमन लोकांनीं रोमन सिटिझन (रोमचा नगरवासी), हा एक अत्युत्कट महत्त्वाकांक्षेचा विषय जिंकलेल्या लोकांच्या डाळ्यांपुढें ठेवून त्यांना आपल्यासारखें होण्याच्या नादीं लावून, त्यांना स्वत्वाभिमानापासून पूर्णपणें भ्रष्ट केलें. याप्रमाणें त्यांनीं जिंकलेल्या सामान्य लोकांना हतवीर्य करून टाकलें. परंतु जिंकलेल्या लोकांच्या राजांनाहि आपल्या कह्यांत ठेवण्याची रोमन लोकांची एक युक्ति होती. ऑगस्टस सीझरनें जिंकलेल्या राजांचीं मुलें आपल्या राजपुत्रांबरोबर विद्याभ्यास करण्याकरितां म्हणून रोम शहरामध्यें आणून ठेविलीं होतीं. त्या योगानें ह्या कांहीं काळानंतर गादीवर येणाऱ्या राजांना रोमन लोकांचें वळण लागे, त्यांचें शिक्षण मिळे, त्यांच्या रीतिभाती गोड लागत, त्यांच्यासारखी पोषाख करण्याची आवड वाटे आणि त्यांच्याबद्दल अद्वितीय प्रेम त्या राजपुत्रांच्या मनांत उत्पन्न होई. हा परिणाम कांहीं लहानसहान नव्हता. तरी पण ऑगस्टसच्या मनामध्यें ह्याच्यापेक्षांहि आणखी एक अंतःस्थ हेतु होता. जिंकलेल्या राजांनीं आपल्या विरुद्ध बंड करण्याचा वगैरे जर कधीं खटपट केली तर त्यांचे मुलगे जे आपल्या हातांत आहेत, ते ओलीस आहेत अशा रीतीनें आपल्याला त्यांचा उपयोग करून घेतां येईल, असा ऑगस्टसच्या मनांतील विचार होता. ह्या जुन्या रोमन राजकुमारकॉलेजाचा किती भयंकर उपयोग करून घेण्याची ही ऑगस्टसची कल्पना होती पाहा ! हल्लींची राजकुमारकॉलेजें हेंहि पूर्वीच्या रोमन लाकांचें एक अनुकरण आहे. ह्या व असल्याच इतर अनेक उपायांनीं रोमन लोकांनीं जिंकलेल्या लोकांच्या चोंहींकडून नाड्या आंखडून ठेविल्या होत्या. व त्यांचाच कित्ता हल्लींचीं राष्ट्रें गिरवीत आहेत. पूर्वीच्या पद्धतीप्रमाणें एकदां ठरलेला कारभार देऊन टाकला म्हणजे जिंकणारा आणि जिंकलेला यांची फिरून ओळखदेखील असण्याचें कारण नाहीं.

पण आतां तसें नाहीं. आपण जिंकलेले आहों, हें जिंकलेल्या लोकांना पावलोंपावलीं भासत असतें. तो जिंकलेला माणूस कोठेंहि जावो, कोणीतरी जिंकणारा माणूस त्याच्या मानेवर पाय देण्यासाठीं दत्त म्हणून उभा आहेच. पण आपण जिंकलेले आहों असें पदोपदीं सजीव प्राण्यांना वाटलें, तर त्यांत मोठेंसें नवल नाहीं. पण ही गोष्ट निर्जीव प्राण्यांना देखील भासते. डोंगरांतील जंगलें आणि मैदानांवरील कुरणें यांनाहि असें भासत असतें कीं, आपणावर कोणी तरी परकीय लोक अंमल करीत आहेत. फार काय, समुद्राच्या खारट पाण्यालाहि ह्या परवशतेचा अनुभव येत आहे. पूर्वीची परवशता वरवर असे. परंतु हल्लीच्या परवशतेचीं पाळेंमुळें फार खोल गेलेलीं आहेत. एकदां जिंकलेल्या लोकांना फिरून वर डोकें काढतां येऊं नये, अशीच तजवीज हल्लीं केलेली दिसते. पूर्वींची अशी नव्हती. पूर्वीची पद्धत म्हणजे दोन मल्लांची राजमार्गानें झालेली कुस्ती होती. त्यांत एकदां एकजण पडला म्हणजे साऱ्या जन्मभर तो पडलाच, असे पूर्वींचे उदात्त मनाचे लोक समजत नसत. जर एखादा माणूस आज कुस्तींत पडला तर फिरून त्याला कुस्तीची तयारी करूं द्यावयाची नाहीं, अशी त्या लोकांची समज नव्हती. परीक्षेंत एकदां नापास झालेल्याला फिरून परीक्षेची तयारी करतां येते, किंवा एकदां पडलेल्या मल्लाला फिरून कुस्तीची तयारी करतां येते. त्याप्रमाणेंच ही राज्यप्रकरणांतील गोष्ट आहे, अशी त्यांची कल्पना असे. पण हल्लीं या कल्पनांचा बहुतेक अस्तच झालेला आहे, असें म्हटल्यास हरकत नाहीं.

असल्या पद्धतीचीं उदाहरणें कोणास पाहावयाचीं असल्यास रशिया, मध्यएशिया, फिनलन्ड वगैरे ठिकाणीं काय करीत आहे, हें पाहावें, म्हणजे झालें. व तीच पद्धत बहुतेक सर्व युरोपियन राष्ट्रांची आहे, असें म्हटल्यास हरकत नाहीं. तरी पण आमच्या ब्रिटिश लोकांची राज्यपद्धत ही त्याला एक ढळढळीत अपवाद आहे. जिंकलेल्या लोकांना सुख आणि स्वतंत्रता देण्यासाठीं जिंकणारे लोक जर कोणी झटत असतील, तर ते आमचे उदार महात्मे इंग्रजच होत. क्रमाक्रमानें जिंकलेल्या लोकांना वर आणण्याचा प्रयत्न करणें ही पद्धत खंडणीच्या पद्धतीइतकी जरी चांगली नसली, तरी आज ज्या प्रचालत पद्धती आहेत त्यांत हीच बरी आहे, असें विचाराअंतीं म्हणावें लागेल. पण ह्या क्रमिक

उत्कर्षाच्या पद्धतीचीहि गति हल्लींच्यापेक्षां त्वरित करतां येणार नाहीं असें नाहीं. ती तशी केल्यास इंग्रजांचें नांव हिंदुस्थानचें स्वातंत्र्य हरण केल्यापेक्षां परत दिल्याबद्दल अधिक चिरस्थायी होईल, यांत बिलकूल संशय नाहीं.

---

# नेटिवांना कसें वागवावें ? : : ७

या विषयासंबंधानें गव्हरनरजनरलचे सेंट्रल इंडियामधील माजी पोलिटिकल एजन्ट सर जॉन मालकम यांनीं कांहीं टिपणें करून ठेविलीं आहेत. तीं त्यांनीं कोणत्या धोरणानें केलीं आहेत आणि त्यांत त्यांचा काय हेतु आहे, वगैरे गोष्टी नेटिव लोकांना कळणें जरूर असल्यामुळें, आम्हीं आज त्यांतील ढळक ठळक मुद्द्यांचा सारांश देण्याचा विचार केला आहे.

मालकमसाहेब म्हणतात कीं, हिंदुस्थानांतील जुनीं राज्यें मोडून टाकून आपण आपलें नवीन राज्य स्थापन केलें आहे. ह्या दोन्ही राज्यपद्धतींची तुलना केली असतां पूर्वीच्यापेक्षां हल्लींच्या राज्यांत प्रामाणिकपणा, शहाणपणा आणि सामर्थ्य हीं अधिक आहेत, असा बहुतेक नेटिव लोकांचा जो ग्रह झालेला आहे, तोच आपल्या हिंदुस्थानांतील राज्याला अतिशय बळकट आधार होय, असें ज्यांनीं ज्यांनीं या विषयावर विचार केला आहे, त्यांचें त्यांचें मत पडल्यावांचून राहणार नाहीं. हा जो आपल्या राज्याबद्दल नेटिवांचा अनुकूल ग्रह झालेला आहे, त्यांत आपण युरोपियनांनीं नेटिवांच्या रीतिभाती, संस्था आणि धर्म ह्यांचें सन्मानपूर्वक संगोपन केलें तर, कितीतरी भर पडणार आहे. तसेंच आपण नेटिवांशीं नेमस्तपणानें, सुस्वभावानें आणि ममताळूपणानें वागलों तर त्यांच्या योगानें सुद्धां वरील हेतूला किती उत्तेजन मिळणार आहे ! पण तेंच जर आपण त्यांच्या धर्मकल्पनांकडे दुर्लक्ष करूं लागलों, किंवा त्यांच्यांतील व्यक्तीचा आणि समुदायांचा आपण अपमान

करूं लागलों, किंवा ज्या तत्त्वांवर आपण हें मोठें थोरलें राष्ट्र जिंकलें आणि ज्या तत्त्वांवर तें आपल्याला राखावयाचें आहे, तीं तत्त्वें आम्हीं या लोकांना जिंकलें आहे या घमेंडींत आपण विसरून गेलों आहों, असें जर आपल्या कृत्यांनीं नेटिवांना आपण दाखवूं लागलों, तर त्यापासून आपल्या राज्याची बळकटी कमी झाल्यावांचून कधींहि राहाणार नाहीं.

हे मालकमसाहेबांचे विचार वाचीत असतां आम्ही पुढें दिलेला दाखला कोणाच्याहि मनांत आल्यावांचून राहिला नसेल. आपण घोड्यावर बसण्याच्या पूर्वी त्याला जें गोंजारतों तें त्याच्याबद्दल आपल्या मनांत फारशी प्रीति असते म्हणून नव्हे, तर त्यानें आपल्याला पाठिवर शांतपणें बसूं द्यावें आणि आपण पाठीवर बसलों असतां आणि त्याजवर चाबकाचे फटकारे ओढीत असतां त्यानें आपल्याला आपल्या पाठीवरून खालीं फेकून देऊं नये म्हणून होय. तसाच प्रकार आम्हां नेटिवांचा आहे. कोणीं साहेबानें आम्हांला ममताळूपणानें वागविलें किंवा आमच्या धर्मसमजुतींना मान दिला म्हणजे आम्ही भाबडे आणि भोळसर नेटिव लोक म्हणतों कीं, अहाहा ! हे आमचे साहेब किती तरी दयाळू आणि धर्मश्रद्धाळू आहेत ! पण ह्या वर दिलेल्या मालकम साहेबांच्या मताप्रमाणें पाहिलें तर हा सगळा दयाळूपणा आणि श्रद्धाळूपणा निव्वळ कृत्रिम आणि मायावी आहे, असें दिसतें. त्यांची दया ज्यांच्यावर दया करावयाची त्यांच्यासाठीं नाहीं, तर स्वतःच्या राज्याच्या चिरस्थायित्वासाठीं आहे, असें उघड होतें. व अशी जर वास्तविक स्थिति आहे, तर मग ही आमच्यावर दया आहे असें न म्हणतां, आम्हांला पारतंत्र्याच्या चिखलांत कायमची बुडवून ठेवणारी ही एक आमच्यावर धोंडच आहे असें म्हटलें पाहिजे; व आम्हांला पारतंत्र्यांत फेंकणारी शस्त्रास्त्रांची लढाई जरी कधींच बंद झाली आहे, तरी ह्या असल्या मायावी दयेच्या रूपानें ती लढाई आम्हांला पारतंत्र्यांत ठेवण्याकरितां अजूनहि चालू आहे, असेंच म्हणावें लागतें. आम्हांला साहेबांच्या दयाळूपणाची फार गरज आहे, पण तो दयाळूपणा आम्हांला गुलामगिरींतच चेंपून ठेवण्यासाठीं नको, तर तेथून वर काढण्यासाठीं पाहिजे आहे. आमचें पारतंत्र्य शाबूद राखण्यासाठीं जर साहेब लोक आमच्यावर दया दाखविण्याची तसदी घेत असतील, तर आम्हांला ती त्यांची दया नको आहे. असल्या दयेपेक्षां शुद्ध निर्दयपणाहि

अधिक चांगला. तेव्हां आमची एवढीच विनंति आहे कीं, साहेबांनीं नेटिवांवर दया तर करावीच, पण ती सद्धेतूनें मात्र करावी, म्हणजे त्यांत उभयतांचें कल्याण आहे.

माल्कमसाहेब आणखी असे लिहितात कीं, नेटिव लोकांमध्यें एकी नाहीं. हाच आपल्या इंग्रजी सत्तेचा एक भक्कम पाया होय, आणि ह्या कारणामुळेंच आपल्याला आपलें राज्य हिंदुस्थानांत स्थापन करतां आलें, हें खरें आहे. त्या वेळची हिंदुस्थानची स्थितिच अशी होती कीं, येथील लोकांत एकी असणें शक्य नव्हतें आणि शिवाय आपण प्रारंभीं येथील लोकांशीं अशा कांहीं विलक्षण तऱ्हेनें दळणवळण सुरू केलें कीं, त्याच्या योगानें नेटिव लोकांत आपसांत फाटाफूटच व्हावयाला पाहिजे होती. पण आतां ह्या देशाची स्थिति बरीच बदलली आहे येथील सर्व लोक आतां आपल्या एकट्याच्या छत्राखालीं आलेले आहेत. त्यामुळें सर्वांना सारख्याच अशा नफानुकसानीच्या कित्येक गोष्टी आतां उपस्थित झाल्या आहेत. व अशा गोष्टींपासूनच कोणत्याहि राष्ट्रांत एकी उत्पन्न होत असते. तशी एकी आता हिंदुस्थानांत होण्याची भीति आहे. व त्यामुळें आपसांतील फाटा-फुटीच्या ज्या भक्कम पायावर आपली इमारत उभारली गेली तिचा आधार आपणाला नाहींसा होण्याचा संभव आहे. तसेंच इतके दिवस नेटिव राज्यें अस्तित्वांत होतीं, त्यामुळें त्यांच्या राज्यांत किती अव्यवस्था आणि जुलूम आहे तो पाहा आणि आमच्या राज्यांत किती व्यवस्था आणि न्याय आहे तो पाहा, असें लोकांना सांगण्याला जागा होती; पण हाहि आपला आधार दिवसेंदिवस तुटत चालला आहे. कारण, आपण एकापाठीमागून एक नेटिव राज्यें अस्तित्वांतून नाहींशीं करीत चाललों आहों. ह्याशिवाय प्रथमतः नेटिव लोकांवर आपला वचक बसण्याला आणखी एक अनुकूल कारण होतें तें असें कीं, साहेब लोकांपाशीं अगणित द्रव्य आहे, असंख्य लोक आहेत, अतोनात युक्त्या भरलेल्या आहेत, अशी आपल्याविषयीं त्यांची कल्पना होती. कारण, आपलें खरें वैभव काय आहे, याची त्यांना मुळींच माहिती नव्हती. पण जसजसें ज्ञान वाढत जाईल तसतसा हा भ्रमाचा भोपळा फुटत गेल्यावांचून कधींहि राहणार नाहीं. दुसरा एक आपल्या राज्यपद्धतीमध्यें कमीपणा आहे तो हा कीं, खालच्या आणि मधल्या वर्गां-

तील लोकांना आपण सौम्यपणानें वागवीत असल्यामुळें, त्यांचें मत जरी आपल्याला अनुकूल असलें तरी पूर्वीच्याप्रमाणें आतांच्या राज्यांतील मान, मरातब, हक्क आणि अधिकार हे कायमचे व वंशपरंपरेचे नसून केवळ क्षणभंगुर आहेत, ही गोष्ट लोकांच्या नजरेस आल्यामुळें व ही गोष्ट वास्तविक पाहतां खरीहि असल्यामुळें, जे आज अधिकारावर आहेत ते उद्यां असतील किंवा नाहीं, ह्याची बिलकूल शाश्वती नसते. व त्यामुळें वरील दर्जाचे लोक नाखूष होण्याचा संभव असतो. अशी अनेक बाजूंनीं आपल्या राज्याला भीति असल्यामुळें, आपली राज्यपद्धति त्या मानानें सुधारणें फार जरूर आहे. व कांहीं अंशीं आपल्या हल्लींच्या राज्यपद्धतींत तशी योजना केलेली आहेहि. कारण, युरोपियन कामगारांना येथें वसाहती करू देण्यांत येत नाहींत, त्यामुळें त्यांचे या देशांतील हिताहितांशीं प्रत्यक्ष संबंध कधींहि येत नाहींत. त्यामुळें त्यांचे अंतस्थ मनोविकार कधींहि जागृत न होतां जें ऑफिसचें काम पुढें येईल तें कायद्याप्रमाणें त्यांना करतां येतें. अहितकारक मनोविकार, कृष्णकारस्थानें, महत्त्वाकांक्षा वगैरे ज्या गोष्टींनीं राज्य लयाला जातें त्या सर्व गोष्टींचा युरोपियन कामगारांच्या ठिकाणीं पूर्ण अभाव असल्यामुळें त्यांच्या हातून येथील राज्यकारभाराचें काम फारच चांगल्या रीतीनें होतें.

विलायती अधिकाऱ्यांच्या संबंधानें मालकमसाहेबांचे हे विचार पाहिले, म्हणजे ज्यांचा ह्या देशांतील हिताहितांशीं प्रत्यक्ष संबंध आहे, अशा नेटिव लोकांना, इकडील मोठमोठ्या हुद्यांच्या जागा क्वचितच मिळणार, हें उघड होत आहे. पण ज्या लोकांचा एखाद्या देशाच्या हिताहितांशीं प्रत्यक्ष संबंध असतो, त्यांना तेथील अधिकारी नेमिलें, तर त्या अधिकाराचीं कामें करीत असतां त्यांचे खाजगी मनोविकार जागृत होतील, त्यांच्यांत कारस्थानें माजतील आणि त्यांच्या महत्त्वाकांक्षेची ज्वाळा भडकेल, इत्यादि कारणांसाठीं हिंदुस्थानांत इंग्लंडांतून आणलेले सिव्हिल सर्व्हंट, इंजिनियर, डॉक्टर वगैरे नेमले पाहिजेत, आणि नेटिव नेमतां कामा नयेत; असें जर असेल, तर मग आमच्या नेटिवांच्या मुलांना सिव्हिल सर्व्हिस आणि मेडिकल सर्व्हिस वगैरे मृगजळांच्या मागें धांवावयास लावून देण्यांत काय हेतु आहे, व फायदा तरी काय आहे? ह्याच्यापेक्षां तुम्हांला वरच्या जागा मिळावयाच्या

नाहींत, तुम्ही स्वस्थ बसा, असें उघड सांगितलेलें काय वाईट ? कारण, आह्मांला वरच्या जागा द्यावयाची जर इंग्लिशांची खरोखरच इच्छा असती, तर सिव्हिल सर्व्हिसच्या वगैरे परीक्षा विलायतेंतच दिल्या पाहिजेत, असा ( पार्लमेंटनें याच्या विरुद्ध टराव केला असतांहि ) आग्रह धरण्यांत काय मतलब होता ? अथवा ही आमची नेटिवांची रडकथा जन्मालाच लाग- लेली आहे, ती असो. पण ज्या लोकांचा एखाद्या देशाच्या हिताहितांशीं प्रत्यक्ष संबंध असतो, त्यांना तेथील अधिकारी नेमिलें, तर अधिकाराचीं कामें करीत असतांना त्यांचे खासगी मनोविकार जागृत होतील, कारस्थानें माजतील, व महत्त्वाकांक्षेची ज्वाळा भडकेल, आणि त्या योगानें तें राज्य लयाला जाईल, हें जें तत्त्व आज हिंदुस्थानाला लागू करण्यांत येत आहे, तें जर खरें असेल, तर ज्याला इंग्लिश कलेक्टर मिळाले आहेत, तें आमचें हिंदुस्थान खरोखरच भाग्यवान् समजलें पाहिजे. पण आम्ही हिंदुस्थानच्या स्थितीबद्दल आनंद मानीत असतां आमचे डोळे इंग्लंडकडे गेले म्हणजे, आमचें काळीज अगदीं चर्र होऊन जातें. हाय हाय ! इंग्लंड एवढे सुधार- लेलें असून व तेथील मुत्सद्यांच्या मनांत वर दिलेलें राजनीतीचें तत्त्व बिंब- लेलें असून इंग्लंडांत पाहावें तों इंग्लिशच कलेक्टर, इंग्लिशच डॉक्टर, आणि इंग्लिशच इंजिनिअर ! शिव शिव ! तेथील या अधिकाऱ्यांचे मनोविकार किती खवळत असतील, तेथें कारस्थानांचे किती घोंटाळे माजत असतील, आणि महत्त्वाकांक्षेची आग कितीकांना तरी तेथें जाळून खाक करीत असेल ! आणि ह्या साऱ्या अनर्थाला कांहींच उपाय नाहीं काय ? अथवा नाहीं का ? ज्यांचा एखाद्या देशाच्या हिताहितांशीं प्रत्यक्ष संबंध असेल, त्यांना तेथील वरिष्ठ अधिकारी नेमून उपयोगी नाहीं. म्हणून जसे हिंदुस्थानांत इंग्लिश कलेक्टर, इंग्लिश डॉक्टर व इंग्लिश इंजिनियर नेमलेले आहेत, त्याप्रमाणेंच इंग्लंडमध्यें इंडियन कलेक्टर, इंडियन डॉक्टर, व इंडियन इंजिनियर नेमावे, म्हणजे झालें. वरील तत्त्व जर खरें असेल, तर इंग्लंडच नव्हे, तर फ्रान्स, जर्मनी, रशिया, युनायटेड स्टेट्स वगैरे सर्व स्वतंत्र राष्ट्रांनींहि या तत्त्वाचा उपयोग आणि फायदा करून घेतला पाहिजे. पण आमचे राज्यकर्ते साहेब हो, हें अत्यंत फायदेशीर राजकीय तत्त्व तुह्मी आमच्या देशांत मात्र उप- योगांत आणितां, आणि आपल्या स्वतःच्या–तुम्हांला प्राणापेक्षांहि प्रिय

अशा—इंग्लंड देशामध्यें तुम्ही तें उपयोगांत आणीत नाहीं, हें कसें ? वाईट तें आपण घ्यावें आणि चांगलें तें आम्हांला द्यावें, इतकें न फिटण्यासारखे उपकार तुम्ही आमच्यावर करीत आहां काय ? ईश्वरानें आमच्या देशाला तुमच्या पदरांत घातलें आहे, तेव्हां तुम्ही वाईट संस्थांचें सेवन करावें, आणि आम्हीं चांगल्याचें सेवन करावें, हें आम्हांला शोभत नाहीं. तेव्हां ज्या पद्धतीचा उपभोग तुम्ही घेत आहां, तिचाच उपभोग आम्हांलाहि द्या, त्यांत पंक्ति—प्रपंच होऊं नये, एवढेंच आमचें मागणें आहे.

मालकमसाहेब यापुढें आणखी असें लिहितात कीं, हिंदुस्थानांत गेलीं शंभर वर्षें जिकडे तिकडे जुलूम आणि बेबंदबादशाही चाललेली होती. ही स्थिति बंद पडून आपण येथें जय मिळविले आणि नेमस्तपणानें राज्यकारभार करण्याला सुरुवात केली. त्यामुळें आपल्या ब्रिटिश राष्ट्राची इभ्रत हल्लीं येथें इतकी वाढली आहे कीं, त्यामुळें आपल्या परकीयाच्या अंमलाखालीं जी सुरक्षितता आणि भरभराट येथील लोकांना अनुभवण्याला सांपडत आहे, तिच्या भरांत ते अतिशय गर्क होऊन गेले आहेत, व त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, त्यांच्या डोक्यांत स्वदेशाभिमानी विचाराचा एक लेशदेखील हल्लीं उरलेला नाहीं. पण ही स्थिति फार दिवस टिकणार नाहीं. कारण, येथील लोकांना ज्ञानामृत पाजणें हें आपलें कर्तव्यकर्म आहे, व त्या ज्ञानामृताच्या योगानें स्वदेशाभिमानाचे विचार या लोकांच्या डोक्यांत फिरून खेळूं लागल्यावांचून कधींहि राहावयाचें नाहींत. व मग परकीय राजांची प्रजा होऊन राहण्यांत आपली मानखंडना आहे, असें त्यांना वाटूं लागेल. त्याच्या शांत्यर्थ इंग्रजी राज्यापासून कितीतरी फायदे झाले आहेत व होत आहेत, अशाबद्दलचे विचार फिरून फिरून यांच्या डोळ्यासमोर आणून मांडले पाहिजेत. तेव्हां आपलें हें हिंदुस्थानांतील राज्य जें परकीय आहे, तरी पण जें शहाणपणा, न्याय वगैरे तत्त्वांवर उभारलेलें आहे, तें राज्य लोकप्रिय करण्यासाठीं त्यांतील मोठ्या हुद्यांवरील सर्व कामगारांनीं झटून मेहनत केली पाहिजे. सरकारच्या प्रत्येक अंमलदारानें वरील गोष्टीचें फार सूक्ष्म दृष्टीनें अध्ययन केलें पाहिजे. तो येथें येऊन येथील लोकांच्या भाषा आणि रीतिभाती शिकला, म्हणजे त्याचें काम झालें, असें त्यानें कधींहि समजूं नये. तर आपलें राज्य येथें कोणत्या तत्त्वावर स्थापित

केलें आहे, आणि तें कोणत्या धोरणावर चालविलें आहे, याचा त्या कामगारानें प्रत्येक गोष्ट करतांना विचार केला पाहिजे. कारण, माल्कमसाहेब म्हणतात कीं, माझी तर अशी पक्की खात्री आहे कीं, मोठ्या हुद्यांवरील प्रत्येक अधिकारी आपल्या आयुष्यांतील प्रत्येक दिवशीं जें जें कांहीं करीत असतो, त्याच्या त्याच्या योगानें तो आपल्या सरकारच्या राज्याचा पाया प्रत्येक क्षणीं भक्कम किंवा पोकळ करीत असतो. म्हणून त्यांनीं नेटिवांशीं फार विचारानें वागलें पाहिजे.

नेटिवांना कसें वागवावें आणि नेटिवांशीं कसें वागावें याच्याबद्दल कांहीं विवक्षित नियम सांगण्यापूर्वी, तसें वागण्यांत मुख्य हेतु कोणता हें ॲंग्लो-इंडियन लोकांच्या मनांवर ठसण्यासाठीं माल्कमसाहेबांनीं 'सामान्य विचार' या सदराखालीं जे कांहीं विचार प्रगट केले आहेत, ते आज आम्हीं वर दिले आहेत. ह्याच्या पुढील विशेष नियम म्हणजे कांहीं व्याकरणांतील नियमाप्रमाणें केलेले नाहींत. ते वरच्याप्रमाणेंच विचारात्मक पद्धतीनेंच लिहिलेले आहेत. त्यांच्या उल्लेख आजच करतां येत नाहीं, ह्याबद्दल वाईट वाटतें.

---

# नेटिवाना कसें वागवावें ? : : ८

(नंबर २)

मागील अंकीं ह्या विषयासंबंधानें माल्कमसाहेबांनीं जें सामान्य विवेचन केलें आहे, तें वाचकांपुढें आम्हीं मांडलेंच आहे. आतां साहेबांनीं नेटिवांबद्दल आपलें मत कसें ठरवावें, त्यांच्यांत किती मिसळावें, त्यांच्याशीं खेळण्याच्या वगैरे कामीं कितपत संबंध ठेवावे, त्यांना खाजगी भेट घेऊं

द्यावी किंवा नाहीं, त्यांना उघड भेट देण्यांत काय नफेतोटे आहेत, वगैरे अनेक बारीक सरीक गोष्टींबद्दल मालकमसाहेबांनीं हिंदुस्थानांत आलेल्या व येणाऱ्या साहेबलोकांकरितां जे कांहीं नियम घालून ठेविलेले आहेत, ते आमच्या वाचकांपुढें मांडण्याच्या कृत्याला आम्ही प्रारंभ करतों. परंतु तसें करण्याच्या पूर्वीं मागील अंकीं दिलेल्या मालकमसाहेबांच्या हे नियम घालून देण्याच्या हेतूकडे वाचकांचें फिरून एकदां लक्ष लावून देणें जरूर आहे. व्याकरणांतील विशेष नियम कशासाठीं ? तर शुद्ध बोलतां आणि लिहितां यावें म्हणून; तर्कशास्त्रांतील विशेष नियम कशासाठीं ? तर बरोबर रीतीनें अनुमान करतां यावें म्हणून; आणि धर्मशास्त्रांतील आपल्या आचार-विचारांचे विशेष नियम कशासाठीं ? तर मोक्षप्राप्ति व्हावी म्हणून. त्याच-प्रमाणें साहेबानें नेटिवांशीं अमुक अमुक रीतीनें वागावें, ह्याचे विशेष नियम कशासाठीं ? तर साहेबांच्या गुलामगिरींत नेटिव लोक यावच्चंद्रदिवाकरौ राहावेत म्हणून. मालकमसाहेबांनीं घालून दिलेले नियम जे आम्ही पुढें देत आहों, ते बरेच चांगले आहेत. तरी पण एखाद्या हेत्वाभासाप्रमाणें वर दिलेल्या दुष्ट हेतूनें ते दूषित झालेले आहेत, आणि ते नियम जरी दिखाऊ-पणानें पांढरे शुभ्र दिसत आहेत, तरी त्यांतून त्यांच्याखालीं असलेल्या दुष्ट वासनेची काळी छटा दृग्गोचर होत असल्यामुळें ते नियम एरवीं जितके मनोहर झाले असते तितके ते होत नाहींत.

मालकमसाहेब जो पहिला नियम सांगतात, तो हा आहे कीं, नेटिव लोकांसंबंधानें युरोपियन लोकांची वागणूक फार उत्तम प्रकारची असली पाहिजे. साहेब लोकांनीं ममताळूपणा दाखविला पाहिजे आणि उर्मटपणा दाखवितां कामा नये, या गोष्टी तर गृहीतच घेऊन चाललें पाहिजे. तुम्ही नेटिवांशीं उर्मटपणानें वागूं नका, असा नियम म्हणून सांगण्याची जरूरीच नाहीं. ती गोष्ट तर नियमावांचूनहि आधींच साहेबलोकांनीं करावयास शिकलें पाहिजे. पण मालकमसाहेब, पहिल्या क्लासच्या डब्यांतून नेटिवांचें सामान फेंकून देणाऱ्या, नेटिवाच्या गाडीनें आपल्या गाडीचा घोडा बुजला म्हणून नेटिवावर चाबूक ओढणाऱ्या, व नेटिवाकडून जरा चूक झाली कीं, तत्क्षणीं त्याजवर सातबारी रिव्हॉल्व्हरचा उपयोग करणाऱ्या, अलीकडच्या कांहीं साहेबलोकांना उर्मटपणाचा अभाव हा गृहीत घेण्याला न सांगतां

तुम्हीं त्याजबद्दल स्पष्ट नियमच केला असता, तर फार बरें झालें असतें ! ! मालकमसाहेब आपल्या जातभाईना सांगतात कीं, नेटिवांशीं तुम्हीं मिळून मिसळून वागत जावें, पण तसें वागतांना तुम्ही हें लक्षांत ठेवा कीं, तुम्ही मुद्दाम तसे वागत आहां, असें जर लोकाच्या दृष्टोत्पत्तीस आलें, तर तुमच्या त्या चांगल्या वागणुकीची निम्मी किंमत कमी होईल, म्हणून दुसऱ्याच्या मनावर तुमच्या वागणुकीचा चांगला परिणाम होण्यासाठीं ( to make an impression ) तुम्ही अंतःकरणपूर्वक तसे वागत आहां, असें लोकांना नेहमीं दाखवीत जा. नाटकांमध्यें अभिनय शिकविणारा असतो तो नटाला असाच उपदेश करीत असतो कीं, प्रेक्षकांच्या मनावर परिणाम होण्याकरितां ( to make an impression ) तूं जें काय बोलशील, तें वरवर बोलतो आहेस असें दाखवूं नको; तर ती गोष्ट तुझ्या अंतःकरणाला जणुं काय लागून राहिलेली आहे, अशा कळवळ्यानें ती तूं बोलून दाखीव; म्हणजे त्याचा लोकांच्या मनावर परिणाम होईल, व एकंदर नाटक चांगलें वठेल. मनावर परिणाम करणें ( to make an impression ) ही गोष्ट नाटकांत चांगली शोभते. पण राज्य करणें म्हणजे नाटक आहे काय ? नुसती लोकांच्यावर छाप ठेवून द्यावयाची, मग अंतःकरणामध्यें खरी ममता असो वा नसो, अशा रीतीनें जर नेटिवांना वागवावयाचें असेल, तर हें त्यांना निव्वळ फसविणें आहे. मालकमसाहेब म्हणतात, मोठ्यांपासून लहानांपर्यंत सर्वांना, दुसरा मनुष्य आपल्याशीं कोणत्या तऱ्हेनें वागतो आहे, हें तेव्हांच ताडतां येतें. त्याची एखाद्या विशिष्ट प्रकारची वर्तणूक अंतःकरणाच्या उमाळ्यापासून उत्पन्न झालेली नाहीं, तर सारासार विचार करून काहीं विशिष्ट हेतुसाठीं तर मनष्य त्या तऱ्हेनें वागत आहे, असें एखाद्याला कळून आलें, म्हणजे तसल्या वागणुकीनें कोणीहि संतुष्ट होत नाहीं. कारण, ती वागणूक कृत्रिम असते आणि तिच्यामधून त्या माणसाचा हेतु दृग्गोचर होत असतो. व त्यामुळें त्या माणसाबद्दल इतरांच्या मनांत संशय मात्र उत्पन्न होऊं लागतो. म्हणून मालकमसाहेब इतर साहेबांना उपदेश करतात कीं, आपली वागणूक कृत्रिम आणि सहेतुक आहे असें तुम्ही कोणाच्या कधीं नजरेस येऊं देऊं नका. पण हें जुळणार कसें ? साहेबलोकांच्या मनांत नेटिवांविषयीं ममताळूपणा कशाबद्दल असावा ? नेटिव हे कांहीं साहेबांच्या देशांतले, धर्मांतले, जातीं-

तले, गोतांतले, कशांतले नाहींत. मग ह्यांच्याबद्दल त्यांचें अंतःकरण तीळ-तीळ काय म्हणून तुटावें ? तेव्हां नेटिवांवर साहेबांचें प्रेम असलें, तर तें निष्कारण आणि निर्हेतुक खास नव्हे; तर स्वार आपल्या घोड्यावर प्रेम करतो, एखादा धनी आपल्या गाईवर प्रेम करतो, आणि धनगर आपल्या बकरीवर जसें प्रेम करतो, त्याचप्रमाणें आणि तसल्याच हेतूनें साहेब नेटिवांवर प्रेम करीत असला पाहिजे, हें उघड आहे. आणि सर्व साहेबांच्या वागण्यांत आपलें राज्य येथें कायम राखण्याचा मुख्य हेतु असला पाहिजे, हें तर मालकमसाहेबानीं प्रथमतःच सांगून टाकिलेलें आहे. तेव्हां साहेबलोकांनीं आमच्यासाठीं रडण्याचा कितीहि आव घातला आणि नेटिवांच्या भोंवतीं कितीहि मायेचें जाळें पसरलें, तरी त्या जाळ्याच्या भोंकांतून त्यांचा खरा हेतु नेटिवांच्या दृष्टोत्पत्तीस आल्यावांचून कसा राहील ? नेटिवांच्या दुष्काळा-साठीं साहेब लोक वर्गण्या गोळा करोत, नेटिव लोकांसाठीं साहेबलोक प्लेगची व्यवस्था करोत, नेटिव लोकांसाठीं साहेबलोक लायब्ररया स्थापोत, शाळा काढोत, वाटेल तितक्या कळकळीचें भाषण करोत, किंवा त्यांच्या क्लबांत जाऊन त्यांच्याशीं विटीदांडूचा खेळ खेळोत; आतां सर्व नेटिवांना हें पक्कें कळून चुकलें आहे कीं, हिंदुस्थानच्या आखाड्यांत नेटिव खालती आणि साहेब त्यांच्या छातीवरती, अशी ही पकड नेहमीं कायम राहावी, म्हणून हें सर्व पेच चाललेले आहेत.

मालकमसाहेबांचें हिंदुस्थानांतील नेटिवांबद्दल साधारणपणें बरें मत आहे असें दिसतें. ते म्हणतात, साहेबलोक नेटिवांपेक्षां फार श्रेष्ठ आहेत, अशी गर्वोक्ति मीं पुष्कळ वेळां ऐकिली आहे. पण युरोपखंड आणि हिंदुस्थान यांतील निरनिराळ्या दर्जाच्या सर्व लोकांची तुलना केली, तर युरोपखंडांतील रहिवाशांना गर्व करण्याला फारशी जागा आहे असें नाहीं. नेटिव लोक हे अविश्वासू आणि पैसे खाणारे आहेत, असा त्यांजवर सामान्य आरोप आहे. पण कांहीं वर्षांपूर्वीं जेव्हां सरकारी नोकरींतील युरोपियन लोकांचे पगार फार कमी होते, तेव्हां ज्या रीतीनें नेटिव पैसे खातात, त्याच रीतीनें हे युरोपियनहि पैसे खात नव्हते काय ? आणि तेव्हां युरोपियनांचे पगार वाढवून त्यांचें हें लांचाचें

दुर्व्यसन दवडण्याला आपण जसे प्रयत्न केले, तसे कांहीं तरी प्रयत्न आपण नेटिवांना सुधारण्यासाठीं केले आहेत काय ? आपण केले नाहींत. आणि युरोपियनांना सुधारण्यासाठीं आपण जे प्रयत्न केले, त्यांच्या योगानें युरोपियनांची स्थिति सुधारण्यासाठीं नेटिवांची स्थिति मात्र आपण फार नीच करून ठेविली आहे. हिंदुस्थानांत पूर्वी जी राजकीय अव्यवस्था होती आणि जो जुलूम होता, त्याच्या योगानें नेटिवांच्या अंगीं कांहीं दुर्गुण जडलेले आहेत. पण इतक्या जुलुमाच्या कारकीर्दी होऊन गेल्या असतांहि ज्यांनीं आपल्या अंगचे सदगुण अशा प्रकारानें कायम राखिले आहेत, अशा लोकांचें मला दुसरें एकहि उदाहरण कोठें दिसत नाहीं. व ह्याचें मुख्य कारण हिंदुलोकांमधील ज्या कांहीं जातिभेद वगैरे चांगल्या संस्था आहेत त्या होत. तसेंच चोरी, दारूबाजपणा, दांडगाई वगैरे दुर्गुण नेटिवांच्यांत नसून त्यांची कौटुंबिक स्थिति फार उत्तम प्रकारची असते. हा सगळा त्यांच्यांतील उत्तम उत्तम संस्थांचा परिणाम आहे. ह्या जातिनिर्बंधाच्या वगैरे आमच्या जुन्या संस्था मालकमसारख्या साहेबांना फार उत्तम वाटत आहेत, व त्यांनीं आमच्या राष्ट्राचे चांगले गुण कायम राखिले आहेत, असें त्यांचें मत आहे. पण आमच्या सुधारकांना या संस्थांत कांहीं अर्थ वाटत नाहीं, हा कसा चमत्कार आहे तो पहा !

मालकमसाहेब आणखी असें लिहितात कीं, नेटिव लोक कम दर्जाचे आहेत, असें साहेब लोक समजतात, असें जर नेटिवांच्या नजरेस आलें, तर त्याच्यापासून येथील आपल्या राज्याची प्रगति कधींच होणार नाहीं. परंतु जर आपण त्यांच्याशीं नम्रपणानें वागलों, तर त्या आपल्या वागणुकीनें आपल्या राज्याला फार बळकटी येईल. हाय हाय ! युरोपियनांची सर्व गोड गोड वागणूक आमच्या गुलामगिरीच्या बळकटीसाठीं आहे आणि आमच्या खऱ्या उन्नतीसाठीं नाहीं, ही केवढी दुःखाची गोष्ट आहे !

नेटिव लोक युरोपियनांच्या रीतीभातींचें आणि पोषाखांचें अनुकरण करण्यासाठीं नेहमीं धडपडत असतात. हें करणें कितपत योग्य आहे, ह्याबद्दल मालकमसाहेबांनीं युरोपियन लोकांना जो उपदेश केला आहे, तो आपण आपल्याकडे लावून घेतल्यास त्यापासून फार फायदा होणार आहे. मालकमसाहेब म्हणतात, नेटिवांच्या रीती-

भार्तींना मान देणें आणि त्यांच्या धार्मिक समजुती पाळणें, हें जरी युरोपियनांचें कर्तव्यकर्म आहे, तरी त्यांतील प्रत्येकानें आपला युरोपियनपणा कायम राखिला पाहिजे. नाहींतर आपण नेटिवांपेक्षां वरिष्ठ दर्जाचे आहों, ह्या ज्या तत्त्वावर आपली सर्व इमारत उभी आहे, तें तत्त्व ढांसळून जाण्याचा संभव आहे. ह्या बाबतींत जे नेटिव राजे आणि इतर ( सधारक वगैरे ) लुंगेसुंगे जे इंग्लिश पद्धतींचें आणि रीतीभातींचे एखाद्या मर्कटाप्रमाणें अनुकरण करतात, त्यांची काय दशा होते, ती पाहून त्यावरून आपण धडा शिकणें जरूर आहे. युरोपियनाचें अनुकरण करणाऱ्या नेटिवांस युरोपियनांकडून मान मिळत नाहीं तो नाहींच, पण त्यांच्या स्वतःचे जातींमध्यें त्यांचा जो कांहीं मान असतो, तोहि पण नाहींसा होतो. अशा लोकांचें युरोपियनांत प्रथमतः कदाचित् कांहीं वजन असेल, पण त्यांचें आपल्या जातीच्या लोकांमधील वजन कमी होत गेलें, म्हणजे युरोपियन लोक देखील, मग त्यांना फारसा मान देत नाहींत. कारण, उघडच आहे कीं, त्या जातींतील कोणीतरी घरभेद्या साहेबांच्या बगलेंत पाहिजे, म्हणून साहेब त्याला प्रथमतः मान देत असतात. पण स्वजातीयामध्यें वजन न राहिल्यामुळें निरुपयोगी झालेल्या इसमाला मग साहेब तरी कशाला मान देतील ! जो बैल नांगर ओढण्याला निरुपयोगी झाला, त्याला पोसण्याचा, कोणालाहि झालें तरी, कंटाळा येणारच. नेटिवांपैकीं कांहीं सरकारच्या विश्वासाला पात्र कां होतात, याच्याबद्दल नेटिव लोक आपल्याभोंवतीं हवे तसे दिवे ओवाळून घेऊं द्या; परंतु युरोपियनांच्या पोटांतला खरा हेतु काय, हें मालकमसाहेबांनीं आपकडून सांगून टाकलें आहे. याउप्पर तें नेटिवांना न कळलें, तर नेटिवांचें नशीब ! असो. अशी वर दिलेल्या प्रकारची युरोपियनांचें अनुकरण करणाऱ्या नेटिवांची त्रेधा उडते; व तीच त्रेधा युरोपियन नेटिवांचें अनुकरण करूं लागल्यास त्यांचीहि उडाल्यावांचून राहणार नाहीं. कांहीं नेटिव तोंडपुजे लोक अशा साहेबांची तारीफ करतील, पण अखेरीस तो साहेब नेटिवांच्या आणि साहेबांच्या तिरस्काराला पात्र झाल्यावांचून राहणार नाहीं. जर साहेब लोकांनीं नेटिवांचें अनुकरण करूं नये, तर हे नेटिवा, तूं तरी साहेबांचें अनुकरण कशाला करतोस ? साहेबांच्या आणि नेटिवांच्या अशा दोघांच्याहि तिरस्काराला पात्र होण्याची तुला एवढी हौस कशासाठीं आली आहे ! इजार घातली म्हणून

साहेब तुला कांहीं अधिक समजतो असें नाहीं, तूं नेटिव तो नेटिवच. हें जें माल्कमसाहेब सांगतात, तें तुझ्या कसें ध्यानांत येत नाहीं ? जर साहेब धोतर नेसत नाहीं, तर नेटिवा, तूं तरी कशाला इजार घालतोस ?

यापुढें मालकमसाहेबांनीं नेटिवांशीं दळणवळण ठेवण्यासंबंधानें कांहीं सूचना केल्या आहेत. दळणवळण दोन प्रकारचें, एक खाजगी संबंधाचें, आणि दुसरें सरकारी कामकाजासंबंधाचें. ह्यांपैकीं खासगी दळणवळण सर्व प्रकारच्या लोकांशीं जितकें वाढेल तितकें युरोपियनांनीं वाढवावें. हिंदुलोकांचे रीतरिवाज, आचारविचार, दानधर्म हीं इतकीं कांहीं निराळ्या प्रकारचीं आहेत कीं, फक्त सरकारी कामांतच नेटिवांशीं संबंध ठेविला, तर साहेबाला त्यांचें कांहीं देखील ज्ञान व्हावयाचें नाहीं. पण नेटिवांशीं खाजगी दळणवळण ठेविलें, म्हणजे सरकारी कामाला उपयोगी अशा कित्येक गोष्टी त्यांत कळून येण्यासारख्या असतात. लॉनटेनिस, क्रिकेट, फटबॉल इत्यादि खेळ नेटिवांशीं खेळावे, अधिकाराचा इतमाम सर्व बाजूला ठेवून नेटिवांच्या घरीं परत भेटीला जावें आणि सलोखा वाढवावा, म्हणजे ह्या उपायांनीं साहेबांचा फायदा झाल्यावांचून कधींहि राहणार नाहीं. साहेबांशीं क्रिकेटचा सामना खेळून त्यांत आपल्यापेक्षां साहेबांच्या रन्स कमी झाल्या म्हणजे आपण त्यांजवर जय मिळविल्याबद्दल नेटिव लोकांना आनंद होत असतो. पण साहेबलोकांचा जय निराळाच होत असतो. आपल्याला वाटतें, साहेब आपल्याबरोबर खेळतात आणि आपल्या घरीं येतात; पण या सगळ्या गोष्टी करण्याचा साहेबांच्या पोटांतील भाव दुसराच असतो, असें मालकमसाहेबांच्या लिहिण्यावरून दिसतें. पण आम्हांला तो मोठा मान म्हणून वाटतो. वेड्याच्या पायांत जरी वास्तविक खोडा घातला असला, तरी त्याला त्याचें काय ? तो म्हणतो, मला हा घोडाच बसावयाला दिला आहे.

सरकारी कामकाजाच्या बाबतींत दळणवळणासंबंधानें मालकम साहेब असें म्हणतात कीं, प्रत्येक कामांत नेटिवाला वरिष्ठ युरोपियन अधिकाऱ्यांची सहज गांठ घेतां यावी, अशी व्यवस्था असावी. याचें कारण आपली राज्यपद्धति आणि येथील लोकस्थिति यांमध्येंच आहे. परकी राजे आपल्यावर अंमल करीत आहेत, ही गोष्ट येथील लोकांच्या मनाला फार जाचत आहे, ह्या विचाराच्या योगानें जी मनाची स्थिति होणार, तिच

बीमोड, युरोपियन अधिकाऱ्यांची बुद्धिमत्ता आणि न्यायबुद्धि ह्यांच्यापासून मिळणारे अनेक फायदे आहेत, असें वरच्यावर नेटिवांच्या नजरेस आणूनच केला पाहिजे. व म्हणून युरोपियनांशीं जितका प्रत्यक्ष संबंध येईल, तितकी नेटिवांची ह्याविषयीं अधिक खात्री होईल. युरोपियन वरिष्ठ अधिकारि आणि नेटिव रयत ह्यांच्यामध्यें नेटिव अधिकाऱ्यांना फारसें लुडबडूं देतां कामा नये. कारण, साहेबांशीं ह्यांचें बरेंच संघटन आहे, असें लोकांच्या नजरेस आल्यास, हे मधील नेटिव अधिकारी त्याचा फायदा घेतल्यावांचून कधीं सोडणार नाहींत. कोणत्याहि अर्जदाराला पुढें आणण्याचा किंवा मागें सारण्याचा हक्क नेटिव अधिकाऱ्यांच्या हातांत कधींहि ठेवूं नये, तर सर्वांना युरोपियन वरिष्ठांकडे येण्याची मुभा असावी. खाजगी भेटींमध्यें कित्येक लोक खोट्यानाट्या चुगल्या सांगून साहेबांपाशीं आपलें महत्त्व वाढविण्याचा प्रयत्न करतील, याबद्दलहि युरोपियनांनीं फार दक्ष असलें पाहिजे. पण ह्या मालकमसाहेबांच्या उपदेशाकडे हल्लींच्या युरोपियनांचें फारसें लक्ष नाहीं, असें दिसतें. नाहीं तर कित्येक अक्षरशत्रू लोक जे प्रत्येक लेव्हीला आणि गार्डनपार्टीला जातांना दृष्टीस पडतात, ते पडले नसते.

राजेलोकांच्या भेटीसंबंधानें मालकमसाहेब म्हणतात कीं, अशा प्रसंगीं दुसऱ्यांकडून मान घेण्यापेक्षां त्यांना मान देण्याकडे युरोपियनांचें अधिक लक्ष पाहिजे. कारण, हिंदुस्थानांतील राजे हे थोड्याबहुत प्रमाणानें हिंदुस्थानसरकारचे आश्रित असेंच म्हटलें पाहिजे. पुष्कळांची तर अशी स्थिति आहे कीं, पूर्वी त्यांनीं जी सत्ता गाजविली, तिचें आतां नांव मात्र राहिलें आहे; पण आतां जसजसे त्यांच्या कानांतील काप जात चालले आहेत, तसतसा त्यांना आपल्या कानांच्या भोंकांचाच जास्त अभिमान वाटूं लागत चालला आहे. ह्या त्यांच्या अभिमानाला मान देणें, हें तर्कशास्त्राच्या दृष्टीनें हास्यास्पद आहे खरें. पण असा जर अभिमान आहे, तर तो पुरविल्यानें आपलें काय खर्च होतें ? त्यांत त्यांची हौस पुरविल्यासारखें होतें, आणि आपल राजकार्य साधतें. नेटिव राजांच्याबद्दलचे मालकमसाहेबांचे विचार सामान्य लोकांच्या हृदयाला घरें पाडणारे आणि डोळ्यांना असू आणणारे आहेत. आतां खुद्द राजांना ते कसे वाटत असतील, हें जे राजे नाहींत त्यांना कसें कळणार ?

याप्रमाणें निरनिराळ्या विषयांवर माल्कमसाहेबांचे जे विचार होते, ते आम्हीं येथें दिले आहेत. माल्कमसाहेबांची ही जुनी पद्धत आहे. हीच सर्व हल्लीं चालूं आहे असें नाहीं. हल्लीं पुष्कळ दोष नाहींसे झालेले आहेत, व ते असेच उत्तरोत्तर नाहींसे होत जाऊन नेटिव आणि युरोपियन यांच्या मध्यें निर्हेतुक सख्य उत्पन्न व्हावें, आणि इंग्लंडच्या साह्यानें हिंदुस्थानचें कल्याण व्हावें, हीच नेटिवांची इच्छा आहे, आणि हीच युरोपियनांचीहि मनापासून असावी, असें आम्ही चिंतितों.

---

## दोन लाटा : : : १

सृष्टीचा हा नियमच आहे कीं, आघात झाला, म्हणजे त्या ठिकाणीं प्रत्याघातहि व्हावयाचाच. आपण जर चेंडू भिंतीवर फेंकला, तर भिंतहि तो चेंडू आपल्याकडे फेंकल्यावांचून कधीं राहणार नाहीं; आपण एखाद्या बैलांवर हात उगारला, तर तोहि आपलीं शिंगें हालविल्यावांचून कधीं राहणार नाहीं; आणि आपण जर दुसऱ्याला अरे म्हणून म्हटलें, तर तो आपल्याला कारे म्हटल्यावांचून कधीं सोडणार नाहीं. या गोष्टींत जसा परस्परविरोध आहे, तसाच राजकीय स्थितीमध्यें एक प्रकारचा विरोध आहे. व आघातला प्रत्याघात हें तत्त्व जसें पदार्थविज्ञानशास्त्रांत खरें आहे, तसेंच तें राजनीतीच्या शास्त्रामध्येंहि खरें आहे असें दिसतें. आगबोटींतून समद्रांत प्रवास करीत असतांना आगबोटीच्या कठड्याशीं उभें राहून ज्यांनीं समुद्राच्या पृष्ठभागाचें सूक्ष्म अवलोकन केलें असेल, त्यांच्या हें दृष्टोत्पत्तीस आलेलें असेल कीं, समद्राचा पृष्ठभाग प्रथमतः अगदीं शांत दिसत असतो; परंतु तो असा शांत दिसत असतां, त्यामधून त्या आगबोटीच्या इतकीच मोठी अशी एक उंच

लाट उत्पन्न होते, व ती आसपासच्या पृष्ठभागावर पसरूं लागते. तिच्याकडे पाहूं लागलें म्हणजे पाहणाराला अशी भीति वाटते कीं, आतां ही एवढी मोठी उंच लाट आपल्या आगबोटीवर येऊन आदळली तर आपली काय दशा होईल ! समुद्राच्या पृष्ठभागाची ज्याला फारशी ओळख नाहीं, असा मनुष्य ती लाट पाहून अगदीं गांगरून जातो. व आतां सर्वांनाच समुद्र आपल्या पोटांत घेतो अशा भीतीनें त्याचे डोळे मिटून जातात. पण इतक्यांत कोठें तरी जवळच समुद्राच्या कांहीं भागाला फुगवटी येऊं लागते व जेथें पृष्ठभाग एका क्षणाच्या पूर्वी अगदीं सपाट होता, तेथें लहानसा उंचवटा भासूं लागतो, आणि थोड्याच वेळांत हा जो लहानसा उंचवटा असतो, त्याची एक प्रचंड लाट बनते; आणि भीतीनें ज्याचे डोळे मिटून गेले होते, त्यानें फिरून ते उघडले, म्हणजे तो ही दुसरी लाट पाहून हीहि आपल्याला खावयाला येते कीं काय, अशा विवंचनेंत पडतो. पण ही लाट त्या भ्यालेल्या मनुष्याला आणि त्याच्या गलबताला खाण्यासाठीं उत्पन्न झालेली नसते. तर ती पहिल्या लाटेला खावयासाठीं निर्माण झालेली असते. जर पहिली लाट पश्चिमेकडून येत असली, तर ही दुसरी पूर्वेकडून तिच्यावर जाऊन पडते; व पहिली लाट उत्तरेकडून येत असली, तर ही दुसरी लाट दक्षिणेकडून जाऊन तिजवर आपटते. अशा रीतीनें एक लाट उत्पन्न झाली कीं, तेथें दुसरी उत्पन्न होतेच; व ती दुसरी लाट पहिल्या लाटेचा इतका विध्वंस करून टाकते कीं, ती पहिली लाट— ती डोंगराएवढी उंच लाट—कोठें होती हें सुद्धां कोणाला सांगतां येत नाहीं.

पाण्याच्या समुद्रांत जशा ह्या दोन लाटा उत्पन्न होतात म्हणून सांगितलें, त्याचप्रमाणें राज्याच्या समुद्रामध्येंहि अशा लाटा उत्पन्न होतात. पूर्वींचीं राज्यें लहान लहान असत. इतकीं लहान असत कीं, जलाशयांच्या परिभाषेचा उपयोग करूनच त्यांच्याविषयीं बोलावयाचें झालें, तर त्या जुन्या राज्यांना पाण्याचीं डबकींच म्हटलीं पाहिजेत. त्यांत कोणीं मोठीं असल्यास त्यांना फार तर सरोवरें, नद्या, म्हणतां येईल; पण समुद्र ही संज्ञा जर यथार्थपणानें कोणाला लावावयाची असेल, तर ती चारी खंडांच्या किनाऱ्यांपर्यंत पसरलेल्या हल्लींच्या राज्यांनाच उत्तम रीतीनें लागू पडते. या राज्यांच्या समुद्रावरहि पाण्याच्या समुद्रावरच्याप्रमाणें परस्परविरोधी अशा लाटा उठत असतात. या

राज्यरूपी समुद्रावर भीतीनें डोळे मिटवून टाकणारी अशी जी लाट इतके दिवस उसळत होती व अजूनहि उसळत आहे, ती लाट कोणती म्हणाल, तर ती Imperialism ( राज्यविस्तारा ) ची होय. पाण्याची लाट पाहून आतां ही आपल्या गलबताला गिळून टाकते कीं काय, अशी ज्याप्रमाणें एखाद्याला भीति वाटते, त्याप्रमाणेंच ही Imperialism (राज्यविस्तारा) ची लाट आपल्या देशाला आणि त्याच्या स्वातंत्र्याला खाऊन टाकते कीं काय, अशी भीति कोणत्या लहान देशांना वाटली नाहीं ? पृथ्वीच्या पाठीवर असें कोणतें लहान संस्थान किंवा दुर्बल देश आहे, कीं ज्याला ही Imperialism (राज्यविस्तारा) ची लाट आपल्याला आपल्या पोटांत सामील करून घेणार नाहीं अशी खात्री होती? सर्वांना या लाटेची भीति वाटत होती आणि ती भीति निराधार होती असें नाहीं. कारण, या लाटेनें अनेक लहान लहान पण स्वतंत्र अशा संस्थानांचे, देशाचे, बेटांचे, आणि राज्यांचे बळी घेतलेले आहेत. फ्रान्सच्या किनाऱ्यावरून जी लाट निघाली तिनें पाँडेचरी, चंद्रनगर, कोचीन-चायना, टाँकिंग, अनाम, कँबोडिया, अलजीरिया, माडागास्कर, सेनेगाल, ट्यूनिस वगैरे अनेक ठिकाणें आपल्या पोटांत सांठवून ठेविलीं. रशियामधून जी लाट निघाली, तिनें पोलंड, फिन्लंड, बोखारा, खिवा, मँचूरिया, पोर्ट आर्थर, वगैरे अनेक ठिकाणें गिळून टाकलीं. त्याचप्रमाणें जर्मनीच्या किनाऱ्यावरून निघालेल्या लाटेनें टोगोलँड, कामेरून, जर्मन आफ्रिका, कौचू वगैरे ठिकाणें भक्षून आपली भूक शांत केली. पण ह्या सगळ्यांहूनहि अतिशय उंच अशी Imperialism (राज्य-विस्तारा) ची लाट इंग्लंडच्या बंदरामधून निघाली. ही लाट फारच भयंकर ! बाकीच्या लाटांनीं जमिनीचे भाग व्यापले, पण ह्या लाटेनें—समुद्रांपैकीं एक अंशभूत अशा या लाटेनें—प्रत्यक्ष समुद्रच व्यापून टाकले आहेत. ह्या लाटेनें हिंदी महासागर व्यापला आहे, पॅसिफिक महासागर व्यापला आहे आणि अटलांटिक महासागर व्यापला आहे. आणि ही लाट इतकी उंच उसळली कीं, साऱ्या जगामध्यें अतिशय उंच असा जो हिमालयपर्वत त्याच्या देखील डोक्यावरून ह्या लाटेचें पाणी गेलेलें आहे. असली ही भयंकर आणि प्रचंड लाट दुभंग करून ती फोडून, तिच्यामधून घुसून पलीकडे जाण्याचा बोअर लोकांनीं नुकताच प्रयत्न केला होता.

पण तो फसला. ती लाट फोडून तिच्यामधून पलीकडे पोहत जाऊं इच्छि-णारांची या लाटेनें अगदीं वाताहात करून टाकली आहे. सहस्रावधि पोहणारांना हिनें ठार बुडवून टाकलें आहे. कांहीं लोकांचे गळे अजून पाण्याच्या पृष्ठभागावर दिसत आहेत, पण त्यांनासुद्धां ही लाट थोड्याच वेळांत खालीं दडपून टाकणार, हें खास. इतके हिम्मतवान पोहणारे शूर तर खरेच. पण बिचाऱ्यांचा ह्या प्रचंड लाटेपुढें काय निभाव लागणार? जिब्राल्टर, माल्टा, एडन, बोर्नियो, सीलोन, सायप्रस, हाँकांग, हिंदुस्थान, वेहवे, मॉरिशस, नेटल, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, टॅसमॅनिया इत्यादिकांना जिनें बुडाविलें, त्या लाटेला ट्रान्सवालला बुडाविणें कठीण आहे काय? व ट्रान्सवालला बुडविण्याचें काम संपवून ही लाट हल्लीं चीन देशाकडे वळून पेकिनच्या राजवाड्यापर्यंत येऊन थडकली आहे. त्यामुळें या लाटेच्या भक्ष्यस्थानामध्यें आपणहि सामील होतों कीं काय, अशी पिवळ्या समुद्राला आणि त्याच्या कांठच्या पिवळ्या लोकांना चिंता उत्पन्न झालेली आहे. अशा प्रकारची ही Imperialism (राज्यविस्तारा) ची लाट चोहोंकडे पसरली आहे व पसरत आहे.

पण ही एक लाट झाली. व एका लाटेच्या विरुद्ध दुसरी लाट उत्पन्न होत असते, असा लाटांचा स्वाभाविक नियम आहे. त्याप्रमाणें ह्या राज्य-रूपी समुद्राच्या पृष्ठभागावरहि Imperialism (राज्यविस्तारा) च्या लाटेच्या विरुद्ध दुसरी एक लाट हळू हळू उत्पन्न होत आहे, असें जो कोणी सूक्ष्म रीतीनें सद्यःस्थितीचें पर्यालोचन करील, त्याला आढळून आल्यावांचून राहणार नाहीं. ह्या लाटेच्या प्रादुर्भावाला नुकती सुरुवात होत आहे. ह्या लाटेचें प्राथमिक उन्नतत्व अजून इतकें कांहीं लहान आहे कीं, त्यामधून लवकरच एक मोठी प्रचंड लाट उसळणार आहे, हें कोणा-लाहि इतक्यांतच विश्वसनीय वाटावयाचें नाहीं. आणि या लहानशा प्राथमिक उन्नतत्वामधून आपला भावी—आणि आपण प्रचंड तर आपल्या-पेक्षां प्रचंडतर असा आपला—शत्रु उत्पन्न होणार आहे, असें Imperialism (राज्यविस्तारा) च्या लाटेला इतक्यांत कधींहि खरें वाटणार नाहीं. पण तें तिला खरें वाटो किंवा न वाटो. प्राथमिक उन्नतत्वाचीं स्पष्ट चिन्हें तेथें आहेत, तेथें सूक्ष्म असा उच्चभाव उत्पन्न झालेला आहे. व तो हळूहळू

वाढत जाऊन त्याची डोंगराएवढी—पर्वताएवढी—उंच लाट बनणार. ती लाट मोठी होण्याच्यापूर्वी पहिल्या लाटेनें सावध व्हावें हें बरें. नाहींतर ती नवीन जोमाची नवीन लाट एकदां पूर्णपणें पोसली जाऊन पृथ्वीच्या पृष्ठभागावर गडबडा लोळूं लागली, म्हणजे तिच्याखालीं काय काय चेंगरून जाईल हें कोणाला माहीत आहे ! ही दुसरी लाट हत्तीसारखी पुष्ट होऊन चोहोंकडे सैरावैरा धावूं लागली, म्हणजे तिच्या तडाक्यांतून कोण बचावेल, आणि कोण नामशेष होईल, याचा काय भरंवसा आहे ! ह्या दोन लाटा निरनिराळ्या दिशेनें वाहणाऱ्या वाऱ्यानें खवळून आणि चवताळून जेव्हां एकमेकांच्या अंगावर धांवून जातील आणि जेव्हां त्यांची टक्कर होईल, तेव्हां त्यांचे तुषार किती लांब आणि किती उंच वर उडतील, याची आज कोणाला कल्पना करतां येणार आहे ! ह्या दोन लाटांचें जेव्हां मल्ल-युद्ध जुंपेल, तेव्हांचा तो प्रसंग फारच गंभीर आणि भयंकर होईल, यांत संशय नाहीं. पण अजून तो प्रसंग बराच लांब आहे. अजून नवीन लाट बाल्यावस्थेमध्यें आहे. अजून जुनी लाट पूर्णपणें मोडकळीस आलेली नाहीं. जुनी लाट अजून पोकळ व्हावयाची आहे. आणि नवी लाट अजून पुष्ट व्हावयाची आहे. पहिल्या लाटेचें नांव Imperialism ( राज्यविस्तारा ) ची लाट असें आहे, हें वर सांगितलेंच आहे. दुसऱ्या लाटेचें नामकरण रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूजचे प्रसिद्ध संपादक मि. स्टेडसाहेब यांनीं A wave of revolt ( क्रांतीची लाट ) असें केलेलें आहे. ह्या दोन लाटा—राज्यविस्ताराची लाट आणि राज्यक्रांतीची लाट—ह्यांच्याबद्दल जें कांहीं वर सांगितलें आहे, त्या खऱ्या गोष्टी आहेत. तें नुसतें रूपकच नाहीं. ती नुसती कविता नाहीं. ती नुसती काल्पित कादंबरी नाहीं. त्यामध्यें सत्य आहे. व तें सत्य ईश्वराचें आहे. त्याकडे दुर्लक्ष करणें कोणाच्याहि फायद्याचें नाहीं.

आम्हीं वर लिहिलेल्या गोष्टी सत्य आहेत किंवा नाहींत ह्याचा निर्णय मि. स्टेड ह्यांच्या लेखांतील पुढें दिलेल्या कांहीं कांहीं विधानांवरून कोणा-च्याहि लक्षांत येईल. आतांपर्यंतच्या व आतांच्या स्थितीबद्दल स्टेडसाहेब असें म्हणतात कीं, आजपर्यंतची स्थिति जर कोणीं पाहूं गेलें तर ती अशी होती कीं, युरोपियन लोकांनीं इतर जातीच्या सर्व लोकांवर अंमल करावा, अशी ईश्वराचीच इच्छा आहे, अशी बहुतेकांचीच समज झालेली होती. पण

आतां ह्यांत बदल पडूं लागला आहे. अशी ईश्वराची इच्छा आहे, याबद्दल आतां इतर लोकांना संशय येऊं लागले आहेत. आणि ते लोक, आमची व आमच्यापाशीं जें कांहीं असेल नसेल त्यांची वाताहात लावण्याचा तुम्हांला ज्याच्या योगानें अधिकार प्राप्त झाला आहे, त्या तुमच्या सनदा कोठें आहेत, त्या आम्हांला दाखवा, असें युरोपियनांना म्हणूं लागले आहेत. दुसऱ्यावर राज्य करण्याची ही देवानें युरोपियनांना दिलेली सनद देवानें त्यांच्या प्रत्यक्ष चेहऱ्यावरच लिहून ठेविलेली आहे, असें आजपर्यंत लोकांना वाटत होतें. लोकांनीं युरोपियनांकडे पाहिलें आणि त्यांच्या तोंडाचा रंग पांढरा आहे असें त्यांना दिसलें, कीं बस आहे; इतरांनीं आपलें चंबूगवाळें या शुभ्रपाणी गृहस्थांच्या हवालीं केलेंच पाहिजे अशी समज झालेली होती. व सर्वांच्या मस्तकावर युरोपियन असलाच पाहिजे असा या पृथ्वीवरील कायदाच आहे, अशी साऱ्यांची कल्पना झालेली होती; पण अलीकडे इतर लोकांना या तत्त्वाबद्दल शंका येऊं लागल्या आहेत. व त्यांना असें वाटूं लागलें आहे कीं, युरोपियन लोकांना इकडे राज्य करण्याबद्दलच्या मिळालेल्या सनदा ह्या गौर वर्णामध्यें नाहींत तर त्यांच्या तोफामध्यें असल्या पाहिजेत. पण तोफा हीच जर युरोपियनांची सनद असेल, तर मग काय ? कारण तोफा ही बाजारांत मिळणारी वस्तु आहे. आणि शुभ्रवर्णी दुकानदारांचा पैशाकडे विशेष ओढा असल्यामुळें बाकीच्या लोकांनीं पैसे दिले म्हणजे हे लोक त्यांना पाहिजे तितक्या तोफा विकत देण्याला तयार आहेत. व त्याप्रमाणें इतरांनींहि तोफा विकत घेतल्या आहेत, घेत आहेत व ते पुढेंहि घेतील. आणि आतां त्या लोकांच्या हातांत युरोपियन लोकांची तोफ असल्यामुळें आतां आपल्याला युरोपियन लोकांची जागाहि कां मिळवितां येऊं नये, असें त्यांना वाटूं लागलें आहे. हा प्रश्न बॉक्सर लोकांनीं पेकिन शहरामध्यें जराशा दांडगाईनें विचारला आहे. हा प्रश्न फिलिपाईन बेटामधील लोक अमेरिकेच्या विरुद्ध उत्थापित करीत आहेत. टर्कीचा सुलतान याच प्रश्नाबद्दल विचार करीत आहे. एल. सेन्यूसी ( उत्तर आफ्रिकेच्या वाळवंटी प्रदेशांतील मुसलमानांचा धार्मिक आणि राजकीय पुढारी ) यानें पुष्कळ दिवसपर्यंत या प्रश्नाचा खल करून, अखेरीस असें ठरविलें आहे कीं, आपल्याला ही गोष्ट करतां येण्यासारखी आहे. आणि सौडनमध्यें फ्रेंच आणि इंग्लिश यांच्या संबंधानें तो एकदां या

गोष्टीचें प्रत्यंतर घेऊन पाहणार आहे. आशांटी लोकांनींहि हाच प्रश्न विचारला आहे, पण त्यांना अजून उत्तर बरोबर सांपडलें नाहीं. लंडनमध्यें नुकतीच एक पॅनआॅफ्रिकन नांवाची सभा भरली होती, त्यातहि वरील प्रश्नांचा ऊहापोह झाला. त्या सभेचा जाहिरनामा फार लक्षांत ठेवण्यासारखा आहे. त्यांत अशी विनंति केलेली आहे कीं, या उपर तरी आफ्रिकेंतील नेटिव्ह लोक युरोपियनांच्या सुवर्णतृष्णेला बळी न पडोत, त्यांची स्वतंत्रता हरण केली न जावो, त्यांच्या कुटुंबांत व्यभिचार केला न जावो, त्यांच्या न्यायाच्या महत्त्वाकांक्षा जागच्याजागीं दाबल्या न जावोत, आणि उन्नति व सुधारणा यांचे दरवाजे त्यांच्याकरितां बंद केले न जावोत. त्यांतच पुढें असेंहि म्हटलेलें आहे कीं, खिस्ती मिशनरी लोक निर्दयपणानें आमची राजकीय अवनति आणि संपत्तीचें हरण करण्यासाठीं इकडे येतात, आणि खिस्ती धर्माच्या सत्यपणावर विश्वास ठेवून आमचे लोक त्यांच्या मोहपाशांत सांपडतात. असल्या गोष्टी आजपर्यंत खिस्ती लोकांनीं खिस्ती धर्माच्या पांघरुणाखालीं केलेल्या आहेत. त्या ते आतां तरी न करोत. अशा प्रकाराची चळवळ जगांत चालली आहे. व हेंच त्या पुढें मोठ्या होणाऱ्या लाटेचें प्राथमिक चिन्ह आहे, असें स्टेडसाहेबांचें म्हणणें आहे.

---

## इंडियन डोमेस्टिक सर्व्हिस : : १०

इंडियन सिव्हिल सर्व्हिस, इंडियन मिलिटरी सर्व्हिस, इंडियन मेडिकल सर्व्हिस वगैरे खातीं प्रख्यात आहेत. तशाच प्रकारचें इंडियन डोमेस्टिक सर्व्हिस हें एक खातें आहे. इंडियन सिव्हिल सर्व्हिसमधील लोक असिस्टंट कलेक्टर, कलेक्टर, कमिशनर वगैरे असतात. इंडियन मिलिटरी

सर्व्हिसमधील लोकांचे हुद्दे म्हटले म्हणजे लेफ्टेनेन्ट, कर्नल, ॲडजूटन्ट जनरल, स्टाफ ऑफिसर, कमांडर वगैरे असतात. इंडियन मेडिकल सर्व्हिसमधील लोकांपैकींहि कोणी असिस्टंट् सर्जन, कोणी सर्जन, कोणी केमिकल ॲनॅलायझर, कोणी सॅनिटरी कामिशनर, असे मोठमोठे अधिकारी असतात. ह्या खात्यांतून जसे मोठमोठ्या दर्जाचे, हुद्याचे आणि अधिकाराचे लोक असतात, त्याचप्रमाणें इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसमध्येंहि असतात. सिव्हिल सर्व्हिस म्हणजे मुलकी खातें होय. मिलिटरी सर्व्हिस म्हणजे लष्करी खातें होय, आणि मेडिकल सर्व्हिस म्हणजे वैद्यकीचें खातें होय. त्यांचप्रमाणें डोमेस्टिक सर्व्हिस म्हणजे घरगुती कामाचें खातें होय. डोमेस्टिक Domestic हा इंग्रजी शब्द आहे. व त्याचा अर्थ 'गृहकृत्यासंबंधीं' असा आहे. त्यामुळें डोमेस्टिक सर्व्हिस ह्या खात्यामध्यें सैंपाक करणें, कपडे धुणें, मुलांना खेळविणें, घोड्यांचा खरारा करणें, गाडी हांकणें, केर काढणें, दिवाबत्ती करणें वगैरे बारीक सारीक अशा अनेक गोष्टींचा समावेश होतो. ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसच्या खात्यांत जितक्या पोट बाबींचा अंतर्भाव होतो, तितक्या बाबींचा अंतर्भाव दुसऱ्या कोणत्याहि खात्यांत होत नाहीं. इतर खात्यांप्रमाणें ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसमध्येंहि मोठमोठ्या हुद्याच्या जागा आहेत, म्हणून वर सांगितलेंच आहे. त्यांतील मुख्य हुद्यांवरील लोक म्हटले म्हणजे बटलर, बबर्जी, साइस (घोडेवाला), कोचमन, भिस्ती, माळी, झाडू, पट्टेवाला, आया वगैरे होत. ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसचे महत्त्व कोणी कदाचित् कमी समजेल; पण बारीक दृष्टीनें विचार करून पाहिला असतां इंडियन सिव्हिल सर्व्हिस, मिलिटरी सर्व्हिस, मेडिकल वगैरे सर्व्हिसेसचें (खात्यांचें) जितकें महत्त्व आहे, तितकेंच ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसचें महत्त्व आहे, हें लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. हिंदुस्थान देशांत बाकीच्या तीन सर्व्हिसेसची जितकी आवश्यकता आहे, त्याच्यापेक्षां रतभर जास्त अवश्यकता हिंदुस्थानाला ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसची आहे, असें म्हटल्यास गैरवाजवी होणार नाहीं. कारण इंडियन डोमेस्टिक सर्व्हिस हें हिंदुस्थानांतील सर्व साहेबलोकचें प्रत्यक्ष कामिसरिएट खातेंच आहे. साहेब कोणत्याहि खात्यांत असो, त्याचें जर डोमेस्टिक सर्व्हिसचें खातें बरोबर नसेल, तर त्याच्या हातून आपल्या खात्याचें काम कधींहि

बरोबर व्हावयाचें नाहीं. सिव्हिल सर्व्हिसमधील कलेक्टरसाहेब जमाबंदी-साठीं फिरावयास जावो; मिलिटरी सर्व्हिसमधील कमांडर साहेब शत्रूंशीं लढाई करावयास जावो; किंवा मेडिकल सर्व्हिसमधील डॉक्टर साहेब जखमी लोकांच्या जखमा बांधावयास जावो; इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसमधील लोक त्यांच्या बरोबर पाहिजेत; एरवीं त्याला आपलें काम कधींहि चांगलें करतां यावयाचें नाहीं. ह्यावरून ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसचा इंडियाच्या हिताहिताशीं किती जवळचा संबंध आहे, हें कोणाच्याहि लक्षांत येईल.

ह्या डोमेस्टिक सर्व्हिसचें महत्त्व किती आहे, हें आतां सांगितलेंच आहे. पण ह्या सर्व्हिसमध्यें एक विशेष आहे तो हा कीं, बाकीच्या सर्व्हिसेसपेक्षां ह्या डोमेस्टिक सर्व्हिसमध्यें चाकरी मिळविण्याची पात्रता अंगीं येण्याला फारसे श्रम करावे लागत नाहींत. सिव्हिल सर्व्हिस, मिलिटरी सर्व्हिस वगैरे खात्यांतून चाकऱ्या मिळण्याला फार परिश्रम करावे लागतात. लहानपणापासून हाडांचीं काडें करावीं लागतात. शाळेंतील शिक्षण पुरें झालें नाहीं तोंच कॉलेजामध्यें जावें लागतें. परीक्षापाठीमागून परीक्षा द्याव्या लागतात, व अतोनात पैसा खर्च करावा लागतो. पण इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसमध्यें चाकरी मिळण्याला असें कांहींच करावें लागत नाहीं. ह्या सर्व्हिसमधील शिक्षण देणाऱ्या अशा शाळा किंवा कॉलेजें कोठेंच नसतात. ह्या सर्व्हिसमध्यें असलेल्या लोकांचा हा वंशपरंपरेनें चालत आलेला धंदा असतो. बापाला ह्या खात्यांत चाकरी असली तर तो आपला मुलगा सात आठ वर्षांचा झाला, म्हणजे त्याला उगीच साहेबांच्या बंगल्यावर साहेबांला सलाम करण्याकरितां नेत असतो, व तो जसजसा मोठा होत जाईल तसतशी त्याजकडून बिनपगारी उमेदवारी करवून, त्याला तो बहुतेक कामांत तरबेज करतो. सारांश, साहेबांचा बंगला ही त्यांची शाळा व हेंच त्यांचें कॉलेज; आणि तेथील नोकर लोक हेच इंडियन डोमेस्टिक सर्व्हिस-मधील परीक्षेसंबंधाचें आपल्या मुलांना शिक्षण देणारे प्रोफेसर. इतक्या अगत्यानें असें घरगुती शिक्षण मिळाल्यावर मग काय कमी आहे? शिक्षण अनायासें प्राप्त होतें व त्यासाठीं एक कवडीहि खर्च करावी लागत नाहीं. ह्यामुळें पुष्कळ लोकांची ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसमध्यें शिरण्याचा कल फार असतो.

इंडियन सिव्हिल सर्व्हिस, इंडियन मिलिटरी सर्व्हिस, इंडियन मेडिकल सर्व्हिस आणि इंडियन डोमेस्टिक सर्व्हिस ह्या चार सर्व्हिसेस ( खात्यां ) बद्दल आपण हल्लीं मुख्यत्वेंकरून विचार करीत आहों. ह्या प्रत्येक सर्व्हिसच्या पाठीमागें इंडियन हें विशेषण लावलेलें आहे. परंतु पाहिल्या तीन ठिकाणचें इंडियन हें विशेषण आणि चवथ्या ठिकाणचें इंडियन हें विशेषण यांत पुष्कळ फरक आहे. इंडियन सिव्हिल सर्व्हिस, मिलिटरी सर्व्हिस, आणि मेडिकल सर्व्हिस म्हणजे इंडियांतील लोकांकरितां चाकरीस ठेविलेले इंग्लिश लोक असा अर्थ होतो. पण इंडियन डोमेस्टिक सर्व्हिस म्हणजे इंग्लिश लोकांकरितां चाकरीस ठेवलेले इंडियांतील लोक असा अर्थ होतो. इंडियन सिव्हिल सर्व्हिस असें तोंडानें म्हणावयाचें मात्र, आणि त्यांत इंडियन शोधूं गेलें तर एखादा दुसराच, हा जो आक्षेप बाकीच्या सर्व्हिसेसवर येऊं शकतो, तो ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसवर कधींहि येऊं शकत नाहीं. जशी इंडियन मिलिटरी सर्व्हिस ही फक्त युरोपियन लोकांकरितां राखून ठेविलेली आहे, त्याप्रमाणेंच इंडियन डोमेस्टिक सर्व्हिस ही फक्त इंडियन लोकांकरितांच राखून ठेविलेली आहे. येथें दुसऱ्या कोणाचा हक्क नाहीं. येथें फक्त इंडियनांचेंच साम्राज्य चालावयाचें. सगळ्याच सर्व्हिसेस युरोपियनांनीं व्यापून टाकल्या आहेत असा जो आक्षेप त्यांजवर करण्यांत येतो, तो किती खोटा आहे ! इंडियन डोमेस्टिक सर्व्हिस ही सबंध इंडियाकरितां त्यांनीं राखून ठेविली नाहीं काय ? मग विनाकारण दोष काय म्हणून द्यावा !

अशा प्रकारानें ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसमुळें पुष्कळ इंडियन लोकांच्या पोटाची सोय चांगली लागलेली आहे. तरी पण इंडियांतील वरिष्ठ प्रतीच्या लोकांना ह्या सर्व्हिसचें जितकें महत्त्व वाटावें, तितकें वाटत नाहीं, ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. पण उत्तरोत्तर शेतकींत जसजसा कांहीं अर्थ नाहींसा होत चालला आहे, आणि एकंदर देशाची सांपत्तिक स्थिति खालावत चाललेली आहे, त्या मानानें कनिष्ठ प्रतीचे लोक ह्या डोमेस्टिक सर्व्हिस मध्यें जास्त जास्त शिरत चाललेले आहेत, ही कांहींशी समाधानाची गोष्ट आहे. पण इतकेंच नव्हे, तर ह्या सर्व्हिसमध्यें शिरल्याबद्दल पुष्कळांना योग्य अभिमानहि वाटत आहे, व मेंबर ऑफ डोमेस्टिक सर्व्हिस हे शब्द बटलर, घोडेवाले, कोचमन, झाडूवाले वगैरे लोकांमध्यें फार महत्त्वसूचक म्हणून मानले जात

आहेत; आणि C. S. ( Civil Servant) ही जशी एक वास्तविक पदवी आहे, त्याप्रमाणेंच कांहीं दिवसांनीं प्रत्येक बबर्जी आणि कोचमन आपल्या नांवापुढें D. S. ( Domestic Servant ) ही पदवी लावून घेऊं लागेल कीं काय, अशी भीति वाटण्याला पुष्कळ जागा होत चाललेली आहे. इतक्या झपाट्यानें ह्या डोमेस्टिक सर्व्हिसबद्दलच्या अभिमानाची वाढ होत चाललेली आहे, हें हिंदुस्थानच्या दिवसेंदिवस होत चाललेल्या उत्कर्षाचें ल्हानसहान चिन्ह आहे असें नव्हे.

ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसची जरी इंडियन लोकांमध्यें इतकी चहा आहे, तरी हिच्यांत कांहीं दोष हे आहेतच. व ते सुधारण्यासाठीं मनुष्यजातीचें हित चिंतणाऱ्या कित्येक अँग्लोइंडियनांकडून मधूनमधून प्रयत्न होत आहेत व कांहीं वर्षांपूर्वी ज्याप्रमाणें सिव्हिल सर्व्हिस कमिशन बसलें होतें, त्याचप्रमाणें एक इंडियन डोमेस्टिक सर्व्हिस लीग स्थापन व्हावी, अशाबद्दलहि कांहीं अँग्लोइंडियनांचे परिश्रम चालू आहेत. त्यांना सर्वशक्तिमान परमेश्वर कधीं यश देईल तें देवो. सध्यां ह्या सर्व्हिसमध्यें जे दोष आहेत ते दूर करण्याला प्रथमतः सरकारची मदत फार जरूर आहे. व जरी सिव्हिल सर्व्हिससंबंधानें केलेल्या सूचना अमलांत आणण्याला सरकार मागेंपुढें पाहात आहे, तरी डोमेस्टिक सर्व्हिससंबंधींच्या सूचना तरी निदान सरकार अमलांत आणील, अशी आशा आहे. आणि ही डोमेस्टिक सर्व्हिस सुधारण्याकडे सरकारनें लक्ष दिलेंच पाहिजे, ह्याला एक विशेष कारण असें आहे कीं, ह्या सर्व्हिसमध्यें हल्लीं जो घोंटाळा माजला आहे, तो थोडासा सरकारच्याच चुकीमुळें आहे. कारण, इंग्लिशमन पत्रांतील एक लेखक म्हणतो कीं, नेटिव लोकांना हल्लीं वाजवीपेक्षां फाजील शिक्षण मिळत आहे व हल्लीं शिक्षण मिळविण्याला लोकांना खर्च कांहींच पडत नाहीं, त्यामुळें अशी स्थिति झाली आहे कीं, पांच रुपये पगार मिळविणारा चपराशी देखील इंग्रजी शिकत असतो. ज्याला हिंदुस्थानांत कधीं राहावयाचें नाहीं, असा एखादा विद्याव्यासंगी महात्मा चपराशाला देखील इंग्रजी येतें ह्याबद्दल आपला आनंद प्रदर्शित करील. पण ज्या युरोपियनांना हिंदुस्थानांत दिवस काढावयाचे आहेत, त्यांच्या दृष्टीनें पाहिलें, तर नेटिवांना इतकें इंग्रजी येणें बिलकुल क्षम्य नाहीं. कारण, एक तर आपल्याला इंग्रजी येतें या सबबीवर ते अधिक पगार

मागतात आणि दुसरी गोष्ट अशी कीं, साहेब लोक आपसामध्यें कांहीं इंग्रजी बोलत असले, तरी तें त्याला समजतें. तेव्हां सध्यां इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसमध्यें जो मुख्य दोष आहे तो हा कीं, त्यांतील लोकांना इंग्रजी येत असतें. तें त्यांना न येईल अशी कांहीं तरी सुधारणा करणें अत्यंत जरूरीचें झालें आहे. त्या बाबतींत सरकारसंबंधानें लिहितांना वरील लेखक असें लिहितात कीं, This was the result of the education which has been bestowed with too lavish a hand by our often unthinking Government, on those, who ought to be taught to walk before they are allowed to run. ह्याचा अर्थ असा कीं, ज्या लोकांना धांवण्याची परवानगी देण्याच्या आधीं चालावयासच शिकविलें पाहिजे, त्या लोकांना आमच्या पुष्कळ वेळां अविचारानें चालणाऱ्या सरकारनें वाजवीपेक्षां फाजील सढळ हातानें जें शिक्षण दिलें आहे, त्याचा हा परिणाम होय.

ह्या इंडियन डोमेस्टिक सर्व्हिसमध्यें दुसरा जो एक दोष उत्पन्न झाला आहे, तो मुख्यत्वेंकरून साहेबलोकांच्याचमुळें झालेला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. पूर्वींचे साहेब लोक नेटिवांकडून आपला मान कसा राखून घ्यावा ह्याबद्दल फार दक्ष असत. कारण, ते एकदां इकडे आले म्हणजे त्यांना बरींच वर्षें इकडे काढावीं लागत. हल्लीं आगगाड्या आणि आगबोटी ह्यांनीं विलायतचा प्रवास सुलभ झाल्यामुळें एक दोन वर्षांनीं साहेब विलायतेला जातात, त्यामुळें या डोमेस्टिक सर्व्हिसमधील लोकांच्या रीतिभातीकडे त्यांचें विशेष लक्ष नसतें. ते कशासाठीं नेटिवांची काळजी करतील ? पण ते यःकश्चित गोष्टीकडे दुर्लक्ष करितात एवढेंच नव्हे, तर त्यांच्यापुढें कोणी चाकर जोडे घालून किंवा कंबरबंद बांधल्यावांचून आला तरी देखील तिकडे लक्ष देत नाहींत. हेंहि एकवेळ पुरवेल. पण त्या चाकराच्या ह्या भयंकर अपराधाबद्दल कोणीं त्यांच्या स्नेह्यानें सद्धेतूनें त्यांना सुचविलें, तरी हल्लींचे साहेब लोक तिकडे कानाडोळाच करितात व उलट असा जबाब देतात कीं, ह्या जनावरां ( these beastly people ) च्या चालीरीतींकडे लक्ष देऊन मला काय करावयाचें आहे ? मी त्यांचा मालक आहे, हें त्यांना माहीत आहे एवढें बस्स आहे.

आणखी एक दोष ह्या डोमेस्टिक सर्व्हिसमध्यें आहे तो हा कीं, साहेब लोकांत स्त्रियांना किती मान देतात हें नेटिव नोकरांना बिलकूल माहीत नसतें. मुसलमान लोक तर ( इंग्लिश लोक गाईला आत्मा नाहीं म्हणून ज्या प्रमाणें मानतात त्याप्रमाणेंच ) बायकांना आत्मा नसतो असें मानतात. त्यामुळें त्यांच्या हातून मेमसाहेबांचा बहुतेक वेळां अपमान होतो. नुकताच एक खिदमतदार एका मेमसाहेबांना 'चप राव' असें म्हणाला. ते शब्द जर साहेबानें ऐकिले असते तर त्याने गुद्दाच लगावला असता. आणि तो यथायोग्य झाला नसता असें कोण म्हणेल! पण आजकाल हिंदुस्थानची अशी कांहीं विलक्षण स्थिति झाली आहे कीं, लगेच तो नोकर साहेबांवर फिर्याद करितो, जरूर लागल्यास खोटे साक्षीदार गोळा करतो, आणि साहेब खोटें बोलत नसल्यामुळें साहेबाला दंड होतो! ही स्थिति सुधारणें फार जरूर आहे. ह्यासाठीं सरकारनें ह्या डोमेस्टिक सर्व्हिसमधील लोकांची एक नोंद ठेवावी असें सदरील लेखकानें सुचविलें आहे. परंतु त्याची दुसरी कल्पना अशी आहे कीं, ज्याप्रमाणें मिलिटरी सर्व्हिस वगैरे नेटिवांना बंद आहेत, त्या प्रमाणें ही डोमेस्टिक सर्व्हिसहि नेटिवांना बंद करून टाकावी, व युरोपियन लोकांमध्यें पुष्कळ गरीब लोक आहेत त्यांचा भरणा ह्या सर्व्हिसमध्यें करून घ्यावा. असें झालें तर, हे नेटिवांनो, मग तुम्हांला कोणती सर्व्हिस उघडी आहे? कोणतीहि नाहीं. हें अरिष्ट लक्षांत आणून तुम्ही इंग्रजी शिकलां आहां तें जा ना पुरतें विसरून! तसेंच साहेबांच्या पुढें जातांना कंबरपट्टे बांधून आणि अनवाणी पायानें गेलां म्हणून त्यांत तुमचा काय खर्च होतो? तसेंच स्त्रियांना आत्मा नसतो असें मानणें हें अगदीं चुकीचें आहे. तर ही चूक द्यांना सोडून! कारण त्या योगानें तुमचें कल्याणच होणार आहे, व तुमची जी वाडवडिलार्जित इंडियन डोमेस्टिक सर्व्हिस ती तुमच्याकडे वंशपरंपरेनें यावच्चंद्रदिवाकरौ चालेल, यांत तिळप्राय संशय नाहीं.

---

## लोकमान्य आणि राजमान्य : : : ११

स्वभावतः पाहिलें तर सर्व मनुष्यें सारखीं. त्यांत एक मोठा आणि दुसरा लहान अशी गोष्ट मुळींच नाहीं. ह्या जगांत मनुष्य येतो त्या वेळची त्याची स्थिति आणि येथून तो जातो त्या वेळची त्याची स्थिति ह्या दोहोंचा विचार केला असतां, सर्व मनुष्यांच्या सारखेपणाची कल्पना मनामध्यें चांगल्या रीतीनें बिंबते. आतां मनुष्यामनुष्यांमध्यें जो फरक उत्पन्न होतो तो केवळ मधल्या स्थितीमध्यें उत्पन्न होतो. ह्या मधल्या स्थितींत कोणी श्रीमंत होतो, कोणी गरीब होतो, कोणी विद्वान् होतो, कोणी मूर्ख होतो, कोणी उद्योगी होतो, कोणी आळशी होतो, कोणी गोरा होतो, कोणी काळा होतो, आणि कोणी दैववान् होतो किंवा दैवहीन होतो. मधल्या स्थितीमध्यें उत्पन्न होणाऱ्या ह्या सर्व भेदांमुळें सृष्टीला एक प्रकारचें विलक्षण वैचित्र्य आलेलें आहे. हें वैचित्र्य नसतें तर, विरक्त न झालेल्या मनुष्याला ह्या जगामध्यें एक क्षणभरसुद्धां राहावलें नसतें. सांसारिक प्रवृत्तीच्या मनुष्याला, ही भेदबुद्धि नसेल तर, ह्या जगांत काय मनोरंजक वाटणार आहे ? त्याचा सर्व संसार निःसार होईल. व मग ज्ञानमार्गाचें, योगाचें वगैरेहि माहात्म्य पुष्कळ कमी होईल. कारण ह्यांच्या योगानें ज्या संसाराचा, ज्या भेदबुद्धीचा आणि ज्या वैचित्र्याचा उच्छेद करावयाचा त्यांपैकीं जर कोणीच नाहीं, तर मग ह्यांची तरी गरज काय ? शत्रू आहेत म्हणून तलवारी आणि बंदुका पाहि-जेत. त्याप्रमाणेंच भेदबुद्धि आहे, म्हणून ऐकात्म्य उत्पन्न करणारा योगमार्ग पाहिजे. सारांश, ह्या मधल्या स्थितींत उत्पन्न होणाऱ्या वैचित्र्यावर जगांतील पुष्कळ गोष्टी अवलंबून आहेत. व आपले मनुष्याचे परस्परांमधील अनेक ऐहिक

व्यवहारहि ह्याच वैचित्र्यावर अवलंबून आहेत. त्यामुळें निसर्गतः जरी आपण सर्व सारखे असलों, तरी इहलोकच्या भेदबुद्धीमुळें कोणी आपल्यापेक्षां वयोवृद्ध असतो, कोणी श्रीमान् असतो, कोणी विद्वान् असतो किंवा कोणी मान्य असतो. अशा निरनिराळ्या दर्जाच्या आणि योग्यतेच्या लोकांशीं आपल्याला व्यवहार करावयाचे असतात. ह्यांपैकीं सर्वच म्हणजे आपल्यापेक्षां वरिष्ठ दर्जाचे असतात असें नाहीं. व्यवहार्य लोकांचे तीन वर्ग करतां येण्यासारखे आहेत; आपल्यापेक्षां कमी दर्जाचे, आपल्या बरोबरीच्या दर्जाचे आणि आपल्यापेक्षां वरिष्ठ दर्जाचे. ह्या तिन्ही दर्जाच्या लोकांशीं बोलण्याचालण्याचा किंवा त्यांना पत्रें लिहिण्याचा वगैरे जो कांहीं व्यवहार, तो कोणी कसा करावा, याच्याबद्दल प्रत्येक समाजामध्यें कांहीं तरी निबंधनें केलेलीं असतात. तशीं तीं आपल्याहि समाजामध्यें आहेत, व सुधारकवीर हातांत इंग्रजी कुऱ्हाडी घेऊन आपल्या समाजांतील इतर निबंधनांप्रमाण ह्यांना तोडीपर्यंत तीं कायमहि राहतील. आपल्यापेक्षां कमी दर्जाच्या लोकांखेरीजकरून बाकी सर्व लोकांना आपण नेहमीं बहुमान देतों. आपल्यापेक्षां वरिष्ठ दर्जाच्या लोकाना बहुमान देणें तर जरूरच आहे. आपल्या बरोबरीच्यांना बहुमान देणें जरूरीचेंच नसलें, तरी पण आपण त्यांना जसा मान देऊं तसा ते आपल्याला देतील या धोरणावर आपल्यालाहि आपल्या बरोबरींच्याकडून बहुमान मिळावा या हेतूनें त्यांना बहुमान देण्याचा प्रघात सुरू झालेला आहे. व आपल्यापेक्षां कमी दर्जाच्या लोकांचें विनाकारण मन दुखविलें न जावें व थोडक्यांत त्यांना संतुष्ट करतां यावें यासाठीं त्यांनाहि कधीं कधीं बहुमान देण्याची चाल पडलेली आहे. हा बहुमान दाखविण्याच्या प्रकाराचे दोन भेद करतां येण्यासारखे आहेत. एक बोलून बहुमान दाखवितां येतो आणि दुसरा न बोलतां दाखवितां येतो. न बोलतां बहुमान दाखविणें ह्यांत बऱ्याच गोष्टींचा अंतर्भाव होतो. जोडलेले हात, नम्र केलेली मान, आदरयुक्त दृष्टि, प्रफुल्लित चेहरा, उत्थापन देणें, सामोरें जाणें, पाय धरणें लोटांगण घालणें, हीं सगळीं न बोलतां आपल्या मनांतील बहुमान व्यक्त करीत असतात. हा कृतीनें बहुमान दाखविण्याचा प्रकार होय. ह्या व्यतिरिक्त दुसरा प्रकार म्हटला म्हणजे भाषणानें बहुमान व्यक्त करण्याचा होय. ह्या प्रकारांत बहुमान सूचित

करण्यासाठीं कोणी कोणते शब्द उपयोगांत आणावे, याच्याबद्दल रूढीवरून सामान्यत: नियम बांधले गेल्यासारखे झाले आहेत. हल्लींच्या आपल्या समाजांतील सामान्य नियम म्हटला म्हणजे प्रत्येक बहुमान दाखविण्याला योग्य अशा मनुष्याच्या नांवापाठीमागें 'राजमान्य राजश्री' हे बहुमानसूचक शब्द लावण्यांत येत असतात व लिहिण्यामध्येंहि ह्याच बहुमानसूचक शब्दांचा उपयोग करण्यांत येत असतो.

ह्या बहुमानसूचक शब्दांचा थोडासा इतिहास आहे. हे शब्द हल्लीं मराठी भाषेंत प्रचारांत आहेत. त्यामुळें अर्थातच असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, जेव्हां मराठी भाषाच प्रचारांत नव्हती, तेव्हां हे शब्द प्रचारांत होते कीं नाहीं. मराठीच्या पूर्वी प्रचारांत असलेली जी प्राकृत किंवा संस्कृत भाषा तिच्यामध्यें हे शब्द होते असें दिसत नाहीं. 'राजमान्य राजश्री' हे शब्द संस्कृत भाषेमधलेच आहेत, हें खरें; तरी पण संस्कृत भाषा जेव्हां बोलली जात होती, तेव्हां ते संस्कृत बोलणारे लोक बहुमान दाखविण्यासाठीं ह्या शब्दांचा उपयोग करीत असत, असें मानण्याला कांहीं जागा नाहीं. त्यावेळीं हे शब्द उपयोगांत होते कीं नाहीं, हें जाणण्याला साधन म्हटलें म्हणजे फक्त त्या वेळचे लेख हेंच होय. कारण ते हजार वर्षांच्या मागचे लोक प्रत्यक्ष बोलतांना ऐकणें आतां अशक्य आहे. लेखांमध्यें अशा गोष्टी कळण्याला खाजगी पत्रव्यवहारापासून विशेष फायदा होण्याचा संभव असतो. पण त्यावेळचीं पत्रें कोठेंच उपलब्ध नाहींत. हीं पत्रें हल्लीं उपलब्ध न होण्याचीं अनेक कारणें आहेत. मध्यंतरीं पुष्कळ वेळ लोटल्यामुळें तीं नष्टप्राय झालीं असतील, व शिवाय पत्रें नेण्या–आणण्याच्या हल्लीं जशा सोयी आहेत, तशा पूर्वी नसल्यामुळें एकंदर पत्रें लिहिण्याचा परिपाठ पूर्वीच्याकाळीं कमी असला पाहिजे, यांत संशय नाहीं. कोणत्याहि कारणामुळें असो, पूर्वीचीं पत्रें हल्लीं उपलब्ध नाहींत एवढें खास. अशा स्थितींत त्या वेळचीं नाटकें वगैरे ग्रंथांवरूनच या प्रश्नाविषयीं आपल्याला काय तो विचार केला पाहिजे. ह्या ग्रंथांतून बहुमान सूचित करण्याचे प्रसंग पुष्कळ वेळां आलेले आहेत. व त्यांतच प्रसंगविशेषीं कित्येक पत्रांचाहि अंतर्भाव झालेला आहे. परंतु त्यांतील एके ठिकाणींहि 'राजमान्य' किंवा 'राजश्री' हे बहुमानसूचक शब्द वापरलेले दृष्टोत्पत्तीस येत नाहींत. ह्या विचार आपण मुख्यत्वें-

करून सामान्य स्थितींतील लोकांविषयीं करीत आहों व अशा प्रकारचें चित्र संस्कृतमध्यें म्हटलें तर मालतीमाधव आणि मृच्छकटिक याच नाटकांतून कांहींसें पाहावयास मिळतें. भवभूतीनें पुष्कळ वेळां बहुमान, प्रेम, आदर वगैरे दाखविण्यासाठीं ' महाभाग ' हा शब्द वापरलेला आहे. व शूद्रकाच्या लेखांत ह्याच अर्थी ' आर्य ' ह्या शब्दाचा उपयोग केलेला आहे. हे दोन्ही शब्द फार चांगले आहेत. व त्यांतील 'आर्य' हा तर फारच चांगला आहे. ' आर्य ' हा शब्द मागें कसा पडला, कोण जाणे. पण तो पुढें येईल तर बरें. असो. ह्यांवरून एवढें दिसून येईल कीं, ' राजमान्य राजश्री ' हे शब्द संस्कृत कालचे नव्हेत. हे निवळ मराठींतलेच आहेत. मराठींत हल्लीं ऐतिहासिक पत्रव्यवहार बरेच प्रसिद्ध झालेले आहेत. त्यावरून सामान्यतः असें म्हणतां येईल कीं, ह्या शब्दांचा उपयोग मराठी भाषेमध्येंहि बराच अर्वाचीन आहे. मराठ्यांच्या राज्याबरोबरच बहुधा हे शब्द उदयाला आलेले असावेत. कारण ते शब्दच आपल्या अभ्युदयाचा काल आणि आपला इतिहास सांगत आहेत. ' राजमान्य ' आणि ' राजश्री ' हे दोन्ही शब्द राजांना अगदीं निरुपयोगी आहेत. राजांना ते कधींहि लागू पडावयाचे नाहींत. तर राजे ज्यांना मान देतात आणि राजांच्यासारखी ज्याची संपत्ति आहे त्यांनाच हे शब्द लागूं पडण्यासारखे आहेत. तेव्हां मराठी भाषा बोलणारांना आणि लिहिणारांना राजे लोक मान देत होते आणि त्यांच्यापाशीं राजांच्या सारखी संपत्ति होती अशा वेळीं हे शब्द जन्म पावले, हें उघड होतें. व अशी वेळ म्हटली म्हणजे शिवाजीपासूनची होय. तेव्हांपासून मराठी भाषा बोलणारांचा खरा भाग्योदय झाला. तेव्हां आम्ही खरे राजमान्य होतों व खरे राजश्री होतों. तेव्हां आमचे राजे व परकीय राजेहि आम्हांला मान देत असत व तेव्हां खरोखरच आमच्यापाशीं राजांच्या सारखी संपत्ति होती. ' राजमान्य ' व ' राजश्री ' हे शब्द बहुतकरून ह्याच वेळीं उदयाला आले असले पाहिजेत हें वर सांगितलेंच आहे, पण ते केव्हांहि उदयाला आलेले असोत, ते जर कधीं अन्वर्थक झाले असले तर त्यांची अन्वर्थकता जी शिवाजीच्या वेळेपासून सुरू झाली ती दुसऱ्या बाजीरावापर्यंत अक्षय सुरू होती, यांत मात्र संदेह नाहीं. पण ती अन्वर्थकता फक्त बाजीरावापर्यंतच होती. पुढें ती उरली नाहीं. हल्लीं ज्याप्रमाणें मराठीशाहींतील पुणें हें राजधानीचें शहर मात्र राहिलें

आहे, पण त्यांत कांहीं अर्थ राहिला नाहीं, त्याप्रमाणेंच ‘ राजमान्य ’ आणि ‘ राजश्री ’ हे मराठीशाईतील शब्द मात्र राहिले आहेत, त्यांत कांहीं अर्थ राहिला नाहीं.

तेव्हां आतां असा प्रश्न उपस्थित होतो कीं, हे निरर्थक शब्द उपयोगांत असावेत किंवा नसावेत. अर्थ हा शब्दरूपी कुडींतील प्राण आहे. तो ह्या बहुमानसूचक शब्दांमधून निघून जाऊन हीं निव्वळ मढीं मागें राहिलीं आहेत. तीं आपल्या गळ्यांत कोणीं अडकवून घ्यावीं किंवा नाहीं, हा खरो-खर विचार करण्यासारखा प्रश्न आहे. हल्लीं ‘राजश्री’ या उपपदाला वास्तविक-पणें कोण पात्र आहे ? आपल्या लोकांच्यापाशीं राजांप्रमाणें संपत्ति होती. पण ते दिवस आतां गेले. आतां आपल्यापाशीं राजाप्रमाणें संपत्ति नाहीं. मग आपल्या ‘ राजश्री ’ हें उपपद तरी कशाला पाहिजे आहे ? हल्लीं ह्या हतभाग्य हिंदुस्थान देशांत ‘ राजश्री ’ ह्या उपपदाला योग्य असे लोक फारच थोडे असतील. इंग्रजांचे ॲडमिनिस्ट्रेशन रिपोर्ट आणि व्यापाराचे रिपोर्ट पाहिले म्हणजे हिंदुस्थान श्रीमंत होत आहे असे दिसत असेल. व तें कदाचित् खरेंहि असेल. कारण हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्य-पद्धतीनें कांहीं व्यापारी खरोखर श्रीमंत होत असतील, व कदाचित् कांहीं पार्शीहि कोट्याधीश झाले असतील. पण जोंपर्यंत आपण राजश्री फिलिप किंवा राजश्री बरजोरजी असें म्हणत नाहीं तोपर्यंत त्याचा काय उपयोग आहे ? ज्यांना राजश्री म्हणतां येण्यासारखें आहे त्यांच्यापाशीं संपत्ति नाहीं आणि ज्यांच्यापाशीं संपत्ति आहे त्यांना राजश्री म्हणतां येत नाहीं. अशा स्थितींत ‘राजश्री’ ह्या उपपदाचा काय उपयोग आहे ? जी संपत्ति नष्ट झाल्यामुळें हें उपपद निरर्थक झालें आहे तिच्या बरोबरच हें नष्ट झालें असतें तर काय वाईट झालें असतें ? व ती संपत्ति जर आतां आम्हांला सोडून गेली आहे तर तिचें द्योतक असें हें उपपदहि आपण जर सोडून दिलें तर त्यांत आपलें काय बिघडणार आहे ? “ राजश्री गोविंद-पंत दहा रुपयांच्या निवाड्यासाठीं पंधरा दिवस सावकारी तुरुंगांत बसून आहेत, किंवा माधुकरी मागून उदरनिर्वाह करीत आहेत, किंवा दुष्काळा-मुळें मरणोन्मुख झाले आहेत, ” अशी ज्यांच्याबद्दल विधानें करण्याची नेहमीं पाळी येत आहे त्यांच्या मागें ‘राजश्री’ ची उपाधी असण्यापेक्षां नसलेली

बरी नव्हे काय ? आपण बहुमानार्थी म्हणून ह्या उपपदाचा उपयोग करितों. पण ज्याच्यापाशीं पैसा नाहीं त्याला 'राजश्री' म्हणून हांक मारणें म्हणजे त्याच्या हृदयामध्यें विषाचें पाणी दिलेला भाला खुपसण्यासारखेंच नव्हे काय ? असलें हें निर्दय कर्म करण्याचें आपण केव्हां थांबणार !

'राजश्री' ह्या शब्दाची जी स्थिति आहे तीच 'राजमान्य' ह्या शब्दाचीहि झाली आहे. हल्लीं खरा 'राजमान्य' तरी कोण आहे ? कांहीं वेडेपीर असे आहेत कीं, ज्यांना राजा आपल्याला खरोखरच मान देतो असें वाटतें. रावसाहेब, खानसाहेब, खानबहादूर, रावबहादूर, के. सी. एस्. आय्., नाईट, वगैरे पदव्या हल्लींच्या राजानें कित्येकांना दिलेल्या आहेत. व त्यामुळें आपण सरकारच्या विश्वासांतील माणसें आहों असें त्यांना वाटत असतें. अशा लोकांनीं पाहिजे तर आपल्याला 'राजमान्य' म्हणवून घ्यावें. पण बाकीच्यांच्या अंगीं आपल्याला 'राजमान्य' म्हणवून घेण्याची काय पात्रता आहे ? कांहीं वरिष्ठ प्रतीच्या जागा देण्यापुरता देखील ज्यांच्यावर विश्वास नाहीं व ज्यांना लष्करी खात्यांतील नोकरीचा दरवाजा बहुतेक बंदच आहे, त्यांनीं आपल्याला 'राजमान्य' म्हणवून घेण्यांत काय अर्थ आहे ? आपण एकदां 'राजमान्य' होतों, पण त्याचें आतां काय ? एकदां सर्व हिंदुस्थानच्या खजिन्याची व्यवस्था लावण्याचें काम आपल्याकडे होतें, आणि अटकेपर्यंत धांव मारणाऱ्या सैन्याचें सेनापतित्वहि एकदां आपल्याकडे होतें. तेव्हां हीं कामें आपल्यावर सोंपाविण्याइतका आपल्यावर राजाचा विश्वास होता अशा वेळीं आपण खरोखर 'राजमान्य' होतों व ती खरी राजमान्यता. नाहीं तर हल्लीं साहेबानें आपल्या शिपायाला आपले बूट आणावयाला सांगितलें कीं, तेवढ्यांतच तो शिपाई आपण साहेबाच्या विश्वासांतील आहों असें मानून आपल्याला 'राजमान्य' म्हणवून घेऊं लागतो. असली राजमान्यता काय कामाची ? लेव्हीला किंवा गार्डन पार्टीला बोलावणें आलें म्हणजे आपण राजमान्य झालों असें कोणी समजतात, पण ही सुद्धां खरी राजमान्यता नव्हे. खऱ्या राजमान्यतेच्या ह्या नुसत्या पडछाया आहेत. ह्याच्या नादीं लागून आपल्या तोंडांतील भाकरीचा तुकडा गमावून बसलेले कुत्रे आपण थोडे पाहातों काय ? अशांना राजमान्य म्हणावयाचें ! आपण राजमान्य

नाहीं, अशी जर वस्तुस्थिति आहे, तर मग शब्दांनीं आपण राजमान्य होऊन काय उपयोग ? युरोपियन लोक आपल्याला कसें वागावितात, त्यांच्या शेजारीं सार्वजनिक आगगाडींत कधीं कधीं ते आपल्याला कसे बसवूं देत नाहींत, वगैरे गोष्टी लक्षांत आणिल्या म्हणजे आपल्या नांवापाठीमागें 'राजमान्य' हें उपपद लावून घेण्याला कोणालाहि शरम वाटल्यावांचून राहाणार नाहीं. मग असलें हें लज्जास्पद उपपद आपल्याला पाहिजे तरी कशाला ? 'राजमान्य' व 'राजश्री' हीं उपपदें लावण्याचे आपले हल्लींचे दिवस नाहींत. ते ज्यांचे असतील तिकडे हीं उपपदें खुशाल जावोंत. आम्हां मानहीन आणि कंगाल अशा नेटिवांना हीं कशाला पाहिजेत ? आपल्याला जेव्हां आपले राजे मान देऊं लागतील आणि आपल्याला जेव्हां राजांच्या सारखी संपत्ति प्राप्त होईल त्या वेळेला आपण ह्यांचा फिरून अंगीकार करूं. पण तोंपर्यंत आपण ह्यांचा निरोप घ्यावा, हें बरें.

ह्यांचा निरोप घेण्याचें आणखीहि एक कारण आहे तें असें कीं, हे शब्द आपल्यापाशीं पूर्वीं किती संपत्ति होती आणि आपल्याला पूर्वीं किती मान मिळत असे, यांची पावलों पावलीं आठवण करून देतात. पण अकिंचनपणांत आणि अपमानांत दिवस काढणें भाग पडलेल्या लोकांना ही वारंवार होणारी आठवण फारशी पथ्यकारक नाहीं. त्यामुळें ही दास्यत्वाची लोकयात्रा मुळींच सुखकर होत नाहीं. म्हणूनहि ह्या बहुमानसूचक उपपदांना आपण रजा दिली पाहिजे.

'राजमान्य' हें उपपद वर सांगितलेल्या रीतीनें आपल्या सद्यःस्थितीला विसंगत होत चाललें आहे. पण तें जसजसें विसंगत होत चाललें आहे, तसतसें दुसरें एक विशेषण अधिक अधिक उपयोगांत येत चाललें आहे. राजाकडून योग्य मान मिळण्याची आशा नेटिवांना उत्तरोत्तर कमी होत चाललेली आहे. त्यामुळें अर्थातच पुष्कळांचा ओघ राजमान्यता संपादन करण्याकडे न वळतां लोकसेवा करण्याकडेच वळत आहे. जसा राजाचा एक पक्ष तसाच लोकांचाहि दुसरा पक्ष आहे. राजपक्षाकडून जशा मोठमोठाल्या देणग्या मिळतील किंवा चाकऱ्या लागतील त्याप्रमाणें लोकपक्षाकडून मिळणार नाहींत हें खरें, तरी पण लोकांच्यापाशीं देण्यासारखा सन्मान आहे व जे कोणी निरपेक्ष बुद्धीनें लोककल्याण व्हावें या हेतूनें लोकसेवा करतात ते लोकांच्या सन्मा-

नाला पात्र होतात. तेव्हां हल्लीं जरी राजमान्यता दुर्मिळ असली तरी योग्य मार्गानें लोकमान्यता मिळवितां येण्यासारखी आहे. व हल्लींच्या स्थितींत हीच संपादन करण्याकडे पुष्कळांचा कल आहे. आणि त्यामुळें असा संभव आहे कीं, 'राजमान्य' हें उपपद हळूहळू लुप्त होऊन त्याची जागा 'लोकमान्य' हें उपपद लवकरच भरून काढील. अशी अन्वर्थक उपपदें अस्तित्वांत येणें फार जरूर आहे. नाहीं तर दुसरींहि कांहीं 'अज्जम', 'मिस्तर' वगैरे अस्तित्वांत आलेलीं आहेत. पण त्यांचा काय उपयोग! आपण कित्येक ठिकाणीं 'अज्जम गोविंदराव' आणि 'मिस्तर केशवराव' याप्रमाणें म्हटलेलें ऐकितों. जणूं काय गोविंदराव हा मुसलमान आहे आणि केशवराव हा ख्रिश्चन आहे. हल्लीं कांहीं जर एकापेक्षां दुसरें अधिक स्पृहणीय असेल तर राजमान्यतेपेक्षां लोकमान्यता हीच अधिक स्पृहणीय आहे. व जर हल्लीं कशाची आशा करण्यासारखी असेल तर ती लोकमान्यतेचीच करण्यासारखी आहे. व ही लोकमान्यता खरी लोकसेवा केल्यानें कोणालाहि प्राप्त होण्यासारखी आहे.

---

## मुद्रणस्वातंत्र्य : : : १२

कांहीं अँग्लोइंडियन आणि बहुतेक सुधारक यांचें असें मत आहे कीं, स्वातंत्र्याविषयींची बडबड ही अलीकडे फार वाढली आहे. आतां असा जरी या लोकांचा आक्षेप आहे तरी स्वातंत्र्याची खरी कल्पना फारच थोड्या लोकांना असेल. हिंदुस्थानच्या एकंदर तीस कोटी लोकसंख्येच्या मानानें पाहिलें असतां ज्यांना साधारण लिहितां वाचतां येतें अशा लोकांची संख्या दोन कोटींच्यावर नाहीं. पण ज्यांना नुसतें लिहितां वाचतां येतें त्या सगळ्यां-

नाच स्वातंत्र्याची खरी कल्पना कळलेली आहे असें मानितां येणार नाहीं. कित्येक चांगल्या सुशिक्षित लोकांना देखील खरें स्वातंत्र्य म्हणजे काय हें कळत नाहीं, असें कांहीं लब्धप्रतिष्ठ लोक प्रतिपादन करीत असतात. त्यांच्या मताप्रमाणें पाहिलें तर वरील दोन कोटी लिहितां–वाचतां येणाऱ्या लोकांच्या संख्येंतून निदान निम्मी तरी संख्या वजा केली पाहिजे. ह्या अशिक्षित वर्गांत मोडणाऱ्या हिंदुस्थानांतील सुमारें एकुणतीस कोटी लोकांना स्वातंत्र्याची काय कल्पना आहे ? हिंदुस्थानावर पूर्वी कोण राज्य करीत होते व हल्लीं कोण करीत आहेत, ह्याची ह्या २९ कोटी लोकांना काय दाद आहे ? आपलें शेत नांगरावें आणि काय पिकेल त्यांतून सरकारची आणि सावकाराची भर करून बाकी उरेल त्यावर आपली उपासमार करून घ्यावी, याच्यापेक्षां ह्या एकुणतीस कोटी लोकांना आणखी कशाची पर्वा आहे ? इतके लोक––तीस कोटींपैकीं एकूणतीस कोटी लोक–स्वातंत्र्याविषयीं बेपर्वा असतांना हिंदुस्थानांत स्वातंत्र्याची बडबड अतोनात झाली आहे असें म्हणणें म्हणजे वस्तुस्थितीकडे अतिशयच दुर्लक्ष करण्यासारखें आहे. आतां ज्यांना स्वातंत्र्याची कांहीं कल्पना आहे, अशा लोकांबद्दल आपण विचार करूं गेलों तर त्यांत सुद्धां आपल्याला असें आढळून येईल कीं, ह्या स्वातंत्र्याबद्दचे एकाचे विचार दुसऱ्याच्या विचाराशीं मुळींच जमत नाहींत. ह्या कारणामुळेंहि खरें स्वातंत्र कोणतें ह्याची कल्पना पुष्कळ लोकांना बरोबर करतां येत नाहीं. एकजण एक प्रकारचें स्वातंत्र्य चांगलें म्हणून मानतो, तर दुसरा दुसऱ्याच प्रकारचें स्वातंत्र्य चांगलें म्हणून मानतो. ह्या मतभेदाची एकवाक्यता सध्यांच्या स्थितींत होणें अशक्य आहे. हे मतभेद सध्या असेच चालावयाचे. आपलें स्वराज्य होतें त्यावेळेला स्वातंत्र्याची खरी कल्पना कोणती व आपल्या स्थितीला कोणत्या प्रकारचें स्वातंत्र्य मानवतें, वगैरे प्रश्नांबद्दल मतभेद मुळींच नव्हता. तेव्हां स्वातंत्र्य म्हणजे काय हें आपल्याला चांगलें समजत असें.

असो. कालमानाप्रमाणें ज्या ह्या स्वातंत्र्याच्या कल्पनेमध्यें हल्लीं असे मतभेत उत्पन्न झालेले आहेत तें स्वातंत्र्य अनेक प्रकारचें आहे. आम्हीं ज्याच्याबद्दल वर सामान्यतः उल्लेख केलेला आहे तें स्वातंत्र्य म्हणजे आपल्या देशाचें किंवा त्यांतील लोकांचें स्वातंत्र्य होय. पण ह्या सामान्य स्वातंत्र्या-

शिवाय हल्लीं बरींच निरनिराळ्या प्रकारचीं स्वातंत्रें अस्तित्वांत आलेलीं आहेत. विचारस्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य वगैरे शब्द हल्लींच्या स्थितीचे पोवाडे गाणाऱ्या लोकांनीं आपल्या परिचयाचे करून दिलेले आहेत. वरील शब्द हे निरनिराळ्या क्रियेमध्यें आपल्याला जें स्वातंत्र्य आहे त्याला अनुलक्षून बनलेले आहेत. स्त्रीस्वातंत्र्य ह्याचीहि हल्लीं फार गर्जना ऐकू येत आहे. ह्या अनेक प्रकारच्या स्वातंत्र्यांपैकीं मुद्रणस्वातंत्र्य ह्याविषयीं आज आपल्याला विचार कर्तव्य आहे. मुद्रण म्हणजे छापणें. त्या छापण्याच्या कामांत आपल्याला एक प्रकारचें स्वातंत्र्य आहे अथवा नुसतें आहे म्हणण्यापेक्षां इंग्रजांनीं तें आपणांस दिलें आहे, असें म्हटल्यास तें फारसें गैरवाजवी होणार नाहीं. ह्या मुद्रणस्वातंत्र्याबद्दल लोक सरकारची नेहमीं फार स्तुति करीत असतात. पण या बाबतींत जरा सूक्ष्म विचार करून पाहिल्यास ह्यांत सरकारची स्तुति करण्यासारखें फारसें कांहींच नाहीं. आपल्याला मुद्रणस्वातंत्र्याचा हक्क मिळाल्याबद्दल वेळोंवेळीं आपण आनंद प्रदर्शित करीत असतों, पण ह्या गोष्टींत आनंद मानण्यासारखें वास्तविक पाहतां कांहीं नाहीं. आपली हिंदुस्थानांतील लोकांची आज अशी स्थिति आहे कीं, आपण आनंद कशाबद्दल मानावा आणि खेद कशाबद्दल मानावा हें सुद्धां आपल्याला दुर्दैवानें कळेनासें झालेलें आहे. हंसावें केव्हां आणि रडावें केव्हां हें लहान मुलाला देखील समजतें; पण तें आम्हांला समजेनासें झालें आहे. जमीन होती तेथें पाणी आहे आणि पाणी होतें तेथें जमीन आहे अशी मयासुराच्या कृतीमुळें पूर्वी जशी दुर्योधनाला भ्रांति उत्पन्न झाली तशीच आम्हांलाहि हल्लीं होत आहे ह्यांत शंका नाहीं. मुद्रणस्वातंत्र्याचा हक्क आपणाला मिळालेला आहे ह्यांत आनंद मानण्यासारखें काय बरें आहे ? आम्हीं तुम्हांला मुद्रणस्वातंत्र्य दिलें आहे ही आम्ही केवढी उत्तम गोष्ट केली आहे, अशी प्रौढी इंग्रजी मुत्सद्यांनीं खुशाल मिरवावी. ती त्यांच्या ठिकाणीं यथार्थ आहे. पण त्या मुद्रणस्वातंत्र्याबद्दल आपणाला आनंदाच्या उकळ्या फुटण्याचें कांहीं कारण नाहीं. ह्या गोष्टींत त्यांचा मुत्सद्दीपणा आणि आपला मूर्खपणा मात्र आपण सिद्ध करून दिल्यासारखें होतें. आपण आनंद कशाबद्दल मानावा ? मुद्रणस्वातंत्र्य मिळतें म्हणून ! पण ह्या मुद्रणस्वातंत्र्याबद्दल आपल्याला किती किंमत द्यावी लागली आहे याची कोणाला कल्पना आहे काय ?

आपलें स्वातंत्र्य गेलें आणि आपल्याला मुद्रणस्वातंत्र्य मिळालें अशी वस्तु-स्थिति नाहीं काय ? व या दोन स्वातंत्र्यांचें महत्त्व आपण तोलून पाहिलें तर मुद्रणस्वातंत्र्य मिळाल्याबद्दल आनंद मानण्यापेक्षां स्वातंत्र्य गेल्याबद्दल दुःख मानणेंच अधिक स्वाभाविक नाहीं काय ? आपलें स्वातंत्र्य जाऊन आपल्याला मुद्रणस्वातंत्र्य मिळालें याबद्दल आपण आनंद मानणें म्हणजे आपल्या हातचा कोहळा गमावून त्याच्या जागीं आपण आंवळा संपादन केल्याबद्दल आनंद प्रदर्शित करण्यासारखेंच नव्हे काय ? एकटें मुद्रणस्वातंत्र्यच काय पण हल्लींच्या स्तुतिपाठकांनीं शोधून काढलेलीं मतस्वातंत्र्य, धर्मस्वातंत्र्य, स्त्रीस्वातंत्र्य वगैरे सर्व स्वातंत्र्यें एकत्र केलीं तरी ज्या स्वातंत्र्याची त्यांच्यानें बरोबरी व्हावयाची नाहीं, तें स्वातंत्र्य गमावुन हें मुद्रणस्वातंत्र्य कमावल्याबद्दल आनंदित होणें हें कोणाला तरी सयुक्तिक वाटेल काय ? हिरा सांडून उकीरड्यावरील नासकें कुचकें धान्य निवडून खाण्यांत उकी-रड्यावरील कोंबड्याशिवाय दुसऱ्या कोणाला आनंद होणार आहे ? ही स्थिति लक्षांत आणली असतां आपण कोणत्या गोष्टीबद्दल आनंद मानीत आहों, आणि त्या गोष्टीबद्दल आनंद मानणें योग्य आहे किंवा कष्टी होणें जरूर आहे, याचा कोणालाहि सहज उलगडा करतां येण्यासारखा आहे.

आतां असलीं स्वातंत्र्यें आम्हांला दिल्याबद्दल आमचें सरकार स्तुतीला पात्र आहे किंवा नाहीं, हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. प्रत्येक गोष्टीबद्दल सरकारची स्तुति करण्याची आम्हांला संवय लागून गेलेली आहे. पण ह्याचा वाईट परिणाम असा होतो कीं, सरसकट स्तुतीच्या योगानें सरकारची कर्तृत्वशक्ति आणि लोकांची सारासारबुद्धि हीं मंद होतात. आपण कसेंहि केलें, तरी आपले स्तुतिपाठक आपली स्तुति करण्याला तयार आहेत, असें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आल्यावर मग ते चांगलेंच कृत्य करण्याची तसदी कशाला घेतील ? व सगळ्याच कृत्यांना चांगलें म्हणाव-याचेंच, अशी स्थिति झाल्यावर लोकांना तरी चांगलें आणि वाईट यांचें ज्ञान कोठून होणार ? सबब ही सरसकट स्तुति करण्याची संवय फार घातुक आहे, व ती मोडून टाकणें फार जरूर आहे. योग्य स्तुति केली पाहिजे. पण अयोग्य स्तुति न करणें हेंहि तितक्याच अवश्यकतेचें आहे. मुद्रण-स्वातंत्र्याचें महत्व युरोपांतील देशांतून फार आहे; व तसें असण्याचें कारणहि

आहे. तें असें कीं, तिकडील लोकांना आपल्यासारखें निःशस्त्र केलेलें नाहीं. त्यांच्या हातांत शस्त्रें असतात. त्यामुळें ते लोक जें कांहीं म्हणतात किंवा लिहितात, त्याची आपण योग्य तजवीज लाविली नाहीं, तर हे लोक काय करतील कोण जाणें, अशी त्या लोकांबद्दल तिकडील सरकारांना भीति असते. पण ज्या देशांतील लोकांच्या हातचीं शस्त्रें काढून घेतलेलीं आहेत त्यांच्याबद्दल अशी शंका घेण्याचें कांहीं कारण नाहीं. अशा लोकांना मुद्रण-स्वातंत्र्य दिलें, तर त्यांत कांहीं फारसें दिल्यासारखें नाहीं. निःशस्त्र लोकांना बडबडण्याची परवानगी देणें आणि दांत पाडलेल्या सापाला फोंफावण्याची परवानगी देणें, हीं दोन्हीं सारखींच. शिवाय या हक्काच्या देणगीचा विचार करतांना ही एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, आपल्या इकडे या हक्कांचें आणखीहि एका कारणासाठीं फारसें महत्त्व नाहीं. कारण मुद्रण-स्वातंत्र्य मिळाल्यापासून काय करावयाचें, तर त्या मुद्रित केलेल्या लेखांचा लोकांच्या मनावर परिणाम उत्पन्न करावयाचा. पण आपल्या इकडे पुस्तकांची आणि वर्तमानपत्रांची संख्या अतिशय थोडी आहे. व त्याचप्रमाणें तीं वाचणारांची संख्याहि फार थोडी आहे. या गोष्टी पुढील आंकड्यांवरून सहज लक्षांत येण्यासारख्या आहेत. १८९० सालीं फ्रान्समध्यें ४१०० वर्तमानपत्रें होतीं, जर्मनीमध्यें ५५०० होतीं, आणि युनायटेडस्टेट्समध्यें १५,३०० होतीं. पण ह्यांच्या मानानें हिंदुस्थानचा आकडा पाहिला, म्हणजे तो किती तरी कमी आहे! त्याच सालीं हिंदुस्थानांतील पत्रांचा आंकडा फक्त ६४४ होता. इतकीं थोडीं पत्रें ज्या ठिकाणीं आहेत, त्या ठिकाणीं त्यांतील लेखांपासून काय परिणाम व्हावयाचा आहे? शिवाय ही एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, तीस कोटी लोकांमध्यें हीं ६४४ पत्रें आहेत. इतर देशांतून किती लोकसंख्येंत किती वर्तमानपत्रें आहेत व हिंदुस्थानांत त्यांचें प्रमाण कसें आहे, हें पुढें दिलेल्या कोष्टकावरून लक्षांत येण्यासारखें आहे.

| देशाचें नांव | लोकसंख्या | वर्तमानपत्रें |
|---|---|---|
| फ्रान्स | ३,८५,१७,९७५ | ४१०० |
| जर्मनी | ५,२२,७९,९०० | ५५०० |
| युनायटेड स्टेट्स | ६,२६,२२,२५० | १५३९२ |
| इंडिया | २८,७१,२३,३५० | ६४४ |

यावरूनहि इतर देशांत या हक्काचें महत्त्व कां आहे, आणि हिंदुस्थानांत कां नाहीं, हें वाचकांच्या लक्षांत येईल. ह्याप्रमाणें वर दिलेल्या कित्येक कारणांवरून मुद्रणस्वातंत्र्यांचा हक्क हा लोकांच्या फारसा फायद्याचा नसून सरकारला मात्र आपली प्रतिष्ठा मिरविण्याला एक साधन झालेलें आहे. वास्तविक सरकारनें ह्यांत आम्हांला कांहीं दिलें नाहीं; मग त्याबद्दल सरकारची स्तुति तरी कशाला पाहिजे ? व शिवाय इतका निरुपयोगी आणि क्षुद्र हक्क देऊन तो तरी अनियंत्रित ठेविला असता, तर एक असो. पण त्याच्या पाठीमागें कायद्याचीं नवीन कलमें लावण्यांत येत आहेत. त्यामुळें तर त्या मुद्रणस्वातंत्र्यांत कांहींच राम राहिला नाहीं. अशा या हक्काबद्दल आपण आनंदित काय व्हावें आणि सरकारची स्तुति काय करावी ? हा हक्क आपल्याला असण्यापेक्षां नसता तर अधिक बरें झालें असतें. कारण, हा हक्क म्हणजे वरून तोंड झांकलेल्या एखाद्या खळग्याप्रमाणें होय. ह्यांत कोणाचा केव्हां पाय जाईल, याचा नेम नाहीं. अशा रीतीनें ह्यापासून फायदा होणें तर लांबच राहिलें, पण उलटा कधीं कधीं अपाय मात्र होतो. शिवाय मुद्रणस्वातंत्र्याचा हक्क लोकांना देणें, म्हणजे त्या हक्काचा उपयोग करणाऱ्या सर्व लोकांना पगारावांचून आपले गुप्त बातमीदारच करण्यासारखें आहे. व त्यायमाणें सरकार हा हक्क लोकांना देऊन त्यापासून आपला फायदा करून

घेत आहे. मुद्रणस्वातंत्र्याच्या नादीं लागून आज जे सर्व लोक आपापले विचार सरकार पुढें मांडीत आहेत ते जर आपले विचार या रीतीनें प्रसिद्ध करतेना, तर यांच्या मनांत काय चाललें आहे कोण जाणें, अशी धास्ती सरकारला नेहमीं पडली असती. परतु आतां तशी स्थिति नाहीं. हल्लीं ह्या साधनानें लोकांच्या मनांत काय चाललें आहे, ह्याची अटकळ सरकारला अगदीं बरोबर बांधतां येते, व यांत सरकारचा इष्ट हेतु सहज साधला जातो. आणि आम्ही मात्र 'हक्क मिळाला आहे, हक्क मिळाला आहे' म्हणून विनाकारण उड्या मारीत आहों. ह्या गोष्टी आपल्याला केव्हां कळणार ?

---

## गोविंदपंतांचें पत्र : : : १३

गोविंदपंत हे वयानें व ज्ञानानें वृद्ध होते. यांचे विचार फार पोक्त असत. व ह्या जगांत अनेक प्रकाराचे टक्केटोणपे खाऊन अतिशय गरिबीच्या—माधुकरीच्या—स्थितींतून वाढत जाऊन अलीकडच्या काळांत हिंदु लोकांना जितके श्रीमंत होणें शक्य असतें, तितक्याच श्रीमंतीला ते जाऊन पोहोंचले होते. त्यांचा पुष्कळ दिवसांचा अनुभव, शांत स्वभाव, त्यांची परोपकारबुद्धि व त्यांचा सज्जनपणा, ह्या गुणांच्या योगानें ते अतिशय लोकप्रिय झालेले होते. व त्यांनीं सरकारी चाकरीमध्यें सरकारची मोठमोठीं महत्त्वाचीं कामें करण्यांत आपल्य। आयुष्याचे पुष्कळ दिवस खर्च केलेलें असल्यामुळें, त्यांना सर्व प्रकारच्या कामकाजांमधील चांगली माहिती असल्यामुळें, व देशकालवर्तमान पाहून त्याप्रमाणें कसें वागावें हें त्यांना उत्तम रीतीचें कळत असल्यामुळें, पुष्कळ लोक त्यांचा सल्ला घेतल्यावांचून कोणतेंहि काम करण्याला प्रवृत्त होत नसत. गोविंदपंतांचे एक परम स्नेही

असत. पण त्यांना निवर्तल्याला पुष्कळ दिवस झाले होते. त्यांच्या मागें वामन हा त्यांचा मुलगा होता. वामन हा गोविंदपंतांना आपल्या वडलांच्या जागीं मानीत असे. आणि गोविंदपंतहि वामनाला फार ममताळूपणानें वागवीत असत. गोविंदपंतांची सल्ला घेतल्यावाचून वामन कोणतीहि गोष्ट करीत नसे. वामनाच्या मनांतून आपण पोलिसमध्यें नोकरी धरावी, असें फार दिवसांपासून होतें. पण ह्या बाबतींत गोविंदपंतांचें मत घेतल्यावांचून वामनाला आपल्या आयुष्यक्रमाच्या तारवाचें सुकाणूं त्या दिशेनें कायमचें वळवितां येईना. म्हणून वामनानें सोलापुराहून गोविंदपंतांना मार्गशीर्षाच्या महिन्यांत एक पत्र धाडलें होतें. त्यांचें उत्तर आठ चार दिवसांत येऊन पोहोंचलें, त्यांत गोविंदपंतांनीं पुढील प्रमाणें मजकूर लिहिला होता:—

चिरंजीव राजश्री वामन यास,

अनेक आशिर्वाद विनंति विशेष. मार्गशीर्ष वद्य नवमी रविवार पावेतों श्रीचे कृपेंकरून आम्ही सर्वत्र मंडळी सातारा मुक्कामीं सुखरूप असों, विशेष. तुझें मिति मार्गशीर्ष शुद्ध १३ चें पत्र पोंचलें. तुझी बहीण सखूताई हिची प्रकृति दिवसेंदिवस क्षीण होत चालली आहे, हा पत्रांतील मजकूर वाचून फार काळजी वाटत आहे. येथें कांहीं जुने चांगले नामांकित वैद्य आहेत. तेव्हां जर सखूताईला कांहीं दिवस इकडे पाठवाल तर कदाचित् येथील औषधपाण्यानें आणि हवेनें तिची प्रकृति लवकर सुधारण्याचा संभव आहे- असो. तुझ्या पत्रावरून तुझ्या मनांतून पोलिसखात्यांत शिरून चाकरी पत्क- रण्याचें फार आहे, असें दिसतें. व त्याबद्दल माझा काय अभिप्राय आहे, हें तूं विचारलें आहेस. तूं ज्या प्रश्नावर माझें मत विचारलें आहेस, तो प्रश्न फार नाजूक आहे. व त्याबद्दलचे माझे विचार मी दुसऱ्या कोणत्याहि प्रसंगीं व्यक्त करण्याला तयार झालों नसतों. परंतु केशवराव यांचा आणि माझा जो अकृत्रिम स्नेहभाव होता, तो मनांत आणला म्हणजे त्यांच्या मुलाला ह्या बाबतींत योग्य सल्ला देणें, कसलीहि अडचण असली तरी, जरूर आहे, हें लक्षांत आणून मीं तुला हें पत्र लिहिलें आहे.

तूं मनांत आणलेला विचार मला मुळींच पसंत पडत नाहीं. पोलिसमध्यें चाकरी करण्याला योग्य असे गुण तुझ्यामध्यें कोणते आहेत, असें तुला वाटलें असेल तें असो. मला तर तुझ्या अंगांत त्या चाकरीला लागणाऱ्या

गुणांपैकीं फारच थोडे गुण आहेत असें वाटतें. प्रत्येक धंद्याला किंवा चाकरीला कांहीं विशेष गुण लागत असतात, व ते आपल्या अंगीं आहेत किंवा नाहींत, हें पाहून त्याप्रमाणें प्रत्येकानें आपण त्यांत पडावें किंवा नाहीं, हें ठरवावयाचें असतें. विवाह आणि उद्योगधंदा हे गृहस्थाश्रमाचे दोन मुख्य खांब आहेत. त्यांची निवड मनुष्य जशी चांगली करील, तसें त्याला पुढील प्रपंचांत सुख होणार आहे. ह्या गोष्टीची निवड सुज्ञ लोक वारंवार करीत नसतात. ती एकदांच, पण पूर्ण विचारानें, करण्यांत फार हित आहे. आज ह्या स्त्रीशीं विवाह करावा आणि उद्यां तिला टाकून दुसरीशीं विवाह करावा, आणि परवां तिलाहि टाकून तिसरीशीं लग्न करावें, हा प्रकार ज्याप्रमाणें गर्हणीय आहे, त्याचप्रमाणें आज ह्या खात्यांत नोकरी केली आणि उद्यां ती सोडून दुसऱ्या खात्यांत धरली किंवा तिसराच कांहीं धंदा आरंभला, तर तेंहि कांहीं मोठें भूषणास्पद नाहीं. ह्याकरितां जें कांहीं करावयाचें तें अशा रीतीनें करावें कीं, तें पुढें बदलण्याची पाळी आपणावर येऊं नये. तूं आपला धंदा अशा रीतीनें निवड, कीं तो निवडल्याबद्दल तुला पुढें पश्चात्ताप होऊं नये. पण याबद्दल तूं काय विचार केला आहेस ? पोलिसांवर वारंवार जे प्रसंग येतात, त्यांत सामान्यतः त्यांना धैर्याची विशेष गरज लागत असते. आणि तें तुझ्या ठिकाणीं कितपत आहे, याची मला शंकाच आहे. तूं तें काळें डगलें घातलेंस म्हणजे लोक तुला भितील, हें खरें. पण तूं लोकांना भिणार नाहींस, अशाबद्दल तूं काय खबरदारी करून ठेविली आहेस ? ज्या तुला रात्रीं काळोखांतून सोबतीवांचून बाहेर जाण्याची अजून भीति वाटते, त्या तुला शिपायाचा पोषाख घालून धैर्याचा उसना आविर्भाव आणतांना पाहून मला खरोखर तुझ्याबद्दल हंसूं, आणि तुझ्या त्या पोषाखाबद्दल कींव, आल्यावांचून राहणार नाहीं. नुसत्या पोषाखानें धैर्य येत नसतें. तें मूळचेंच मनांत असावें लागतें. आणि तें जर तुझ्यामध्यें नाहीं, तर तूं आपल्या भित्र्या अंतःकरणानें त्या पोषाखाला विटाळूं नको.

शिवाय दुसरी एक गोष्ट अशी आहे कीं, जर तुला शिपाईगिरीच करावयाची असेल, तर ती करण्याला उद्युक्त होण्याच्या पूर्वीं खरी शिपाईगिरी कोणती, ह्याचा तूं पूर्ण विचार केला पाहिजे. खरें शौर्य, खरें धैर्य, खरें तेज, हीं ह्या पोलिसच्या शिपाईगिरींत नाहींत. लढाई करणारा शिपाई हाच खरा

शिपाई होय. शत्रूच्या हातांत शस्त्र आहे, आपल्या हातांत शस्त्र आहे, अशा प्रकारची सर्व तयारी करून जो शत्रूशीं लढतो, तो खरा शिपाई. परंतु पोलिसांची तशी स्थिति कोठें आहे? पोलिस म्हणजे निःशस्त्र केलेल्या प्रजेला दाबांत ठेवण्यासाठीं योजिलेले सशस्त्र लोक होत. ह्यांना खरे शूर शिपाई कसें म्हणावें, हें तूंच सांग बरें! जो खऱ्या उदात्त आणि पराक्रमी स्वभावाचा मनुष्य आहे, तो असली शिपाईगिरी कधींहि पत्करणार नाहीं. लष्करी खात्यांत चाकरी धरणें आणि पोलिसखात्यांत चाकरी धरणें, यांत पुष्कळ फरक आहे. लष्करी खात्यांत चाकरी धरणें म्हणजे आपली मान हातावर घेऊनच ती धरली पाहिजे. जेव्हां जिकडे जाण्याचा हुकूम होईल, तेव्हां तिकडे गेलें पाहिजे. आणि एकदां लढाईवर गेल्यानंतर मग आपण जिवंत राहतों किंवा मरतों याचा काय नेम आहे? शिवाय त्या चाकरींत बायकामुलांची व इतरहि अनेक संसारबंधनें तोडून टाकावीं लागतात. व त्याला पुष्कळच मानसिक धैर्य आणि निवृत्तिपरता लागत असते. पण पोलिसची चाकरी त्या मानानें अगदीं क्षुद्र. जिवावर उदार होण्याचे प्रसंग मनुष्यावर वरच्यावर येत गेल्यानें त्याच्या मनामध्यें जो एक प्रकारचा उदात्तपणा बिंबला जातो, त्याचें तर या चाकरींत नांवच घ्यावयाला नको. ही चाकरी अगदीं सोपी. ह्यांत मरणाची भीति नाहीं. व बायकामुलांच्या सहवासांत आणि प्रेमपाशांत सुखानें आणि मजेनें आयुष्य घालविण्याला कोणताच प्रत्यवाय नाहीं. आणि ह्यामुळेंच मला वाटतें, पुष्कळ लोकांचा पोलिसखात्यांत शिरण्याकडे विशेष ओढा असतो. ज्यांना संकटाची विशेष अभिरुचि नाहीं, आणि ज्यांना सुखोपभोगांतच कृतकृत्यता वाटते, अशा लोकांच्या पोलिसच्या चाकरीवर बहुधा उड्या पडत असतात. पण तुझीहि तिकडेच प्रवृत्ति व्हावी, हें मला पसंत पडत नाहीं. तुला जर शिपाईगिरींतच पडावयाचें असेल, तर तूं खरी शिपाईगिरी पत्कर. तूं खऱ्या शिपाईगिरींत शिरावें, शिपाईगिरीच्या नुसत्या डगल्यांत शिरूं नयेस, अशी माझी इच्छा आहे. मनुष्यानें उत्तमाविषयीं नेहमीं महत्त्वाकांक्षा बाळगिली पाहिजे. व सर्व शिपायांत लढवय्या शिपाई उत्तम, हें मी तुला सांगितलेंच आहे. तेव्हां जर तुला शिपाईच व्हावयाचें असेल, तर तूं उत्तम शिपाई हो. पण तुला लढाईतल्या जखमेची किंवा मरणाची भीति वाटते, म्हणून तूं आपल्या हातांत शस्त्र घेऊन इतर निःशस्त्र लोकांना घायाळ किंवा ठार

करण्याला कधींहि उद्युक्त होऊं नकोस. जर तुला उत्तम कृत्य करतां येत नसेल, तर तूं स्वस्त बैस. पण क्षुद्र कृत्य करण्याला कधींहि प्रवृत्त होऊं नकोस. यासाठीं तूं ही चाकरी धरूं नकोस, असें मला वाटतें. याशिवाय त्या चाकरीलाहि जें थोडेंसें धैर्य लागतें, तेंहि तुझ्या अंगांत आहे किंवा नाहीं, याची मला शंकाच आहे.

आतां यावर तूं असें म्हणशील कीं, ज्यांत धैर्यापेक्षां अकलेचीच विशेष गरज आहे, अशाच प्रकारचीं जीं कामें आहेत, त्यांत मी प्रावीण्य मिळवीन. हें तुझें म्हणणें सकृद्दर्शनीं बरेंसें दिसतें. पण त्यांतहि विचाराअंतीं फारसें तथ्य आहे असें मला वाटत नाहीं. तूं ज्या खात्यात शिरूं इच्छित आहेस, त्यांत कांहीं धैर्याचीं आणि कांहीं अकलेचीं कामें असतात, मला कबूल आहे. पण तीं अकलेचीं कामें म्हणजे कोणतीं ? गुप्त बातमी काढणें, बेमालूम पुरावा तयार करणें, कज्जा संगतवार जुळविणें वगैरे. हीं कामें कांहीं पोलिसांना करावीं लागतात, व त्यांत अकलेची जरूर असते, हें खरें. पण, त्याला नुसती अक्कल असली म्हणजे झालें, असें मात्र तूं समजूं नको. आणि नुसत्या अकलेच्या जोरावरच जर तूं आपलें तारू त्या भयंकर समुद्रांत लोटण्याला उद्युक्त असशील, तर त्याच्या पूर्वीं तूं चांगलाच विचार करावास, हें बरें. पण ते बाकीचे गुण सोडून दिले, व नुसत्या अकलेचीच गोष्ट घेतली, तर मी तुला असें विचारतों कीं, दुसऱ्याची गुप्त गोष्ट जाणण्याला अक्कल ती काय लागणार ? जर तूं एखाद्याचें पत्र फोडून त्यांतील मजकूर वाचून फिरून तें चिकटवून बेमालूम काम केलेंस, आणि अशा योगानें त्या पत्रांतील रहस्य तूं जाणलेंस, तर हें तूं अकलेचें काम केलेंस, असें निदान मी तरी म्हणणार नाहीं. एखाद्याचा तूं जीवश्चकंठश्च स्नेही आहेस, असें त्याला भासवून त्याच्या मनांतील हृद्गत तूं काढून घेतलेंस, तर ह्यांत तुझ्या अकलेबद्दल तुला शाबासकी द्यावी, असें कोणालाहि वाटावयाचें नाहीं. दोघे कांहीं गुप्त गोष्टी बोलत असले, आणि ती तूं आडून ऐकलिस, तर ह्यांत फार झालें तर तुझ्या कानाची तारीफ करतां येईल; पण तुझ्या डोक्याची कशी करावयाची ? असल्या प्रकारांनीं गुप्त बातमी काढण्यांत अक्कल कोठें लागते, हें मला समजत नाहीं. ज्याला डोळे आहेत तो दुसऱ्याचें पत्र त्याच्या अपरोक्ष उघडून वाचूं शकेल, ज्याला जीभ आहे तो 'मी तुझा जीवश्चकंठश्च स्नेही आहें' असे शब्द उच्चारूं शकेल; आणि

ज्याला कान आहेत, तो दुसऱ्याचें बोलणें आडून ऐकूं शकेल. माझें जर कोणी पत्र फोडील, किंवा मी तुझा जिवलग मित्र आहें, अशी खोटी थाप मारील, किंवा कांहीं गुप्त गोष्ट बोलत असतां चोरून ऐकेल, तर मी तर त्याला विश्वासघातकी, कपटी, आणि अप्रामाणिक असें समजेन. मी अशा मनुष्याच्या अकलेबद्दल त्याची तारीफ न करतां, किंवा त्याला कांहीं बक्षीस न देतां, उलट राजदरबारांतून त्याला शासन करविल्यावाचून कधीं सोडावयाचा नाहीं. व असेच इतरहि कोणी मनुष्य करील तेव्हां एक तर हीं अकलेचीं कामें नव्हेत, व असलींच तरी त्यांतील अक्कल ही प्रशंसनीय किंवा उत्तेजनीय मुळींच नव्हे. वामना, अक्कल ही परमेश्वरानें मनुष्याला एक अप्रतिम आणि अमूल्य देणगी दिलेली आहे. तेव्हां तिचा सद्व्यय करण्याविषयीं मनुष्यानें फार काळजी घेतली पाहिजे. तुला जर देवानें अक्कल दिली असली, तर तिचा नेहमीं चांगल्याच कामाकडे उपयोग करण्याची तूं महत्त्वाकांक्षा बाळग. लोकांचे खिसे कातरण्याकरितां किंवा खोटीं कर्मे करण्याकरितां देवानें तुला अक्कल दिलेली नाहीं, हें तूं पक्कें समज. तिच्या साधनानें तुला जर कांहीं सत्कर्म करतां आलें, तर तें तूं कर. नाहीं तर ती स्वस्थ तुझ्या डोक्यांत पडूं दे. पण तिचा तूं वाईट कामाकडे कांहीं झालें तरी उपयोग करूं नकोस. अक्कल ही स्वर्गांतील एक ठेव आहे. आणि तूं चांगल्या सचोटीचा मनुष्य असें पाहून देवानें ती तुझ्या पेढीवर आणून ठेविली आहे. देवाचा तुजवर भरंवसा म्हणून त्यानें तुजपाशीं ही ठेव ठेविली. त्या देवाशीं बेभरंशानें वागूं नकोस. अक्कल ही एक सोन्याची झारी आहे. तिचा उपयोग गटारांतील घाणेरडें पाणी उपसून काढण्याकडे कधींहि करूं नये. तिच्यांत गंगेचें निर्मळ पाणी भरलें, तरच तिला विशेष शोभा येणार आहे. ज्यानें तुला ही सोन्याची झारी दिलेली आहे, त्याच्यावर तूं आपल्या अकलेच्या दुरुपयोगानें असें म्हणण्याची पाळी आणूं नको कीं, याच्या हातांत सोन्याची झारी देण्यापेक्षां मातीच खापर दिलें असतें, तर फार बरें झालें असतें. म्हणून तुला वारंवार असें सांगणें आहे कीं, तूं ह्या कामांत पडूं नकोस. वर पत्रें फोडणें, गुप्त गोष्टी ऐकणें, वगैरे जीं दोषास्पद म्हणून उदाहरणें दिलेलीं आहेत, तीं केवळ खासगी व्यवहाराला अनुलक्षून दिलेलीं आहेत. पण गुप्त बातमी काढणें वगैरे गोष्टींची राजाला

फार आवश्यकता असते. व सार्वजानिक हितासाठीं राजाला तसें करणें कधीं कधीं आवश्यकहि असतें, हें मला कबूल आहे. व प्रसंगविशेषीं राजानें आपल्या सेवकांकडून तशा गोष्टी करविल्या तर त्या क्षम्य आहेत, असेंहि समाजाच्या नियमांनीं ठरविलेलें आहे, हें मला कबूल आहे. पण इतकें झालें तरी, ह्या गोष्टी गौण पक्षांतीलच होत. म्हणून मी तुला असें म्हणतों कीं, तूं मुद्दाम ह्या गौण पक्षांत कशाला शिरतोस? आपल्या राजानें तूं अमुक काम कर म्हणून आपल्या प्रजेपैकीं कोणालाहि सांगितलें, तर तें त्यानें ऐकिलें पाहिजे. पण "तूं आतां पोलिसमध्यें चाकरी धरच," असें तुला कोण सांगावयाला आलें आहे! तें काम जर गौण आहे, तर तूं त्यांत कशाला पडतोस? तूं आज पोलिसखात्यांत शिरला नाहींस, म्हणजे तें आज बंद पडतें आहे, असें आहे काय? तूं पोलिसचा शिपाई झाला नाहींस, तर दुसरा कोणी तरी होईल, आणि गुप्त बातम्या काढून खटले तयार करील. गौण कार्यांत एवढी अहमहमिका कशाला पाहिजे आहे? चढाओढ आणि हौस दाखवावयाची असेल तर ती सत्कार्यांत दाखविलेली काय वाईट? म्हणून तूं आपल्या मनाची प्रवृत्ति पोलिस खात्यांतून काढून सन्मार्गाकडे लावावीस, अशी माझी फार इच्छा आहे.

तूं आपल्या पत्रांत असें लिहिलें आहेस कीं, येथील कांहीं अंमलदारांच्या ओळखीमुळें आणि वशिल्यामुळें तुझा पोलिसांत सहज शिरकाव होण्याचा संभव आहे. पण तुझ्या पत्रांतील हा मजकूर वाचून मला अतिशय वाईट वाटलें. तुझा बाप त्या प्रांतांत पुष्कळ दिवस मामलेदार होता, व पुढें कांहीं दिवस दप्तरदारहि झाला होता. त्यामुळें त्याच्या वेळचे जे कांहीं कामगार तेथें आहेत, ते अर्थात् तुझ्या उपयोगी पडतील, हें मी जाणून आहें. पण वशिल्यामुळें सहज चाकरी मिळत असली म्हणून तू पाहिजे ती चाकरी पत्करावी, हें योग्य आहे काय? वशिला आहे म्हणून चाकरी पत्करूं नको, तुम्ही योग्यता आहे किंवा नाहीं याचा मुख्य विचार कर. तुझा बाप जेथें मामलेदार आणि दप्तरदार होता, तेथें तूं पोलिसचा शिपाई व्हावेंस, ही गोष्ट तुझ्या मनाला झोंबत नाहीं कशी? ज्या कोर्टांत तुझा बाप माजिस्ट्रेटच्या खुर्चीवर बसत असे, त्याच कोर्टांत तूं आरोपीच्या बाजूला उभा राहूं इच्छितोस, अशी कुबुद्धि तुला कशानें होतें? जेथें फुलें वेंचलीं तेथें गोंवऱ्या वेंचण्याची

यःकश्चित् मनुष्याला देखील शरम वाटेल, पण तुला तर त्यांत मोठें भूषण वाटत आहे, असें दिसतें. केशवराव जिवंत असते आणि त्यांनीं तुला पोलिसचा शिपाई झालेलें पाहिलें असतें तर त्यांना त्यापासून मरणप्राय दुःख झालें असतें. बापापेक्षां मुलानें सवाई व्हावें. पण तुझा क्रम त्याच्या अगदीं उलट आहे. बाप मामलेदार आणि तूं शिपाई ! किती ही खेददायक स्थिति ! म्हणून तूं हा नाद सोडून दे. तूं लिहितोस कीं, तुझे स्नेही पोलिसांत नोकर आहेत. व ते चाकरीला लागून फार दिवस झाले नाहींत, तरी पैशाच्या बाबतींत ते फारच चांगल्या स्थितींत आहेत. याबद्दल मला एवढेंच सांगणें आहे कीं, या कारणासाठीं असेल तर तूं मुळींच पोलिस खात्यांत शिरूं नकोस. थोडक्या पगारांत आणि थोडक्या दिवसांत पुष्कळ श्रीमत होणें हें मला बिलकूल आवडत नाहीं. अशा संपत्तीला बहुत करून अन्यायाची घाण येत असते. असला पैसा आपल्याकडे येतो खरा. पण तो आपल्याबरोबर असंख्य लोकाचे तळतळाट आणि शिव्याश्राप आणीत असतो. ते पैसे देणारांच्या संतापानें तापलेले असतात आणि अश्रूंनीं भिजलेले असतात. आपलीं मुलें उपाशीं निजवून आणि आपल्या स्त्रियांची लज्जा चिंध्यांनीं झांकून नाइलाज झालेले लोक ते पैसे देत असतात. वामना, त्या पैशांवर तूं श्रीमंत होणार ? त्याच्यापेक्षां तूंच भिकारी होऊन भीक मागितलीस तर त्यांत काय वाईट ? केशवरावांनीं पुष्कळ पैसा मिळवून ठेविला आहे. तेव्हां तूं असा अन्यायानें पैसा मिळविण्याची इच्छा कधींहि धरूं नकोस. ज्यांनीं न्यायानें संपत्ति मिळविली त्याच्यापाशीं ती राहिली नाहीं. मग ला असें वाटावें काय, कीं अन्यायानें मिळवून ती तुझ्यापाशीं राहील? दुष्ट वासनांपासून तूं नेहमीं दूर राहा. आणि त्या दुष्ट वासनांचा तुला विटाळ न व्हावा, अशी तुझी खरोखर इच्छा असेल, तर तूं पोलिसखात्यांत चाकरी धरूं नको.

तूं लिहितोस कीं, तुझी म्याट्रिक्युलेशनची परीक्षा उतरली आहे, त्यामुळें तुला त्या खात्यांत नोकरी लागल्यापासून थोडक्याच वेळांत भराभर बढती मिळून तूं फौजदार होण्याचा संभव आहे. ह्या व ह्याच्या पुढील तुझ्या लिहिण्याच्या झोंकावरून असें दिसतें कीं, म्याट्रिक्युलेशनची तुझी परीक्षा उतरली आहे. याबद्दल तूं आपल्याला बराच कृतकृत्य मानीत आहेस. तुझी

म्याट्रिक्युलेशनची परीक्षा उतरली आहे, म्हणून तुझ्या विद्येवर भुलून तुला कोणी फौजदाराची जागा देईल, असें तूं समजूं नको. ह्या जागा विद्या येत असते म्हणून सुलभ रीतीनें मिळतात असें नव्हे, तर उलट फारशी विद्या येत नसते म्हणून मिळतात, अशी वास्तविक स्थिति आहे. नाहीं तर तुझ्या म्याटिक्युलेशनपेक्षां अधिक परीक्षा झालेले लोक काय त्यांना थोडथोडके मिळाले असते ? पण ते नको आहेत. ह्या शिपाईगिरीच्या कामाला अर्धे कच्चे, इंग्रजींत यस् नो करणारे आणि मराठींत ट फ करणारे असेच लोक पाहिजे असतात. अशा लोकांत जाऊन मिळण्याची तुला इच्छा उत्पन्न व्हावी ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे. तुला जमादार, फौजदार, ह्या नांवांत आणि हुद्यांत मोठें महत्त्व सांठविलेलें आहे असें वाटतें. पण अरे वेड्या, हा तुझा भ्रम आहे. हे नुसते शब्द मात्र आहेत. तूंच सांग कीं, जमातीवांचून जमादार ( जमातदार ) कसला ? आणि ज्याच्यापाशीं फौज नाहीं, तो फौजदार तरी कसला ? त्याच्यापेक्षां तूं पुढें विद्या शिकशील, तर यांत तुझें अधिक कल्याण आहे. आज तूं शिपाई होऊं इच्छित आहेस, पण तूं विद्या शिकून मोठा झालास तर उद्यां तूं दुसऱ्यांना शिपाई करशील. स्वतः शिपाई होऊन दुसऱ्यांच्या पुढें चालण्यापेक्षां आपल्या तैनातीलाच तसले शिपाई ठेवण्याची योग्यता जर तूं आपल्या अंगीं आणशील तर तें अधिक चांगलें नव्हे काय ? तेव्हां माझ्या सल्या-प्रमाणेंच जर तुला वागावयाचें असेल, तर तूं हा नाद सोडून दे, आणि पुढें शिकण्याच्या उद्योगाला तूं लाग. त्यांत तुझें हित आहे. तुझें मन विद्येनें संस्कृत झालें, म्हणजे तुला हल्लींच्या या तुझ्या विचाराची लाज वाटल्या-वांचून राहणार नाहीं. तूं ब्राह्मणाच्या कुळांत उत्पन्न झाला आहेस, हें लक्षांत ठेव. ब्राह्मणाच्या हांतून कोणताहि अनाचार होऊं नये, अशी माझी फार इच्छा असते. ब्राह्मणांचीं कामे निराळीं आहेत. त्यांनीं शिपायाचीं कामें करणें बरोबर नाहीं. तूं तरुण आहेस, तुझ्या अंगांत शक्ति आहे, व तुझ्या डोक्यांत बुद्धि आहे, त्या तारुण्याची, शक्तीची आणि बुद्धीची अशी उधळपट्टी मांडूं नकोस. त्यांची तुझ्या देशाला आणि देशबांधवांना फार जरूर आहे. म्हणून देशकार्यांत तूं आपला देह खर्च कर. त्यांत तुझा खरा लौकिक होईल. आजपर्यंत पोलिसचे शिपाई आणि फौजदार

लक्षावधि झाले असतील आणि लक्षावधि मेले असतील. व त्यांच्या हातीं ज्यांचे खटले गेले असतील, त्यांनीं त्यांना त्या वेळेपुरते लवून सलाम केले असतील. पण आतां ते कोठें आहेत ? आतां त्यांना कोण लवून सलाम करीत आहे ? आणि आतां त्यांच्या नांवाची कोणाला आठवण होत आहे ? तूं हें अगदीं पक्कें लक्षांत ठेव कीं, महत्कृत्य करणाराचें नांव मागें राहतें, पोलिसच्या शिपायाचें राहत नाहीं. ह्यासाठीं जन्मास येऊन प्रत्येकानें कांहीं तरी महत् कृत्य करण्याची महत्त्वाकांक्षा धरली पाहिजे. पोलिसचा शिपाई कोणीहि होईल. महत्कृत्य करणारा होईल तर तो खरा. वामना, तूं तसा होण्याचा प्रयत्न कर.

ह्याप्रमाणें गोविंदपंतांचें आलेलें पत्र वाचून वामनाच्या बुद्धींत एकदम फरक पडला. तें पोलिसांतील चाकरीचें त्याच्या डोळ्यांपुढील भेणाचें चित्र हळूहळू विरघळूं लागलें. थोडक्या वेळांत पुष्कळ श्रीमंत होण्याची व मामलेदार बापाच्या वशिल्यावर शिपाईगिरी कमावण्याची त्याची उत्कंठा क्षीण झाली. पोलिस शिपायापेक्षां अधिक स्पृहणीय असें जगांत दुसरें कांहीं आहे, असें त्याला वाटूं लागलें. वामनानें आपल्या एका पोलिस स्नेह्याकडून चाकरीच्या अर्जाचा मसुदा तयार केला होता, तो फाडून टाकला आणि कॉलेजमध्यें जाण्याची तयारी करून संक्रांत झाल्यावर वामनानें बडोद्याच्या कॉलेजमध्यें जाऊन आपलें नांव घातलें. गुदस्तांच त्याची इंटरमिजिएटची परीक्षा उतरली. हल्लीं तो बी. ए. परीक्षेचा अभ्यास करीत आहे.

---

# डेक्कन कॉलेजला पाहून केशवरावांच्या मनांत आलेलें विचार : : : १४

" Where ignorance is bliss,'tis folly to be wise."

डेक्कन कॉलेज सोडून केशवरावांना वीस पंचवीस वर्षें झालीं होतीं. डेक्कन कॉलेजांतून बी. ए. चा अभ्यास संपवून पुढें केशवराव एल. एल. बी. चा अभ्यास करण्याकरितां तीन चार वर्षें मुंबईस होते. ती परीक्षा पास झाल्या-नंतर त्यांनीं खानदेशांत बरींच वर्षे वकीलीचें काम केलें. पुढें कांहीं दिवसांनीं त्यांचा मुनसफीचा नंबर आल्यावर त्यांनीं मुनसफीची नोकरी पतकरली. केशवरावांनीं जरी सरकारी चाकरी धरली होती, तरी त्या चाकरीमुळें त्यांची स्वदेशभक्ति तिळभरहि कमी झाली नव्हती. ते नेहमीं इंग्रजी व मराठी वर्तमानपत्रें वाचीत असत. त्यामुळें आपल्या देशाचे आणि देशबांधवांचे कसकसे हाल होत आहेत, ह्याबद्दलची साद्यंत हकीगत त्यांना नेहमीं अवगत असे, व आपल्या देशाच्या अत्यंत कष्टमय स्थितीचें चित्र त्यांच्या डोळ्यां-पुढें रात्रंदिवस दिसत असे. स्वदेशाच्या सद्यःस्थितीचे विचार त्यांच्या मनांत नाहींत, असा एक क्षणहि गेला नाहीं. ते सुग्रास अन्न जेवीत असतांना, दुष्काळानें उपाशीं मरणारे लोक त्यांच्या डोळ्यांपुढें दिसत; व त्यामुळें त्यांना जेवण गोड लागत नसे. ते मऊ बिछान्यावर निजले असतांना घरांदारांवांचून आणि वस्त्रांवांचून उघड्या हवेंत थंडीनें कुडकुडणाऱ्या लोकाची त्यांना आठवण होई; व त्यामुळें त्यांना साऱ्या रात्रभर झोंप येत नसे. ते कोर्टांतील आपल्या न्यायाधीशाचे खुर्चीवर

अकरा वाजतां येऊन बसले, म्हणजे त्या दुपारच्या वेळीं उन्हा-तान्हांतून काबाडकष्ट करणारे लोक, आणि भाकरीच्या तुकड्यासाठीं दारोदार हिंडणारे भिक्षेकरी, हे त्यांच्या डोळ्यांसमोर दिसूं लागत; व त्यामुळें त्यांना बराच वेळपर्यंत कांहीं कामकाज सुचत नसे. आपल्या पगाराचे रुपये मोजून घेतांना, आपल्या निकालानें जे गरीब ऋणको दिवाणी तुरुंगांत पड-लेले असत, व ज्यांचीं घरेंदारें जप्त झालेलीं असत, त्यांची त्यांना आठवण येई; व दिवाणी तुरुंगांतील कैदी आणि जप्त झालेलीं घरें हीं महिन्याच्या कांठीं दहापांच तरी मोकळीं होत. पण ते कैदी आणि तीं घरें ह्यांना कोण मोकळें करतें, हें वादीला आणि प्रतिवादीला दोघांनाहि क्वचितच माहित असे. अशा रीतीनें केशवराव सरकारची आणि देशाची दोघांचीहि चाकरी बजावीत असतां कांहीं वर्षे लोटलीं. परंतु पुढें एकदां असा कांहीं प्रसंग आला कीं, त्यामुळें केशवरावांच्या मनाला उपरति होऊन, त्यांनीं आपल्या चाकरीचा राजीनामा दिला, व ते पुण्यांत सुखवस्तु येऊन राहिले. केशवरावांची स्वदेशभक्ति दिवा-सेंदिवस दृढ होत चालली होती. पण त्यांची प्रकृति मात्र उलट अगदीं क्षीण होत चालली होती. म्हणून ते व्यायामाकरितां दररोज फिरावयाला जात असत. नित्यक्रमाप्रमाणें एके दिवशीं पहाटेस फिरावयास गेले असतां, मध्येंच दमल्या-मुळें ते एका स्वच्छ कातळावर विसावा घेण्यासाठीं बसले. त्यांच्या पलीकडून एक लहानसा ओढा वाहत होता, व त्याच्या पलीकडे कांहीं गाई आणि वासरें चरावयाला लावून एक गोवारी आपलें अलगुज वाजवीत एका झाडा-खालीं बसला होता. व समोरून डेक्कन कॉलेजचीं उंच शिखरें धुक्यामधून अंधुक अंधुक दिसत होतीं. त्यांजकडे केशवरावांचें लक्ष गेलें. तीं शिखरें पाहून केशवरावांना पूर्वीची आठवण झाली. त्यांची राहण्याची खोली त्यांना दिसूं लागली. त्यांचे कॉलेजमधील सोबती त्यांच्या डोळ्यांपुढें उभे राहिले; व त्या वेळची स्थिति आपण आतां अनुभवित आहों, असा त्यांना क्षणभर भास झाला. तरी पण ती स्थितिच त्यांच्या डोळ्यापुढें फार वेळ राहिली नाहीं. त्या वेळच्या स्थितीवरून हल्लींच्या स्थितीचा त्यांना आठवण झाली. हल्लीं आपल्या लोकांचे होत असलेले हाल त्यांच्या डोळ्या-पुढें प्रत्यक्ष दिसूं लागले. आपल्या लोकांची हल्लींची दीन, हीन आणि परा-वलंबी अवस्था त्यांच्या मनाला विंचवासारखी चावूं लागली. व आपल्या

लोकांच्या हल्लींच्या दारिद्र्यामुळें त्यांना दाही दिशा उदास भासूं लागल्या. असे विचार मनांत येऊन त्यांचा कंठ दाटून आला व डोळे पाण्यानें भरून आले. व अशा स्थितींत त्यांच्या मनांत पुढील विचार आलेः—

" माझ्या लोकांच्या दुःखस्थितीबद्दल मलाच इतकें वाईट कां वाटतें आहे ? तो पलीकडच्या झाडाखालीं बसलेला गोवारी आपल्या गाई खडकावर चारावयाला सोडून देऊन आपली व आपल्या गाईची करमणूक करण्याकरितां आपलें अलगुज वाजवीत आहे. तो माझ्या देशांतीलच नव्हे काय ? त्याचा आणि माझा—आमचा दोघांचाहि—जन्म या हिंदुस्थान देशांतच झालेला नाहीं काय ? आणि मी ज्यांना आपले देशबांधव म्हणून समजतों, ते याचेहि देशबांधव नाहींत काय ? पण हे हिंदुस्थानांतील लोक जितके माझे देशबांधव आहेत, तितकेच ते याचेहि आहेत. तर मग या देशबांधवांच्या दैन्यावस्थेकारितां मी दुःखानें रडत बसावें, आणि यानें मजेनें अलगूज वाजवीत बसावें, असें कां ? असें कां होतें ? याचें कारण काय ? "

असें म्हणून केशवरावांनीं आपली शून्य दृष्टि चोहोंकडे फिरवली. इतक्यांत धुक्यामधून अंधुक अंधुक दिसणाऱ्या डेक्कन कॉलेजच्या शिखरांकडे त्यांची दृष्टि गेली. त्या बरोबर त्यांच्या तोंडांतून पुढील उद्गार निघालेः—

" याचें कारण हें कॉलेज ! माझ्या देशांतील लोकांच्या दुःस्थितीबद्दल मी कष्टी कां, आणि हा निष्काळजी कां, याचें कारण हें कॉलेज ! माझ्या देशांतील लोकांच्या पेट्यांतून पैसे नसले म्हणजे माझ्या पेटींत असलेले पैसे नाहींसे होतात असें नाहीं; मग मी त्यांच्या दारिद्र्यासाठीं कां रडावें ? आणि माझ्या देशांतील लोक अन्नावांचून उपाशी मरत असले, म्हणजे माझ्यापुढें वाढून येणाऱ्या ताटांतील पक्वान्नें कांहीं कमी होतात असें नाहीं. मग मी त्यांच्या उपासमारीसाठीं कां कळवळावें? अशी वास्तविक स्थिति असतां मी मात्र त्यांच्यासाठीं रडतों आणि कळवळतों, आणि हा खुशाल मजेनें अलगूज वाजवीत बसतो, हा काय न्याय झाला ! पण हा सगळा फरक या कॉलेजानें उत्पन्न केला आहे. मीं जर २५ वर्षांच्या पूर्वी या कॉलेजात पाऊल ठेविलें नसतें, तर आज मीहि याच्याच सारखा दुसऱ्या एखाद्या झाडाखालीं गाई चारीत आणि अलगूज वाज-

वीत सुखानें बसलों असतों; व तेथील गवत सरलें असतें, तर मी आपल्या गाई घेऊन दुसरीकडे गेलो असतों. ज्या दिवशीं मी या कॉलेजांत प्रथम गेलों, तो दिवसच जर अजीबात उगवला नसता, तर आजचा हा दिवस उगवण्याच्या वेळीं मला माझ्या दुःखमय स्थितीबद्दल पश्चात्ताप आणि या गोवाऱ्याच्या आनंदमय जीवनयात्रेबद्दल हेवा कधींहि वाटला नसता ! मला लहानपणीं फारसें समजत नसे, त्यामुळें माझी म्याट्रिक्युलेशनची परीक्षा होण्याच्या आधींपासूनच मी कॉलेजबद्दल मनोराज्य करीत असें. व मी कॉलेजमध्यें आलों, तेव्हांहि माझ्या मनांत फार आशा होत्या. पण आतां त्या आशांत कांहीं अर्थ नाहीं, अशी माझी खात्री होऊन गेलेली आहे. ह्या कॉलेजमधून शिकून बाहेर पडलों, म्हणजे मी अमुक करीन, आणि तमुक करीन, असें मला वाटत होतें. मी आपल्या देशाच्या कांहीं तरी कामीं येईन, मी आपल्या देशांतील लोकांची दैन्यावस्था दूर करीन, मी आपला धर्म उत्कृष्टावस्थेला नेईन, अशा एक कां दोन, लक्षावधि महत्त्वाकांक्षा माझ्या मनांत घोळत होत्या. पण या महत्त्वाकांक्षा कॉलेजमधल्या ! कॉलेजमधल्या महत्त्वाकांक्षा आणि कॉलेजच्या बाहेरील जगांमधील वस्तुस्थिति यांच्यांत किती अंतर ? पण या अंतराची त्या वेळीं किंचित्‌हि कल्पना नसते. मी कॉलेजमधून बाहेर आलों, आणि जगाचा अनुभव घेऊं लागलों, तेव्हां मला असें दिसून आलें कीं, मला फारच थोडी स्वतंत्रता आहे; व मला माझ्या देशाकरितां आणि देशबांधवांकरितां फारच थोड्या गोष्टी करतां येण्यासारख्या आहेत. मी पाहिजे तर शाळेंत पोरें हाकलूं शकेन, एखादा बिन किफायतीचा धंदा चालवूं शकेन, किंवा कांग्रेसमध्यें शब्दापुढें शब्द ठेवून कांहीं वाक्यें बोलूं शकेन; पण याच्या पलीकडे आपलें ज्यांत खरें हित आहे, अशी कोणतीहि गोष्ट आज आपल्यापैकीं कोणालाहि करतां येण्यासारखी नाहीं, अशी माझी पूर्ण खात्री होऊन चुकली. कॉलेजांत असतांना माझ्या पुष्कळ आशा होत्या. पण कॉलेजमधून बाहेर पडल्यावर मीं काय केलें ? वकिलीचा धंदा करून मी गरीबागुरीबांना नाडलें, आणि न्यायाधीश झाल्यावर मी सरकारचा तोंडपुजेपणा केला. याच्यापेक्षां आणखी मीं काय केलें ? माझ्या वाडिलांना फार वाटत होतें कीं, आपल्या मुलानें कॉलेजमध्यें जाऊन वरिष्ठ प्रतीचें शिक्षण संपादन करावें. बाबा, तुमच्या

इच्छेप्रमाणें मी कॉलेजमध्यें जाऊन शिकलों, व कांहीं दिवस तीनतीनशें रुपये पगार देखील मिळविला; पण त्याचा काय उपयोग? स्वार्थ साधण्यासाठीं मीं कॉलेजमध्यें जाऊन शिकावें अशी, बाबा, तुमची कधींहि इच्छा नसेल. पण कॉलेजमध्यें शिकून मीं दुसऱ्यांचा अर्थ काय साधला आहे? माझ्या हातून कोणतें देशकार्य झालें आहे? किंवा कोणत्या देशबंधूचें दुःख माझ्या हातून निवारण झालेलें आहे? पण या गोष्टी कॉलेजांतील शिक्षणानें सध्यांच्या काळीं होऊं शकतील, अशी कल्पनाच मुळीं चुकीची आहे. सध्यांचा प्रसंगच असा आहे कीं, कोणी कोठेंहि शिकलेला असो, सर्वांचे हातपाय सारख्याच रीतीनें बांधले गेलेले आहेत, व ते त्यांना कांहीं नियमित मर्यादेपर्यंतच हालवितां येतात; त्याच्या पलीकडे त्यांना कांहीं एक करतां येत नाहीं. अशी स्थिति असल्यामुळें या कॉलेजच्या शिक्षणापासून कांहीं तादृश फायदा होणें तर लांबच राहिलें, पण उलट एक मोठा थोरला तोटा मात्र होतो.

आपल्या देशस्थितीबद्दल मला वाईट वाटतें आणि हा गोवारी निष्काळजी आहे, याचें मुख्य कारण हेंच कीं, आपली, आपल्या देशाची, आपल्या लोकांची व आपल्या धर्माची काय दुर्दशा झाली आहे, हें मला कळतें; आणि याला कळत नाहीं. याला सांप्रतच्या आपल्या वस्तुस्थितीचें ज्ञान नाहीं, आणि मला आहे; यामुळें हा सुखी आणि मी दुःखी, असा आमच्यांत फरक पडला आहे. त्याच्या चार गाई हेंच याचें राज्य, रानांतलें कुरण हाच याचा देश, याचें झोंपडें हाच याचा राजवाडा, आणि या गाई व वासरें हीच यांची संपत्ति! याची दृष्टि फार आकुंचित आहे आणि याचें क्षितिज अतिशय मर्यादित आहे. म्हणून हा भाग्यवान् गोवारी सुखी आहे. परंतु माझी तशी स्थिति नाहीं. ह्या कॉलेजानें माझी दृष्टि विस्तृत केली आणि माझें क्षितिज अमर्याद केलें. मींहि या गोवाऱ्याप्रमाणें माझें कुरण हाच माझा देश आणि माझी गाईवासरें हीच माझी संपत्ति असें मानलें असतें. पण हें कॉलेजानें माझ्या ठिकाणीं आतां अशक्य करून ठेविलें आहे. तें सुख ह्या कॉलेजानें माझ्यापासून हिरावून घेतलें. ह्यानें मला शिकविलें कीं, गंगोत्रीपासून कन्याकुमारीपर्यंतचा सर्व हिंदुस्थान देश हा तुझा देश आहे. ह्यानें मला सांगितलें कीं, या हिंदुस्थान

देशांत अपार संपत्ति पूर्वी होती व अजूनहि आहे; व ती सर्व बुडली आहे. या गोष्टी यानें मला सांगितल्या नसत्या, तर आज मला जे सूर्यप्रकाशाचे दिवस मेघाच्छादित वाटत आहेत, आणि ज्या चांदण्याच्या रात्री अंधःकारमय वाटत आहेत, त्या तशा कां नरें वाटल्या असत्या! मी आपला वेळ अज्ञानाच्या सुखांत मोठ्या आनंदानें घालविला असता! पण या कॉलेजानें आणि कॉलेजांतील ज्ञानानें माझ्या सुखांत माती कालविली!! ह्यानें मला ह्या जगांत कोठेंहि विश्रांतीचें ठिकाण म्हणून ठेविलें नाहीं. तो गोवारी दिवसा पाहिजे त्या झाडाखालीं आपलें अलगूज वाजवीत बसूं शकेल, आणि रात्रीं पाहिजे त्या कातळावर झोंप घेऊं शकेल. पण मला हें शक्य नाहीं. ज्या मैदानांत मी हल्लीं आहें त्याचीच गोष्ट घेतली तरी जेथें तो गोवारी स्वस्थ बसला आहे, तेथील जागा पाहून माझ्या मनांत वादळांवर वादळें उत्पन्न होत आहेत. तेथेंच पूर्वी पेशवाई होती. तेव्हां पेशव्यांनीं कांहीं कामगिरीसाठीं होळकरांना बोलाविलें म्हणजे त्यांच्या सैन्याचा तळ त्या ठिकाणीं पडत असे! ज्या लढाईनें पेशव्यांची पेशवाई बहुतेक नामशेष झाली, ती लढाई—खडकीची लढाई—याच्याच आसपास कोठें तरी लढली गेली असली पाहिजे! त्या लढाईत आशा अपरिपूर्ण राहून धारातीर्थी पडलेले शूर लोक कदाचित् अजूनहि येथें पिशाच्चरूपानें हिंडत असतील. त्यांची भयंकर स्वरूपें माझ्या डोळ्यांपुढें दिसतात, तीं या गोवाऱ्याला कोठें दिसत आहेत? मी कोठेंहि जाऊन कोणतेंहि ठिकाण पाहिलें, तरी तेथील वैभव नाहींसें झालेलें आणि तेथील संपत्ति लयाला गेलेलीच माझ्या दृष्टीस पडते. संपत्ति गेल्यामुळें भिकार झालेलीं शहरें आणि वैभव गेल्यामुळें उजाड झालेलीं गांवें, हीं सर्व मला ह्या कॉलेजानेंच दाखवून दिलीं. ह्यानें मला ह्या गोष्टी सांगितल्या नसत्या, तर रायगड, पुणें, सातारा, विजापूर, आग्रा, दिल्ली, या ठिकाणांतून पूर्वीचे दगड, विटा, चुना, लांकडें, हीं कायम असलीं, तरी तेथून कांहीं तरी नाहींसें झालें आहे, असें मला कशाला वाटलें असतें! यानें जर मला या गोष्टी सांगितल्या नसत्या, तर मी या ठिकाणीं गेल्यावर शिवाजीचें थडगें, शनवारवाडा, अजीमताऱ्याचा किल्ला, गोलघुमट, ताजमहाल, किंवा कुतुबमिनार पाहण्याला जाऊन तेथें डोळ्यांतून टिपें कां बरें गाळलीं असतीं! इतर लोकांप्रमाणें मलाहि

तेथें जाऊन मजा मारतां आली नसती काय ? पण माझी सर्व मजा या कॉलेजानें नाहींशी केली आहे ! मी या कॉलेजावर एकदां अतिशय प्रीति करीत होतों, पण त्यावेळेला जर मला अशी कल्पना असती कीं, हेंच कॉलेज पुढें माझ्या सर्व सुखांत माती कालविणार आहे, तर मीं याच्यावर कधींहि प्रीति केली नसती. व या कॉलेजांतून विद्या मिळते व विद्या ईश्वराचाच अंश आहे, हें सर्व खरें. परंतु विद्येची कृति ईश्वराच्या कृतीपेक्षां पुष्कळ कमतरपणाची ! ईश्वर मनुष्याला डोळे आणि हात अशीं दोन्हींहि इंद्रियें देतो. पण विद्या फक्त मनुष्याला डोळेच देऊं शकते. याच्यापेक्षां जास्त ती देऊं शकत नाहीं. आणि हेंच तर वाईट ! याच्यापेक्षां डोळे नसलेले बरें. टँटॅलस म्हणून एक लिडियाचा राजा होता. ह्याला कांहीं अपराधाबद्दल अशी शिक्षा करण्यांत आली होती कीं, त्याच्या हनुवटीपर्यंत त्याला पाण्यांत बुडवून ठेविलें होतें. परंतु तहान लागली, तर त्याला तें पाणी पितां येणें शक्य नव्हतें. त्याला तें पाणी डोळ्यांनीं दिसत असे, पण हातानें घेऊन तोंडांत घालतां येत नव्हतें. ह्याच्यापेक्षां तें पाणी डोळ्यांनीं न दिसतें, तर टँटॅलसची तहान इतकी प्रक्षुब्ध झाली नसती. या कॉलेजांतील ज्ञानानें, ज्यांनीं तें संपादन केलें आहे, त्यांची अशाच प्रकारची स्थिति करून सोडली आहे. त्या ज्ञानानें दृष्टि उघडल्यामुळें सर्व बरें व वाईट, आपलें व लोकांचें, हल्लींचें व पूर्वींचें त्यांना कळतें. परंतु कळण्यापलीकडे दुसऱ्या कांहींच रीतीनें आपली अवस्था सुधारून घेतां येत नाहीं, अशी स्थिति आहे. अशा स्थितींत मला वाटतें; ज्ञानी असल्यापेक्षां अज्ञानी असणेंच अधिक चांगलें ! आपल्याविरुद्ध उठलेल्या देवदूतांना देवानें नरकलोकांत ढकलून दिलें, त्या वेळेला त्या ठिकाणीं थोडासा उजेड होता, पण त्या जागेंतील भयंकरपणा किती आहे, हें त्या पतित झालेल्या देवदूतांना दिसावें, एवढ्याच पुरता तो उजेड होता, असें मिल्टननें वर्णन केलेलें आहे. त्या प्रकारचीच आमच्या ज्ञानाची स्थिति आहे. आमच्या देशाची आणि आमच्या देशांतील लोकांची अवस्था किती भयंकर आहे, हें समजण्यासाठींच आमचें ज्ञान आहे. 'दुःखसंवेदनायैव मयि चैतन्यमर्पितम् ।' हें जसें रामानें म्हटलें आहे, तसेंच मला वाटतें. मलाहि असें म्हणतां येईल कीं, 'दुःखसंवेदनायैव मयि विज्ञानमर्पितम् ।' असलें पंगु ज्ञान ह्या

कॉलेजानें मला दिलें आणि त्यानें धड मला ह्या तीरावरहि स्वस्थ अलगुजें वाजवीत आणि गाई चारीत बसूं दिलें नाहीं, आणि धड पलीकडच्या तीरावरहि ह्या जगांतील स्पृहणीय व उन्नत स्थितीचा अनुभव घेण्यास मला नेलें नाहीं, तर एखाद्या भोंक पडलेल्या नावेप्रमाणें यानें मला या दुःस्थितीच्या नदींत मध्यावर आणून सोडून दिलें आहे. अशी या कॉलेजानें माझी दुर्दशा करून टाकिली आहे. यानें मला निरनिराळ्या वेळचे आणि निरनिराळ्या लोकांचे इतिहास वाचावयाला दिले. मला ते इतिहास वाचून काय करावयाचें होतें ? ते इतिहास न वाचलेले लोक जगांत थोडे आहेत काय ? त्यातलाच मी एक झालों असतों. पण निदान रात्रीची मला सुखाची झोंप तरी लागली असती. आणि आतां सगळ्या जगाचा इतिहास माझ्या स्मृतीमध्यें साठविलेली असूनहि माझ्या मनाला सुख म्हटलें तर काडी-इतकेंहि नाहीं. आपल्या देशांतील पूर्वीचे इतिहास वाचून आपले पूर्वज कसे होते आणि आपण त्यांच्या पोटीं कसे निर्माण झालों, हे विचार मनांत येऊन वाईट मात्र वाटावयाचें; आणि दुसऱ्यांच्या देशांतील हल्लींचे इतिहास वाचून ते लोक आपलें घोडें पुढें ढकलण्यासाठीं किती धडपडत आहेत, आणि आपण आपल्या उन्नतीविषयीं किती उदासीन आहों, असे विचार मनांत येऊन उद्वेग मात्र उत्पन्न व्हावयाचा; तें इतिहासज्ञान आपल्याला कशाला पाहिजे आहे ! अरे, गाई चारणाऱ्या गोवाऱ्या, अमेरिका इंग्लिशांच्या अंमलापासून स्वतंत्र झाली, जर्मनीनें फ्रान्सला एकदां पादाक्रांत केलें होतें, किंवा राघोबादादांनीं अटकेवर झेंडे लाविले, या गोष्टी तुला माहीत नाहींत म्हणून तुझी न्याहरीची भाकरी तुझ्या जिभेला फडसर लागते काय ? नाहीं ! तर मग तुला हा इतिहास माहीत नाहीं म्हणून तुझें काय वाईट झालें आहे ? आणि तो मला माहीत आहे म्हणून मीं तुझ्यापेक्षां अधिक काय कमाविलें आहे ? उलट मी आपल्या मनाची शांति मात्र त्याच्या-योगानें घालवून बसलों आहें, ती माझी मानसिक शांति मला कोणी परत देईल काय ? अरे सुखांत कालक्रमणा करणाऱ्या गोवाऱ्या, तुझ्या माझ्या स्थितीची आपण अदलाबदल करूं, येतोस काय ? पण छे ! छे ! तुला असें फसवून उपयोगी नाहीं. माझ्या ह्या बाह्यात्कारी डामडौलाला भुलून तूं कदाचित् फसशील. माझे हे बूट, ही पाटलोण, हा कोट, ही पगडी, हीं सर्व

बाहेरून तुला मोहक दिसत आहेत. पण ह्यांच्या आंत सारें दुःखच भरलेलें आहे. ज्या कॉलेजानें मला हें दुःखोत्पादक ज्ञान दिलें, त्यानेंच हा मला दुःखमय पोशाख दिलेला आहे! ह्यांत सुख नाहीं! तेव्हां तुझी सुखांत स्थिति तुझ्यापासून घेऊन तुला माझ्या दुःखांत टाकणें मला बरोबर दिसत नाहीं. हें ज्ञानजन्य दुःख माझें मलाच सहन केलें पाहिजे! दुसरा उपाय नाहीं! या गोवाऱ्याची स्थिति मला स्पृहणीय वाटते. पण ती मला प्राप्त व्हावी कशी? ह्या कॉलेजनें मला दिलेलें-ज्ञान माझ्यांतून नाहींसें झाल्यावांचून मला त्याच्यासारखें सुख कसें प्राप्त होणार! हें दुःख-जनक ज्ञान मी विसरून जाईन तर बरें! पण मी घोकलेले इतिहास आतां विसरणार कसे? ग्रीक लोकांच्या पुराणांत एक नदी वर्णिलेली आहे. तिचें पाणी प्यालें असतां मागील सर्व स्मृति नष्ट होते म्हणून म्हणतात. तसल्या एखाद्या नदीच्या पाण्यानें जर हें सगळें ज्ञान विसरून जाईल तर किती बरें चांगलें होईल! या कॉलेजच्या ज्ञानानें आम्हांला नास्तिक आणि धर्मभ्रष्ट मात्र केलें आहे. व दुसऱ्यांची उन्नतावस्था आमच्या डोळ्यांपुढें मांडून ती संपादन करण्याच्या अशक्यतेमुळें आमच्या मनांत त्यानें निराशा मात्र उत्पन्न केली आहे. अशा प्रकारचें ज्ञान असल्यापेक्षां नसलेलें बरें! व ज्ञानापेक्षां अज्ञानच बरें! डोळे आहेत पण हात नाहींत, आणि ज्ञान आहे पण कर्तृत्वशक्ति नाहीं, अशा स्थितींतील ते डोळे आणि तें ज्ञान नुसतें घेऊन काय करावयाचें आहे? जेथें अज्ञानांतच सुख आहे, तेथें सज्ञान होणें म्हणजे मूर्खपणाच होय."

अशा प्रकारचे विचार केशवरावजींच्या मनांत चालले होते तों सूर्य बराच वर आला. धुकें पडलेलें हळुहळू कमी होत जाऊन कॉलेजचें शिखर स्पष्ट दिसूं लागलें. त्या मैदानांतील गवतावर पडलेल्या दहिंवराच्या थेंबावर सूर्य-किरण प्रतिबिंबित झाल्याच्या योगानें हा इंद्रनीलमण्यांचाच मळा पिकला आहे कीं काय, असा भास होऊं लागला होता. तेथें जवळूनच जो ओढा वाहात होता, त्याच्या लहान लहान लाटांवर सूर्यबिंबाचीं अर्धवट प्रतिबिंबें चोहोंकडे पडल्यामुळें हा रत्नखचित जमिनीचा भाग आहे कीं काय, अशी शोभा दिसत होती. व तो गोवारी आपल्या गाई घेऊन अलगूज वाजवीत

घराकडे चालला होता. इतका उशीर झालेला पाहून केशवरावहि घरीं जाण्या-करतां उठले. उठल्यानंतर केशवरावांनीं डेक्कन कॉलेजच्या शिखराकडे एकदां फिरून पाहिलें. पण त्यासरशीं त्यांच्या डोळ्यांतून अश्रू आले. ते पुसून त्यांनीं आपली दृष्टि त्या गोवाऱ्याकडे आणि त्याच्या गाईकडे लाविली. पण कांहीं वेळानें तो गोवारी आणि त्या गाई दिसेनाशा झाल्या, तरी पण त्या गोवाऱ्याच्या अलगुजाचा शब्द ऐकूं येत होता, तोच ऐकत केशवराव किती तरी वेळ उभे राहिले. पण पुढें तोहि ऐकूं येईनासा झाला. तेव्हां एक दुःखाचा सुस्कारा टाकून केशवरावांनीं हळुहळू आपल्या घराकडे जाण्यास सुरुवात केली.

---

# गांधर्वविवाह आणि राक्षसविवाह : : १५

हिंदुधर्मशास्त्रांत विवाहाचे आठ प्रकार सांगितलेले आहेत. त्यापैकीं गांधर्वविवाह आणि राक्षसविवाह हीं जीं दोन विशेषणें विवाह शब्दाच्या पूर्वी लाविलेलीं आहेत, तीं विशेषणें गंधर्व आणि रक्षस् किंवा राक्षस यांवरून तद्धितप्रक्रियेनें साधलेलीं आहेत. हिंदुपुराणांची ज्यांना माहिती आहे, त्यांना गंधर्व आणि राक्षस ही मंडळी परिचयाची असलीच पाहिजे. गंधर्व शब्दानें आणि राक्षस शब्दानें मनांत येणाऱ्या कल्पना परस्परापासून अत्यंत भिन्न आहेत. गंधर्व म्हणजे देवांचे मित्र आणि राक्षस म्हणजे देवांचे शत्रू. गंधर्व हे सत्त्वगुणी आणि राक्षस हे तमोगुणी. गायन, नर्तन, वादन, इत्यादि सौम्य गुण गंधर्वांचे अंगांत; व आरडाओरड धांगडधिंगा वगैरे राक्षसांच्या अंगांत. गंधर्व अमृत प्राशन करतात; आणि राक्षस मांसाहाराचें सेवन करतात. गंधर्व यज्ञादिक धर्मकृत्यांना उत्तेजन येईल अशा रीतीनें वर्तन

करतात; व राक्षस यज्ञादिक धर्मकृत्यांचा उच्छेद होईल अशा रीतीनें वागतात. गंधर्व आणि राक्षस या दोन वर्गांचें पुराणांतील वर्णन सूक्ष्म रीतीनें पाहिलें, तर वर दिलेल्या गोष्टी ह्याच प्रमुखत्वेंकरून ह्या दोन वर्गांमध्यें दिसून येतील. ह्यांच्यांत जे गुण आहेत, त्याच गुणांचा बोध गांधर्वविवाह आणि राक्षसविवाह या पदसमुच्चयांतील गांधर्व आणि राक्षस या शब्दांपासून सर्वांना होतो. व हाच अर्थ द्योतित करण्यासाठीं गांधर्व आणि राक्षस हीं विशेषणें विवाह या पदाला लाविलेलीं असलीं पाहिजेत. हल्लीं ज्याला आपण गांधर्वविवाह म्हणून म्हणतों, तसला विवाह पूर्वी गंधर्वांत होत होता म्हणून त्याला आपण गांधर्वविवाह म्हणतो, असें नाहीं; किंवा हल्लीं ज्याला आपण राक्षसविवाह म्हणून म्हणतों, तसला विवाह पूर्वी राक्षसांत होत होता म्हणून त्याला आपण राक्षसविवाह म्हणतों, असेंहि नाहीं. धर्मशास्त्रांत या दोन विवाहांचीं जीं लक्षणें केलेलीं आहेत, तीं पाहिलीं असतांहि ह्या मुद्याचा तेव्हांच उलगडा पडणार आहे. ‘ गांधर्वः समयान्मिथ ।, ’ हें गांधर्वविवाहाचें लक्षण आहे, व ‘ राक्षसो युद्धहरणात् ।’ हें राक्षस विवाहाचें लक्षण आहे. एकमेकांची प्रीति एकमेकांवर बसून अशा रीतीनें जो विवाह जुळतो, तो गांधर्वविवाह होय; व स्त्री अनुरागवती नसून बलात्कारानें तिच्या पक्षाकडील लोकांशीं युद्ध करून त्या स्त्रीचें हरण करून तिच्याशीं लग्न लाविलें, तर तो राक्षसविवाह होय. या राक्षस विवाहाच्या वर्गामध्येंच मोडणारे किंवा त्याच्यासारखेच असे असुरविवाह आणि पैशाचविवाह हे होत. पैसे घेऊन मुलगी करणें हा असुरविवाह होय, व मुलीला झोंप वगैरे लागलेली असतांना उचलून नेणें आणि तिच्याशीं विवाह लावणें, हा पैशाचविवाह होय. पहिल्यांत असुरासारखी कृति असते, म्हणून त्याला असुरविवाह म्हटलें आहे, व दुसऱ्यांतील कृति पिशाच्यांना साजण्यासारखी असल्यामुळें त्याला पैशाचविवाह असे नांव दिलेलें आहे. ब्राह्म, दैव, आर्ष आणि प्राजापत्य हे चार वर सांगितलेल्या चारांहून आणखी निराळे विवाहाचे प्रकार आहेत. या आठ प्रकारांचे साम्यवैषम्याच्या दृष्टीनें आपण भेद पाहूं गेलों, तर या आठ प्रकाराच्या विवाहांचे आपल्याला तीन वर्ग करतां येतील. यांतील ब्राह्म, दैव, आर्ष आणि प्राजापत्य हे निव्वळ धर्मविषयक असून धर्मकृत्यांना अनुलक्षूनच

त्यांची योजना केलेली असावी, असें दिसतें. गांधर्वविवाह हा प्रीतिविषयक असून तो परस्परांच्या प्रीतीवर अवलंबून असतो. आणि तिसऱ्या वर्गांतील आसुर, राक्षस, आणि पैशाच हे विवाह म्हटले म्हणजे असे आहेत कीं, त्यांत प्रीतीचा अंश अगदींच नसतो, असें म्हटलें तरी चालेल. असे या आठ विवाहांचे तीन वर्ग होण्यासारखे आहेत. परंतु त्यांपैकीं शेवटचे दोन वर्गच आपण सध्यां येथें घेतलेले आहेत. किंवा त्या दोन वर्गांपैकीं गांधर्व-विवाह आणि राक्षसविवाह हेच दोन आपण मुख्यत्वेंकरून येथें घेतले आहेत, असें म्हणण्यालाहि कांहीं हरकत नाहीं.

पुष्कळ लोकांची अशी समजूत आहे कीं, गांधर्वविवाह आणि राक्षस-विवाह हे फक्त नवऱ्याच्या आणि नवरीच्या लग्नासंबंधानेंच संभवतात. पण तसें नाहीं. गांधर्वविवाह आणि राक्षसविवाह यांचा विषय नवरानवरीच्या लग्नापेक्षांहि फार मोठा आहे. हे गांधर्व आणि राक्षसविवाह अन्यत्र ठिकाणीं-हि संभवतात. वाचकहो, राजकीय व्यवहारामध्यें सुद्धां हे गांधर्वविवाह आणि राक्षसविवाह आहेत, हें कोणीहि विसरतां कामा नये. आपले घरो-घर जसे लहान लहान वैवाहिकसंबंध होतात, तसा राजा आणि प्रजा यांच्या मध्येंहि एक प्रकारचा मोठा थोरला वैवाहिक संबंध घडून आलेला आहे. आपले लहान लहान वैवाहिक संबंध काल जुळलेले आहेत, आणि कदाचित् उद्यां तुटून जातील. परंतु राजा आणि प्रजा यांच्यामधील वैवाहिकसंबंध अनादिकाळापासून सुरू झालेला आहे, आणि तो अनंतकाळापर्यंत टिका-वयाचा आहे. आपलीं खासगी लग्नें लावावयाला कोणी तरी भट असतो. परंतु राजा आणि प्रजा यांचा वैवाहिकसंबंध प्रत्यक्ष परमेश्वरानें जुळवून दिलेला आहे. व या संबंधांतील पतिस्थानापन्न जा राजा, तो प्रत्यक्ष विष्णूचा अवतार होय. म्हणून वरपक्षाकडील जातकुळी किती उत्तम प्रकारची आहे, हें सांगावयास नकोच. परंतु वधूपक्षाकडील जातकुळीहि कांहीं कमी योग्यतेची आहे, असें नाहीं. कारण, प्रजा हि तर प्रत्यक्ष पृथ्वीची कन्या होय. असल्या या उच्च कुळांतील वधूवरांचा विवाह उभयपक्षांनाहि सुखकर असाच झाला पाहिजे. आतां हीं वधूवरें मोठ्या योग्यतेचीं आहेत खरीं; परंतु त्यांचा समागम उभयपक्षांकडील मंडळींना सुखकर होण्या-करितां त्यांच्यांतील वैवाहिकसंबंध हा गांधर्वविवाहाच्या पद्धतीनेंच घडून

आला पाहिजे. तरच त्यांत संतति, संपत्ति, सुख, ऐश्वर्य, आरोग्य-वृद्धि, आयुष्य इत्यादि इहलोकींच्या स्पृहणीय गोष्टींचा सर्वांना लाभ मिळणार आहे. परंतु जर प्रजा आणि राजा या वधूवरांमधील वैवाहिक संबंध राक्षसविवाहाच्या पद्धतीनें घडून आलेला असेल, तर मात्र त्यांच्या दुःखाला पारावार नाहीं. यःकश्चित् कौटुंबिकविवाहामध्यें सुद्धां जर पतिपत्नींमध्यें प्रेमभाव नांदत नसेल, तर दररोज भांडणतंटे, संताप, वैताग, निर्वेद वगैरे किती अनर्थपरंपरा उम्दवतात, हें आपणांला ठाऊक आहे. मग राजा आणि प्रजा यांचें जोडपें तर त्या मानानें किती तरी मोठें ! आणि त्यांच्यामध्यें जर कां प्रेमभाव नसेल, तर त्या उभयतांचे दरम्यान किती अनर्थ उपस्थित होतील, याची कोण गणना करूं शकणार आहे ! सामान्य दांपत्यांच्या भांडणांचे परिणाम त्यांच्या घराच्या भिंतीच्या पलीकडे जाण्याचा फारसा संभव नसतो. परंतु या दांपत्यामध्यें विरोध उत्पन्न झाला म्हणजे त्याचे परिणाम फार दूरवर पसरतात. रक्तानें लाल झालेलें नद्यांचें पाणी समुद्राच्या पाण्याला लाल करून सोडतें, आणि आकाशाला जाऊन पोहोंचणारे प्रेतांचे ढीग हे ढगांच्यादेखील वरचें वातावरण आपल्या दुर्गंधीनें दूषित करून टाकितात. राजा आणि प्रजा या दांपत्याच्या वैवाहिकसंबंधामध्यें कधींहि वितुष्ट न यावें, हेंच फार चांगलें; कारण तें आलें, तर रक्तपात, लढाया, खून, लुटालूट, राज्यक्रांति, प्रजासंहार जुलूम, अन्याय, अनीति, क्रौर्य आणि निष्ठुरपणा यांची पृथ्वीच्या पाठीवर चोहोंकडे इतकी गर्दी उसळून जाते कीं, हें जग परमेश्वरानें मनुष्यांच्या सुखासाठीं निर्माण केलेलें नसून, सैतानानें पापी लोकांच्या शासनासाठीं हा नरकलोकच उत्पन्न केला आहे कीं काय, असा पाहणाराला क्षणभर भास झाल्यावांचून राहात नाहीं. तेव्हां ही सर्व अनर्थपरंपरा टाळण्यासाठीं जी गोष्ट अत्यंत आवश्यक आहे ती ही कीं, ह्या राजकीय दांपत्यामध्यें परस्पराबद्दल अंतःकरणापासून-वरवर दिखाऊ नव्हे-प्रेमभाव पाहिजे. हा सार्वत्रिक सुखाला अवश्य असा प्रेमभाव उत्पन्न होण्याला कोणती अवस्था अनुकूल आहे, आणि कोणती प्रतिकूल आहे, याचा विचार करून तो सर्वांनीं लक्षांत बाळगिणें फार जरूर आहे. राजा आणि प्रजा हें एक पतिपत्नीचें जोडपें आहे, अशी आपण पूर्वी कल्पना केलेली आहे. तीच कल्पना पुढें चालवून त्याच

रूपकाच्या भाषेमध्यें प्रेमभाव सांसिद्धिक कोठें असतो आणि नैमित्तिक कोठें असतो, याबद्दल सामान्यपणें बोलावयाचें झालें, तर आपल्याला असें म्हणण्याला हरकत नाहीं कीं, राजा आणि प्रजा यांच्या गांधर्वविवाहामध्यें सांसिद्धिक प्रेमभाव असतो आणि त्यांच्या राक्षसविवाहामध्यें नैमित्तिक प्रेमभाव असतो. परंतु हें चांगल्या रीतीनें स्पष्ट होण्यासाठीं राजा आणि प्रजा यांच्यामधील गांधर्वविवाह म्हणजे काय, आणि राक्षसविवाह म्हणजे काय, याची थोडीशी फोड करणें अवश्यक आहे. राजाची प्रजेवर आणि प्रजेची राजावर प्रीति बसून नंतर त्या प्रीतीच्या योगानें त्यांचा विवाहसंबंध जुळून आला, तर तो त्यांचा गांधर्वविवाह होय. दुष्यंत आणि शकुंतला ह्यांची प्रीति एकमेकांवर जडून, नंतर त्यांचा झालेला गांधर्वविवाह जसा त्यांना सुखावह झाला, तसा राजा आणि प्रजा यांच्यामध्यें झालेला गांधर्वविवाह हा उभयतांना सुखावह होतो. परंतु राक्षसविवाह म्हणजे याच्या बहुतेक उलट होय. गांधर्वविवाहांतील जसें मुख्य तत्त्व प्रीति हें होय; तसें राक्षसविवाहांतील मुख्य तत्त्व म्हटलें म्हणजे जबरदस्ती हें होय. एखादी स्त्री आपल्यावर प्रीति करीत आहे किंवा नाहीं, याचा विचार या राक्षसविवाहाच्या पद्धतींत कधींच करण्यांत येत नाहीं. आपल्या अंगांत सामर्थ्य आहे कीं नाहीं, आणि आपल्याला ती पाहिजे आहे कीं नाहीं, या प्रश्नांचें अस्तिपक्षी उत्तर आलें, म्हणजे तें या राक्षसविवाहाला पुरेसें होतें. याच्यापेक्षां जास्त खोल किंवा दूर विचाराची मजल कधींहि दवडण्यांत येत नाहीं. वराच्या अंगांत युद्ध करण्याचें सामर्थ्य असतें व वधू दुबळी असते. वर युद्ध करतो, त्या युद्धांत तिचें हरण करतो, आणि तिला आपल्या ताब्यांत आणून ठेवितो. असा हा राक्षसविवाहाचा प्रकार होय. यांत प्रीतीचा प्रादुर्भाव कोठून होणार? ती स्त्री युद्धानें जिंकून आणिली असल्यामुळें ती आपल्या नवऱ्याच्या घरामध्यें फार झालें तर राबत बसेल, पण ती त्यावर प्रीति कशी करणार ? कारण युद्धानें शरीर जिंकलें जाईल, पण मन कसें जिंकलें जावें ? तिचें मन जिंकावयाचें असेल, तर तें प्रेमानेंच जिंकितां येईल, युद्धानें कधींहि जिंकितां येणार नाहीं. राक्षसविवाह हा असल्या प्रकारचा असल्यामुळें तो कौटुंबिक आणि राजकीय या दोन्हींहि अवस्थेमध्यें सारखाच गर्हणीय आहे. जिची आपल्यावर प्रीति नाहीं, त्या स्त्रीला बळजबरीनें धरून आपल्या ताब्यांत ठेवणें, हें

जितकें वाईट आहे, तितकेंच जिची आपल्यावर प्रीति नाहीं, त्या प्रजेला युद्धानें जिंकून आपल्या ताब्यांत ठेवणें हें वाईट आहे. कारण, तशानें खऱ्या प्रीतीचें झाड वाढीस लागत नाहीं. ते थेंकून चालून मातीचे कुले, ओले-पणीं चिकटले, तरी वाळले म्हणजे ते गळून पडणारच. तो जुलुमाचा रामराम. तो करण्यासाठीं डोकें नम्र झालें, तरी अंतःकरण प्रेमानें थबथब-लेलें कोठें असतें ? किती केलें तरी तें भाड्याचें तट्टू. त्याला जितका चाबूक मारावा तितक्यापुरतेंच तें पाऊल पुढें टाकणार. जास्त धांव तें कशाला घेणार ? सारांश, या राक्षसविवाहाच्या पद्धतीमध्यें नैमित्तिक प्रेम मात्र असतें, त्याच्यापेक्षां जास्त, निष्कारण प्रेम त्यांत बिलकूल सांपडण्याचा संभव नाहीं. सांसिद्धिक प्रेम गांधर्वविवाहांतच मिळावयाचें. आणि जेवढें खावयाला घालावें, तेवढें दूध द्यावयाचें, हा जसा गाईचा धर्म आहे, त्याप्रमाणें राक्षस-विवाहामध्यें जेवढें बरें करावें, तेवढ्या निमित्तापुरतेंच प्रेम असावयाचें, अशी स्थिति असते. नैसर्गिक प्रेमाचा झरा जो अक्षयी वाहात असतो, जो दोष पाहाण्याला अंधळा असतो, जो निंदा ऐकण्याला बहिरा असतो, आणि जो कांहीं तरी हेतूसाठीं नव्हे, तर निव्वळ प्रेमासाठीं म्हणून प्रेम करीत असतो, तो प्रेमाचा झरा पर्जन्यकाळांतल्याप्रमाणें गांधर्वविवाहांतच आपल्या तीराचें उल्लंघन करून चोहोंकडें आपलें पाणी फेंकीत असतो. व तो उन्हाळ्यांतल्या-प्रमाणें राक्षसविवाहामध्यें कोरडा ठणठणीत पडून जातो. असे हे दोन प्रकारचे विवाह आहेत. धर्मशास्त्रकारांनीं हे विवाह सामान्य लोकांकरितां करून ठेविले आहेत. परंतु राजांनींहि त्याचा फायदा करून घेतल्यास त्यांत त्यांचें अकल्याण होणार नाहीं. सर्व राजांच्या पुढें हे दोन प्रकारचे विवाह पूर्वीच्या लोकांनीं ठेविलेले आहेत. यांतील कोणत्या वैवाहिकपद्धतीचा स्वीकार करावयाचा, ही ज्याच्या त्याच्या खुषीची गोष्ट आहे. परंतु एवढें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, स्वीकार करीपर्यंतच काय ती खुषीची मर्यादा. त्याच्या पुढें खुषी संपली. पुढील मार्ग कोणाचेंहि ऐकत नाहींत. तें आपलें आक्रमण करणाराला आपल्या शेवटापर्यंत नेल्यावांचून कधींहि सोडीत नाहींत. गांधर्वविवाहाच्या मार्गाच्या शेवटाला कल्पवृक्षाचें झाड आहे, आणि राक्षसविवाहाच्या मार्गाच्या शेवटाला कांडळाचें झाड आहे. जो ज्या वाटेनें जाईल, त्याला त्याप्रमाणें फळें मिळतील.

गांधर्वविवाह आणि राक्षसविवाह हे हिंदुधर्मशास्त्रांतील विवाहाच्या अनेक प्रकारांपैकीं दोन होत. यांतील राक्षसविवाह अनुचित होय, हें तर उघडच दिसत आहे. परंतु कित्येक गोष्टींवरून इतर जातीच्या कांहीं लोकांमध्यें राक्षसविवाहाच्या पलीकडचीहि एक वैवाहिक पद्धत चालू आहे, असें दिसतें. आरबी भाषेंतील सुरस गोष्टींत किंवा मुसलमान जादुगारांच्या इतर कांहीं गोष्टींत या वैवाहिकपद्धतीचा उल्लेख आलेला आढळतो. अशा गोष्टी आपण पुष्कळ ऐकितों कीं, कोणी एक जादूगार होता. त्याचें कोणा एका राजकन्येवर मन गेलें. परंतु ती त्याला वश होईना, तेव्हां त्यानें आपल्या कपटसामर्थ्यानें तिचें हरण केलें. तो तिला साऱ्या दिवसभर आपल्या मंत्रसामर्थ्यानें कुत्री, मांजरी, बकरी, किंवा अशीच कांहीं तरी एखादी पशुजातीय स्त्री करून ठेवी. व तिच्यापासून रात्रीं सुखोपभोग घेण्याची जेव्हां त्याला इच्छा होई, तेव्हां तो तिला फिरून आपल्या मंत्रसामर्थ्यानें स्त्रीचें रूप देऊन तिच्यापासून सुखोपभोग घेई. असल्या पुष्कळ गोष्टी पुष्कळांच्या बाल्यावस्थेच्या अत्यंत परिचयाच्या असल्या पाहिजेत. पण यामध्यें जो वैवाहिक संबंध ध्वनित केला जात आहे, तो किती भयंकर आहे, याची कल्पना आपण त्या दृष्टीनें विचार केल्यावांचून आपल्याला कधींहि यावयाची नाहीं. आमच्या हिंदुधर्मशास्त्रांतील राक्षसविवाहाच्याहि वर ह्या मुसलमान जादुगारांच्या वैवाहिक पद्धतीनें कडी केली आहे, असें म्हणावें लागतें. स्त्रीला राक्षसविवाहाच्या पद्धतीनें आपल्या ताब्यांत आणून सुखोपभोगाच्या वेळीं मात्र तिला स्त्री करावयाचें आणि एरवीं तिला कुत्री, मांजरी, बकरी, इत्यादि पशूंप्रमाणें वागवावयाचें, ही वैवाहिक पद्धत मनुष्याला शोभावयाची नाहीं, हें म्हणण्यांत कांहीं अर्थच नाहीं; परंतु ती पशूंनाहि शोभावयाची नाहीं. वरील गांधर्व आणि राक्षस या दोन वैवाहिक पद्धतींचें जसें राजकीय व्यवहारामध्यें प्रतिबिंब दिसतें, तसें या तिसऱ्या आतां सांगितलेल्या पद्धतीचें प्रतिबिंब फार ठिकाणीं उमटलेलें दृष्टीस पडत नाहीं, ही एक मोठ्या आनंदाचीच गोष्ट समजली पाहिजे. नाहींतर आपल्या कामापुरतें मनुष्य आणि इतर प्रसंगीं पशू अशा दृष्टीनें राजे प्रजेला वागवूं लागले असते, तर प्रजेची किती तरी बेरें अनाथ स्थिति झाली असती ? तशी स्थिति न व्हावी म्हणून सर्व लोकांचें परमेश्वरापाशीं हेंच मागणें आहे कीं, राक्षसविवाहा-

दिकांचें नांवहि न राहतां राजा आणि प्रजा या दांपत्याचा गांधर्व पद्धतीनें विवाह होऊन तीं उभयतां या पृथ्वीवर चिरकाल सुखानें नांदत असावींत.

---

## बॉक्सर पुढाऱ्यांचें देहान्तशासन : : १६

नाहीं होय करतां करतां अखेरीस चीनमधील बारा प्रमुख लोकांना ठार मारण्याबद्दल सर्व ख्रिस्ती राष्ट्रांनीं आपल्या मनाचा निश्चय केला, व त्याप्रमाणें त्यांनीं त्यांपैकीं दोघांना तर येशूख्रिस्ताच्या भेटीला पाठविलें. त्याबद्दलची हकीकत इंग्रजी पत्रांतून हल्लीं प्रसिद्ध झाली आहे. गेल्या जुलई महिन्यांत ज्या ठिकाणीं परकीय प्रधानांचा खून झाला होता, त्याच ठिकाणीं ह्या लोकांना देहांतशासन देण्यांत आलें. दुपारीं तीन वाजावयाचे सुमारास युरोपियन राष्ट्रांचे कामगार व प्रमुख चायनीज अधिकारी त्या ठिकाणीं जमले. त्या ठिकाणाभोंवतीं लष्करी लोकांनीं गराडा दिलेला होता. व त्या लष्करी लोकांच्या सभोंवतीं इतर तमाशा पाहण्याकरितां जमलेल्या लोकांचा मोठा समुदाय होता. व गर्दींतून आपल्याला कदाचित् चांगलें दिसणार नाहीं, म्हणून पुष्कळ लोक घरावर चढून बसले होते. ज्यांना शासन द्यावयाचें होतें, ते चिनी सरदार जपानी शिपायांच्या एका तुकडीच्या पाहऱ्यामध्यें होते, व त्या जपानी शिपायांनींच त्यांना मारावयाच्या ठिकाणीं आणलें. प्रेसिडेंट ऑफ दि मिनिस्ट्री ऑफ जस्टिस ( न्यायखात्याचे मुख्य ) हे अधिकारी सरकारच्या वतीनें तेथें हजर होते. त्यांनीं त्यांच्या मरणाची शिक्षा त्यांना वाचून दाखविली. पहिल्यानें सरदार चिसू ह्यांचें डोकें उडविण्यांत आलें. ह्यांच्या शरीराचा बांधा उंच असून अंगावरील पोषाख सरदारी थाटाचाच होता. त्यांचें वय बरेंच असून त्यांच्या दाढीचे केस पिकलेले होते. पण ख्रिश्चन

न्यायदेवतेपुढें कशाचाच उपयोग झाला नाहीं. आणि एका क्षणामध्यें त्याचें डोकें धुळीमध्यें येऊन पडलें. नंतर दुसरा बॉक्सर लोकांचा पुढारी सूचेंग याला पुढें आणलें. ह्याच्याबद्दल इंग्लिश पत्रें असें वर्णन देतात कीं, तो आधींच भीतीनें अर्धमेला झालेला होता. व त्याचे डोळे मिटलेले होते. इंग्लिश पत्रांचे असेहि तर्क आहेत कीं, त्याच्या मरणाच्या पूर्वी त्याला कोणी तरी चोरून अफू आणून दिलेली असली पाहिजे. त्यांचा देहांत झाल्यानंतर लष्करी लोक निघून गेले व तमासगीर चायनीज लोक पुढें सरसावले. त्या गर्दीतून मयत माणसांच्या आप्तांना त्यांचीं प्रेतें उचलून नेण्याला मात्र बराच त्रास पडला. ही हकीकत वाचली म्हणजे ह्यांत ख्रिस्ती लोकांच्या क्रूरपणाचा अधिक तिरस्कार करावा, किंवा चिनी लोकांच्या नेभळटपणाबद्दल जास्त कींव यावी, हें ठरविणें फार कठीण आहे. सर्व चीन देश—चीनचा राजा, चीनची राणी, आणि चीनचे लोक—हे सर्व जण युरोपियन राष्ट्रांच्या विरुद्ध लढाई करण्यासाठीं हातांत शस्त्र घेऊन उठले होते असें जर आहे, तर न्यायखात्याचा चिनी मुख्य अधिकारी चीन सरकारच्या तर्फेनें सदर बॉक्सर पुढाऱ्यांना देहांत शासनाच्या शिक्षेचा हुकूम वाचून दाखविण्यासाठीं येतो, ह्याचा अर्थ काय? सर्वांनीं मिळून केलें आणि अखेरीस आपण न्यायाचा हुकूम फरमाविण्यासाठीं पुढें येऊन दुसऱ्यांना मात्र तोंडघशीं दिलें, असें हें होत नाहीं काय? पण हेंहि असो. चिनी सरकारला एकंदर स्थिति लक्षांत आणून तसेंहि करणें कदाचित् भाग पडलें असेल. परंतु बॉक्सर पुढाऱ्यांचीं डोकीं उडविण्याच्या वेळीं तमाशा पाहणाऱ्या चिनी लोकांची इतकी गर्दी कशाला? तो तमाशा होता काय? आपल्या पुढाऱ्यांना मारलेलें पाहणें, हा जर तमाशा म्हणून चिनी लोकांना वाटत असेल, तर चिनी लोकांनो! तुमच्या अभ्युदयाचे दिवस आमच्यासारखेच अजून फार लांब आहेत. ज्या गोष्टी नुसत्या ऐकल्यापासून देखील तुमचीं मनें होरपळून जावयाला पाहिजे होतीं, त्या गोष्टी प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहण्यासाठीं तुम्ही घरावर चढतां, ह्याच्यापेक्षां राष्ट्राच्या पतित अवस्थेबद्दल आणखी दुसरें प्रमाण काय पाहिजे? युरोपियन राष्ट्रें जें करीत आहेत, तें ठीकच आहे. पण चिनी लोकांनो, तुम्ही करीत आहां तें तितकेंच ठीक आहे काय? तुम्ही कोणाचीं डोकीं उडविलेलीं पाहावयाला जातां? जे तुमच्या उत्कर्षासाठीं आपल्या जिवावर

उदार झाले होते परंतु फसले, त्यांचीं डोकीं उडविलेलीं पाहण्याकरितां तुम्ही जातां काय ? तुमचीं मनें जर इतकीं हलकीं असतील, तर तुम्हाला परकीय लोकांच्या त्रासांतून सोडविण्यासाठीं ज्या बॉक्सर लोकांनीं बंड केलें, ते खरोखर चुकले, असेंच म्हटलें पाहिजे. आपल्या पुढाऱ्यांचा प्राणांत हा ज्यांचा तमाशा, ते लोक गुलामगिरीला आणि परकीयाकडून चिरडले जाण्यालाच योग्य. त्यांना ते बॉक्सर लोकाचे उदात्त हेतु काय कामाचे ! ह्या डोकीं उडविण्याच्या कामाची खुद्द त्यापैकीं एका मनुष्याला लाज वाटली आहे, परंतु त्याबद्दल चिनी लोकांना कांहींच वाटू नये, हें मोठें आश्चर्य आहे. पेकीन येथें परकीय राष्ट्रांच्या प्रधानांची ही गोष्ट झाल्यानतर एक सभा भरली होती. त्या वेळीं एम्. डी. जीअर्स ह्यांनीं असें बोलून दाखविलें कीं, माझा उजवा दांत मी तोडूं देईन. परंतु ह्यापुढें अशा रीतीनें चायनीज अधिकाऱ्यांचीं डोकीं उडवूं देण्याला मी आपली संमति कधींहि देणार नाहीं. तरी पण इतर प्रधानांचा आग्रह असल्यामुळें ह्या रुष्ट झालेल्या खिस्ती देवतेच्या पुढें आणखी किती बळी कापावे लागतील, ह्याचा अदमास नाहीं. सध्यां चिनी लोकांची मात्र मोठी चैन आहे. पैसा पडल्यावांचून तमाशा पाहण्याला मिळत आहे. निकृष्टतम अवस्थेकरितां निपजलेल्या चिनी लोकांनो, ह्यापुढें होणाऱ्यापैकीं एकहि तमाशा पाहण्याची संधि फुकट दवडूं नका बरें.

---

## काबूलच्या अमिरासंबंधीं कांहीं गोष्टी १७

काबूलचा अमीर, अब्दुल रहिमान, यानें आपल्या स्वतःच्या आयुष्यक्रमातील मुख्य हकीकत, स्वतःची राहण्याची रीत, राज्यकारभाराची पद्धत वगैरे अनेक महत्त्वाच्या गोष्टी एकत्र करून आपलें एक चरित्र लिहिलें आहे. तें 'मंथ्ली रिव्ह्यू' या नांवाच्या मासिक पुस्तकात हल्लीं प्रसिद्ध होत आहे. तें चरित्र सामान्य लोकांनीं वाचण्यासारखें तर आहेच. पण आमच्या इकडच्या आळशी नेटिव संस्थानिकाना तर तें विशेषच फायद्याचें आहे.

अमीरसाहेब लिहितात:—एशिया खंडांतील राजे आणि सरदार बहुधा ज्या रीतीनें आपलें आयुष्य घालवितात, त्याच्या अगदीं उलट माझा राहण्याचा क्रम आहे. त्यांचें आयुष्य म्हटलें म्हणजे बहुधा आळस आणि चैनबाजी यांत उधळून जात असतें. राजा पायानें चालला किंवा राजानें स्वतः हातानें एखादें काम केलें, तर त्यांत राजाचा मान राहात नाहीं, अशी सामान्यतः इकडील बऱ्या लोकांची समजूत झालेली आहे. पण माझी समजूत याच्या अगदीं उलट आहे. आपलीं मनें आणि शरिरें आळशी आणि निरुद्योगी ठेवणें, हें मी मोठें पाप आहे, असें समजतों; व ईश्वरानें आपल्याला ज्या देणग्या दिलेल्या आहेत, त्यांचें आपण कांहीं चीज करून दाखवीत नाहीं, असें यांत होतें, अशी माझी समजूत आहे. माझी राहण्याची आणि कपडे पेहेरण्याची पद्धत अगदीं साधी आणि शिपाईबाण्याची आहे. मी फारच थोडा वेळ निजण्यांत दवडतों, व बाकीचे सर्व तास मी कांहीं काम करण्यांत गुंतलेला असतों. व ही काम करण्याची संवय मला इतकी जडली आहे कीं, मी आजारी असलों व अंथरुणावरून हालवत

नसलें, तरी देखील नेहेमींप्रमाणें मी सरकारी कागदपत्र लिहीत आणि आणि वाचित असतों, व लोकांच्या तक्रारी ऐकून नेहमींप्रमाणें त्यांचा निकाल करीत असतों. जेव्हां हातपाय हालविण्याची मला शक्ति नसते, तेव्हां तोंडानें सर्व कामें मी चालवित असतों; व हात पाय हालत नसले, तरी जीभ हालविण्याचें सामर्थ्य माझ्यामध्यें असल्यामुळें, हुकूम देऊन मी आपल्या नोकराकडून आपलीं सर्व कामें करून घेत असतों. मेहनत घेऊन काम करण्याचा मला कधींच त्रास येत नाहीं. प्रत्येक मनुष्याला कांहीं तरी महत्त्वाकांक्षा असतेच. तशी मला महत्त्वाकांक्षा आहे, कीं आपण मेहनतीनें काम करावें, व आपल्या राज्याच्या कारभाराचें सर्व काम संपवून टाकावें. व या हेतूनेंच फक्त मी एवढी मेहनत करीत असतों. दुसऱ्या राष्ट्रांतील आणि धर्मांतील लोक आपल्या उन्नतीसाठीं धांवतांना जसजसे माझ्या दृष्टीस पडतात, तसतसा माझ्या निद्रेचा भंग होत जातो. आज या सुधारणेच्या आणि उन्नतीच्या शर्यतीमध्यें जे जे लोक अतिशय पुढें गेलेले आहेत, त्यांच्या बरोबरीनें माझें राष्ट्र केव्हां धांवूं लागेल, या चिंतेमध्यें माझे सर्व दिवस जातात, व रात्रीं मला स्वप्नें पडतात, तींहि या विषयासंबंधानेंच पडतात. अशी एक म्हण आहे कीं, मांजराला उंदराचेशिवाय स्वप्नांत दुसरें कांहींहि दिसत नाहीं. पण माझी तशी स्थिति नाहीं. माझ्या देशाच्या मागासलेल्या स्थितीशिवाय मला माझ्या स्वप्नांत दुसरें कांहींच दिसत नाहीं. माझा देश, अफगाणिस्थान, हा हल्लीं एखाद्या बकऱ्यासारखा अगदीं दीन झालेला आहे व त्या बकऱ्याला खाण्यासाठीं एका बाजूनें सिंह आणि दुसऱ्या बाजूनें भयंकर अस्वल टपून बसलेले आहेत. त्यांच्यापासून ह्या बकऱ्याचें रक्षण कसें करावें ह्याबद्दल मी विचार करीत असतों. अफगाणिस्थानची सरहद्द कायम करून घेण्याच्या पूर्वी बरींच वर्षें मला एकदां स्वप्नांत कोणीं येऊन असें सांगितलें कीं, मरणापूर्वी तूं आपल्या राज्याच्या भोंवतीं एक भिंत बांध. माझ्या राज्यांतील ज्योतिष्यांनीं ह्या स्वप्नाचा अर्थ असा सांगितला कीं, माझ्या सरहद्दीवरील दुसरे राजे प्रत्येक वर्षी हळूहळू पुढें सरत येत आहेत, तर ह्यांची हळूहळू पुढें सरण्याची जी युक्ति आहे, तिला मी कायमचा प्रतिबंध केला पाहिजे. व त्याप्रमाणें मी आपली सरहद्द कायम करून घेतलेली आहे. माझ्याबद्दलची दुसरी

गोष्ट अशी आहे कीं, कांहीं लोक माझ्या मरणाबद्दल प्रत्येक आठवड्याला एकेक खोटी बातमी उठवीत आहेत. तरी पण मी आपला जिवंत आहें तो आहेंच. अशा रीतीनें मी जिवंत असलेला पाहून त्यांना फारच वाईट वाटत असेल. पण त्याला माझा इलाज नाहीं. त्यांनीं आपल्या कल्पनेनें मला जितके वेळां मारलेले आहे, तितके वेळां कोणी मेला असेल असें मला वाटत नाहीं.

माझा नेहमींचा आयुष्यक्रम कसा असतो, हें जाणण्याची ज्यांना इच्छा असेल, त्यांच्याकरितां मला हें सांगितलें पाहिजे कीं, माझी जेवणाची आणि निजण्याची नियमित अशी कोणतीच वेळ नाहीं. कधीं कधीं माझें जेवण टेबलावर तासच्या तास पडून राहिलेलें असतें, व मी कामांत गुंतलेला असल्यामुळें मला त्याचें भानहि नसतें; आणि रात्रीं पत्रें लिहिण्याचें वगैरे काम करण्याला मी एकदां मान खालीं घालून बसलों, म्हणजे कित्येक वेळां असें झालेलें आहे कीं, मान वर उचलून पाहावें, तों रात्र जाऊन सकाळ झालेली असे. माझ्या राज्यांतील लोक नेहमीं कट करीत असतात, आपसांत भांडत असतात, बंडें उत्पन्न करीत असतात, आणि मजकडे येऊन एकमेकांच्या विरुद्ध खोट्या बातम्या सांगत असतात. त्यांची चौकशी करण्यांत माझा निम्मा वेळ फुकट जातो. म्हणजे याचा परिणाम असा होतो कीं, मी माझ्या लोकांच्या उन्नतीसाठीं पुढे धांव घेत असतों आणि माझे लोक मला मागें ओढीत असतात. त्यामुळें मला फार कंटाळा येतो, व कधीं कधीं असें वाटतें कीं हे लोक असेच राहावयाचे, व इतर लोकांच्या बरोबरीला येण्याला ह्यांचा, अंगीं पात्रताच नाहीं. तेव्हां अशा लोकांना स्वतःचे निर्मूळ होईपर्यंत आपसांत यादवी करण्याची मुभा देऊन आपण कोठें तरी एकांतांत जाऊन बसावें, असें मला वाटतें. पण असें करणें म्हणजे भित्रेपणाचें लक्षण आहे. व ईश्वरानें मला ज्या कामासाठीं निर्माण केलें आहे, त्याची मी टाळाटाळ करतों, असें होईल. म्हणून मी तसें करीत नाहीं.

माझा काम करण्याचा क्रम कांहीं ठराविक नाहीं. मी सकाळपासून संध्याकाळपर्यंत आणि फिरून संध्याकाळपासून सकाळपर्यंत कधीं कधीं एकसारखा काम करीत असतों. व कामाच्या नादांत मी जेवलों

आहे किंवा नाहीं, याचेंहि मला स्मरण नसतें. व तें मला माझ्या सरदारांना विचारावें लागतें. त्याचप्रमाणें मला झोंप येऊं लागली, म्हणजे जेथें काम करण्याकरितां मी बसलेला असतों, त्याच खुर्चीवर मी झोंप घेतों. मला निजण्यासाठीं किंवा दरबारासाठीं निरनिराळ्या जागा मुळींच लागत नाहींत. माझ्या राजवाड्यांत या प्रत्येक कामासाठीं निरनिराळे दिवाणखाने नाहींत, असें नाहीं. पण एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाण्याला जो वेळ लागणार, तेवढादेखील फुकट दवडण्याला मला सवड नसते. माझा सामान्यतः क्रम म्हटला म्हणजे, पहांटे पांच सहा वाजतां निजावयाचें, आणि दुपारीं दोन वाजतां उठावयाचें. ह्या वेळांत सुद्धां माझ्या डोक्यांत इतकें कांहीं भ्रमण चाललेलें असतें कीं, प्रत्येक तासाला मधून मधून मी जागा होतों, आणि आपल्या देशाची सुधारणा कशी होईल याची विवंचना करीत पडतों. निजून उठल्यावर हकीम माझी प्रकृति पाहातात. नंतर दर्जी मला नित्य नवीन पोषाख आणून देतो. नंतर एकजण चहा आणि उपहाराचें सामान आणून देतों. उपहारानंतर मी कामाला गुंतलेला असतों, तो फिरून पहाटेच्या सहा वाजतां उठतों.

मी आपला शिपाईपेशा कधींहि सोडीत नाहीं. प्रसंग पडला तर एक क्षणभरहि विलंब न लागतां मला कूच करतां येईल, इतकी जारीची तयारी माझी नेहमीं असते. माझ्या कोटाच्या आणि पायजम्याच्या खिशांतून बार भरलेले रिव्हाल्व्हर आणि एक दिवसाला पुरतील इतके खाण्याचे जिन्नस ठेविलेले असतात. हे जिन्नस शिळे होतात म्हणून दररोज बदलले जातात. व मी जेथें बसतों किंवा निजतों, तेथें माझा हात पुरेल इतक्या जवळ बंदुका व तरवारी ठेविलेल्या असतात; व माझ्या ऑफिसच्या समोर जीन घालून घोडे नेहमीं तयार ठेविलेले असतात. घोड्यांच्या खोगिरांतून कित्येक सोन्याचे तुकडे आणि पिस्तुलें प्रवासांत उपयोगी पडावींत म्हणून शिवून टाकलेलीं असतात. अफगाणिस्थानसारख्या लढाऊ राजानें इतकी तयारी नेहमीं ठेविलीच पाहिजे. इतर देशापेक्षां माझा देश हल्लीं जरी अधिक सुरक्षित आहे, तरी प्रत्येकानें सावधगिरीनें आणि तयारीनें राहावें, हें फार चांगलें.

माझ्या बसावयाच्या आणि निजावयाच्या खोलींत निरनिराळ्या प्रकारचीं सुंदर फुलें, झाडें, चित्रें आणि वाद्यें ठेविलेलीं आहेत. चिनांतील उत्तम भांडीं, इराण आणि हिरात येथील सतरंज्या, बुलबुलपक्षी आणि इतर गाणारे

पक्षी वगैरे जिनसांनीं माझे दिवाणखाने सुशोभित केलेले आहेत. एखादे युरोपियन पाहुणे जेवणाच्या वेळीं आले, तर मी त्यांचा आदरसत्कार करतों. ते मुसलमान असले तर आमच्याच टेबलावर बसून जेवतात. नाहींतर त्यांना निराळ्या टेबलावर किंवा खोलींत जेवावें लागतें. युरोपियन रीतीनें तयार केलेल्या पदार्थांपेक्षां नेटिव रीतीनें तयार केलेले पदार्थच जास्त रुचकर आणि चांगले लागतात, असें पुष्कळ युरोपियनांना म्हणतांना मीं ऐकिलें आहे. असें म्हणतांना त्यांच्या मनांत खरोखर काय असेल, तें सांगतां येत नाहीं. पण मला खूप करण्यासाठींच ते केवळ असें म्हणत नसतील, व खरोखरच आमचे पदार्थ अधिक चांगले असतील, तर त्यांत मला अभिमानच आहे. पण युरोपियन पदार्थांपेक्षां अफगाणी पदार्थच हे युरोपियन लोक जास्त खातात असें बहुधां पाहातों. त्यावरून त्यांचे वरील उद्गार मनापासूनच असावेत असें दिसतें. कारण, जे पदार्थ एकाला आवडत नाहींत, ते तो निव्वळ दुसऱ्याची खुशामत करण्यासाठीं सपाटून खाईल, असें होणें शक्य नाहीं.

माझ्या बायका, मुली, मुलगे, सुना, नातू, नोकर वगैरे मंडळींना जेवणखाण, कपडालत्ता, घोडे, घरें वगैरे दौलतींतून मिळून शिवाय त्यांना नक्त पैसाहि मिळत असतो. हबीबुल्ला, आणि नसरुल्ला ह्या माझ्या दोन मुलांना दरमहा वीस हजार रुपये खासगी खर्चाकरितां मिळतात. व माझ्या बायकांपैकीं प्रत्येकीला तिच्या योग्यतेप्रमाणें दरमहा तीन हजारांपासून आठ हजारपर्यंत काबूली रुपये खाजगी खर्चाकरितां मिळतात. ईदीच्या आणि मोहरमच्या दिवशीं सर्वांना नवीन वस्त्रें व नजराणे देण्यांत येतात. माझे मुलगेहि माझ्याप्रमाणेंच साऱ्या दिवसभर काम करीत असतात. परंतु संध्याकाळ झाली, म्हणजे ते आपल्या अंतःपुरांत जातात. मीहि आपल्या कारकीर्दीच्या प्रारंभीं आठवड्यांतून दोनदां आपल्या अंतपुरांत जात असें. परंतु पुढें काम वाढल्यामुळें महिन्यांतून एक दोन वेळां मात्र मी तिकडे जात असें. पण हल्लीं तर साऱ्या वर्षांत दोन तीन वेळांच काय तो मी तिकडे जातों. बाकीचा सर्व वेळ मी ज्या दिवाणखान्यांत काम करावयास बसतों तेथेंच काढतों. ह्याचें मुख्य कारण असें आहे कीं, मी ह्या राष्ट्राचा उत्कर्ष करावा म्हणून ईश्वरानें मला जन्मास घातलें आहे. तेव्हां त्यानें माझ्यावर जें काम

सोंपविलें आहे, तें न करतां चैनबाजींत आणि ऐषआरामांत वेळ दवडणें बरोबर नाहीं. परमेश्वरानें लावून दिलेलें काम करीत असण्यांतच मला नेहमीं अत्यंत सुख वाटतें.

माझ्याकडे दाद लावण्याला माझ्या प्रजेपैकीं कोणत्याहि इसमाला बिलकूल अडचण पडत नाहीं. त्यानें दारापाशीं यावें आणि आंत सांगून पाठवावें म्हणजे त्याला मी बोलावणें पाठवितों. किंवा त्यानें पोस्टांतून लेखी अर्ज पाठवावे व त्या अर्जाचें कव्हरावर ‘ अमिराशिवाय दुसऱ्या कोणींहि फोडूं नये ’ असें लिहावें म्हणजे झालें. असलीं पत्रें मी स्वतः फोडतों, आणि तितकीच आवश्यकता असेल, तर त्यांचीं उत्तरेंहि मी आपल्या हातानें लिहितों. व कोणाची दाद लागली किंवा नाहीं ह्या व इतर गोष्टी जाणण्याकरितां माझे कित्येक गुप्त हेरहि असतात. मीं आपल्या हातानें इतकीं उत्तरें लिहिलीं आहेत, आणि माझे इतके गुप्त हेर आहेत कीं, अफगाणिस्थानांतील ज्या इसमापाशीं माझी सही नाहीं, असा एकहि इसम नसेल, आणि ज्या घरांत माझा गुप्त हेर नाहीं, असें एकहि घर नसेल, अशी लोकांची सामान्यतः समजूत आहे. यांत अतिशयोक्ति असेल, पण कांहीं तथ्यहि आहेच.

हें अमिराचें आत्मचरित्र आमच्या इकडील इंग्लंडांत जाणारे राजे, कारभाऱ्यांवर राज्यभार टाकून आपण झोंपा घेणारे राजे, आणि स्वसंरक्षणासाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहणारे राजे मननपूर्वक वाचतील, तर त्यांत त्यांना बऱ्याच गोष्टी शिकण्यासारख्या सांपडतील, यांत शंका नाहीं.

---

## मि. मलबारी विरुद्ध मि. जाइल्स : : १८

मि. जाइल्स यांनीं देशी भाषेंतील पुस्तकांच्याबद्दलचा रिपोर्ट करतांना निरनिराळ्या पुस्तकांवर कसकसे अभिप्राय दिलेले आहेत, याबद्दलची चर्चा नेटिव पत्रांतून पूर्वींच येऊन गेलेली आहे. जाइल्ससाहेबांना सर्व ग्रंथांतूनच राजद्रोह भरलेला दिसला. परंतु त्यांतल्या त्यांत मि. मलबारी यांना अग्र-पूजेचा मान मिळालेला आहे. एकदां विस्तव पेटला, म्हणजे मग त्यांत ओलेंहि जळतें आणि वाळलेलेंहि जळतें. अशा स्थितींत जाइल्ससाहेबांच्या टीकेकडे मि. मलबारी यांनींच विशेष लक्ष पुरविण्याचें कारण नव्हतें. पण तें व्हावें कसें ? कारण, आपल्या मनानें आपण राजनिष्ठ असलों म्हणजे बस आहे, मग बाकीचे आपणाला कांहींहि म्हणोत, अशा विचाराचे मि. मलबारी हे नाहींत. साहेबांनीं आपल्याला राजनिष्ठ म्हटलें नाहीं, तर आपलें जिणें व्यर्थ आहे व मनांतून आपण कसेंहि असलों, तरी साहेबांनीं आपल्याला राजनिष्ठ म्हटलें पाहिजे, अशा महत्त्वाकांक्षेचे माणूस मि. मलबारी हे असल्या-मुळें, जाइल्ससाहेबांनीं त्यांच्या कवितांना राजद्रोहात्मक ठरविल्यापासून त्यांच्या मनाला चैन पडेनासें झालें, यांत कांहीं मोठेंसें नवल नाहीं. जाइल्ससाहेबांची टीका येऊन गेल्यावर मि. मलबारी यांनीं स्पेक्टेटर पत्रामध्यें आपल्या कवितांच्या समर्थनार्थ जाइल्ससाहेबांच्या विरुद्ध कांहीं लेख प्रसिद्ध केले. व विद्याखात्याकडील सरकारचे सेक्रेटरी यांजकडे ता. १२ सप्टेंबर रोजीं मि. मलबारी यांनीं एक पत्र लिहिलें. त्या पत्रांतील सारांश असा आहे कीं, जाइल्ससाहेबांनीं ‘ ससारिका ’ या कवितेंतील कांहीं वाक्यांचा अर्थविपर्यास केलेला आहे. अशा कवितांतील मधलेच कांहीं चरण काढून त्यांचें भाषांतर केलें, तर तें भ्रामक झाल्यावांचून कधींहि राहाणार नाहीं. टीकाविषयक कवितांतून धार्मिक, औद्योगिक आणि व्यापाराच्या दृष्टीनें मात्र आपला

उत्कर्ष व्हावा, या हेतूनें उपदेश केलेला आहे. सदरहू कविता आज दोन वर्षें गुजराथेंत वाचल्या जात आहेत. परंतु जाइल्ससाहेबांखेरीज दुसऱ्या कोणालाहि अजून त्यांत दोष दिसले नाहींत. म्हणून जाइल्ससाहेबांनीं आपल्याविरुद्ध जे आरोप आणिले आहेत, त्यांना काय आधार आहे, वगैरेबद्दल सरकारनें त्यांजकडून खुलासा करवावा, अशी मि. मलबारी यांनीं शेवटीं विनंति करून वरील आशयाचें पत्र सरकारला पाठविलें.

मि. जाइल्स आणि मि. मलबारी ह्यांच्या या वादांत एक दोन वाक्यें फार मजेदार येऊन गेलेलीं आहेत. मि. जाइल्स, मि. मलबारी यांच्या कांहीं काव्या-संबंधानें टीकात्मक लेख लिहीत असतां एके ठिकाणीं असें म्हणतात कीं, Two or three poems are distinctly patriotic (दोन तीन कविता अगदीं स्पष्ट स्वदेशाभिमानानें भरलेल्या आहेत.) Patriotic (स्वदेशाभिमानाच्या) कविता लिहिणें ह्यांत वास्तविक पाहातां कांहीं गुन्हा नाहीं. जाइल्ससाहेबांना जळीं, काष्ठीं, पाषाणीं, सर्व ठिकाणीं राजद्रोह भरलेला दिसत असल्यामुळें ते पाहिजे तर स्वदेशाभिमान हा दोष म्हणून समजोत. परंतु इतर कोणीहि तसें समजणार नाहीं. इंग्रज आमचे राजे झाले आहेत, म्हणून आम्ही त्यांच्याशीं राजनिष्ठपणें वागलें पाहिजे, हें सर्वांना कबूल आहे. पण इंग्लिश लोक आमचे राजे झाले आहेत, म्हणून आम्हीं आपल्या देशाचा अभिमान बाळगितां नये, हें शास्त्र कोठलें? व हें कोण ऐकणार? तुम्ही आमचे राजे असलां तर आम्ही तुमच्याशीं राजनिष्ठपणानें वागूं, तुमचे कायदे पाळूं, आणि तुम्हांला कर देऊं; पण याच्या पलीकडे, आम्ही तुमची जिंकलेली प्रजा झालों तरी आम्हांला कांहीं स्वातंत्र्य म्हणून असलेंच पाहिजे. व तें स्वातंत्र्य तुम्ही देतहि आहां. आम्हांला आपल्या आईबापांवर प्रेम करण्याचें स्वातंत्र्य आहे. आम्हांला आपल्या चालीरीतींप्रमाणें वागण्याचें स्वातंत्र्य आहे. व आपापल्या धर्माचीं मतें पाळण्याचें आम्हांला स्वातंत्र्य आहे. त्याचप्रमाणें आपल्या देशाबद्दलचा अभिमान बाळगण्याचें स्वातंत्र्य आम्हांला असण्याला कांहीं एक प्रत्यवाय नाहीं. आम्हीं आपल्या आईबापांवर प्रीति केली, आपल्या धर्ममतांना चिकटून राहिलों, तर त्यांत ज्याप्रमाणें आमच्या राजनिष्ठेला कोणत्याहि प्रकारानें बाध येत नाहीं, त्याप्रमाणेंच आम्हीं आपल्या देशाबद्दलचा अभिमान बाळगला, तर त्यांत

राजनिष्ठेला बाध येऊं शकणार नाहीं. आम्ही देशाभिमानी असलों म्हणून त्यांत इंग्रजांचें काय खर्च होत आहे ? पादाक्रांत झालेल्या लोकांचा देशाभिमान म्हणजे त्यांच्या करमणुकीचें एक साधन आहे, याच्यापलीकडे त्यांत कांहीं नाहीं. दांत पाडून टाकलेल्या सर्पानें मोठी फडी काढली तरी त्यांत भिण्यासारखें कांहीं नसतें. त्याप्रमाणेंच पराभव पावलेल्या लोकांच्या स्वदेशाभिमानामध्यें कांहीं नसतें. इंग्रजांच्या राज्यांतले लोक आपल्या धर्माचा अभिमान बाळगीत नाहींत काय ? पण त्यापासून इंग्रजांचें काय वाईट आहे ? तर मग त्याप्रमाणेंच त्यांनीं आपल्या देशाचाहि अभिमान बाळगिला, म्हणून त्यापासून इंग्रजांचें काय वाईट व्हावयाचें आहे ? पराजित झालेल्या लोकांना आधींच करमणुकीचीं साधनें फार थोडीं असतात. व त्यांतून हें देशाभिमानरूपी करमणुकीचें साधन जर त्यांच्यापासून कोणीं हिरावून घेतलें, तर मग त्यांची पराजितपणाची स्थिति सुखकर भासण्याला कांहींच साधन राहाणार नाहीं, हें लक्षांत बाळगणें जरूर आहे. हिंदुस्थानांतील लोकांच्या स्वदेशाभिमानावर इतका कटाक्ष कशाला पाहिजे ? ते स्वदेशाभिमानी असले म्हणून त्यांच्या हातून काय होणार आहे ? ज्यांच्यांतील बहुतेक लोक अशिक्षित आहेत, आपसांमध्यें कलह पेटाविण्यांत गर्क होऊन गेलेले आहेत, शस्त्रहीन झाले आहेत, वस्त्रहीन झाले आहेत, आणि भुकेनें व्याकुळ होऊन प्राण सोडीत आहेत, ते लोक देशाभिमानी असले म्हणून त्यांत भिण्यासारखें तें काय आहे ? असल्या लोकांचा देशाभिमान इंग्रजांचें काय वांकडें करणार आहे ? फार झालें तर स्वतः विलायती माल टाकून हे लोक महाग देशी माल विकत घेतील, किंवा दुकानदारांच्या सांगण्यावर भरंवसा ठेवून विलायती मालच देशी म्हणून विकत घेतील. पण असल्या स्वदेशाभिमानानें इंग्रजांचें काय होणार आहे ? ह्या सर्व गोष्टींचा विचार करून इंग्रजांनीं आमच्यापासून सयुक्तिक तेवढ्याच राजनिष्ठेची अपेक्षा करणें युक्त आहे. बाकी बारीक सारीक कामांत फार खोल जाऊन पाहण्यांत उभयपक्षींहि फायदा नाहीं. आम्ही आपल्या देशाचा—आमच्या हिंदुस्थानाचा—अभिमान धरूं नये, तर कोणाच्या देशाचा धरावा ? दुसऱ्याच्या देशाचा अभिमान आम्ही कसा बाळगावयाचा ? व तो मनापासून वास्तविकपणें कसा बाळगतां येईल ? इंग्लंड हा देश इंग्रजांचा. त्याच्याबद्दल इंग्रजांना अभिमान असणें रास्त आहे.

त्या परकीय देशाचा अभिमान हिंदु लोकांच्या मनांत कसा बरें उत्पन्न होईल ? हिंदुस्थानाचें सुखदुःख हल्लीं बऱ्याच अंशीं इंग्लंडवर अवलंबून आहे, म्हणून त्या दृष्टीनें पाहिलें, तर हिंदु लोकांना इंग्लंडचा थोडासा अभिमान वाटला पाहिजे, हें खरें; व तो त्याप्रमाणें वाटतहि आहे. परंतु हिंदुस्थानातील लोकांना मुख्यत्वेंकरून जर कोणत्या एखाद्या देशाचा अभिमान असेल, तर तो हिंदुस्थान देशाचाच असला पाहिजे. हा अभिमान अगदीं नैसर्गिक आहे व तो राजद्रोहाच्या धमकावणीनें कोणाला कधींहि बंद पाडतां यावयाचा नाहीं. इंग्लिश लोकांना जर इंग्लंडचा अभिमान आहे, फ्रेंचांना फ्रान्सचा अभिमान आहे, आणि जर्मन लोकांना जर्मनीचा अभिमान आहे, तर हिंदुस्थानांतील लोकानांच हिंदुस्थानचा अभिमान कां असूं नये ? तोंडपुजे लोक सरकारची मर्जी संपादन करण्यासाठीं सरकारपाशीं सांगतील कीं, आम्ही स्वदेशाभिमानाचा अत्यंत द्वेष करणारे आहों. पण हें अगदीं खोटें आहे. ही गोष्ट सृष्टिनियमांच्या विरुद्ध आहे. तिजवर सरकारनें कधींहि भरंवसा ठेवणें श्रेयस्कर नाहीं. सर्व लोक अंतःकरणांत स्वदेशाभिमानीच असले पाहिजेत आणि अशी जर स्थिति आहे, तर स्वदेशाभिमानी म्हणजे राजद्रोही, अशा समजुतीवर सरकार आपलें वर्तन ठेवूं लागल्यास, सरकारचा रस्ता फारच बिकट होईल, यांत संशय नाहीं. आम्हीं स्वदेशाभिमानी होऊं नये, आम्हीं आपल्या देशाबद्दल कळकळ बाळगूं नये, व आम्हीं आपल्या देशाला योग्य उपायांनीं उन्नतावस्थेला आणूं नये, अशी स्वदेशाभिमानी म्हणजे राजद्रोही असें ध्वनित करण्याची सरकारची इच्छा आहे काय ? इतकी नीच इच्छा आमच्या इंग्रजांसारख्या उदात्त राजांच्या मनांत वास करीत असेल, असें कोणाच्या स्वप्नींहि यावयाचें नाहीं. मग विनाकारण भलत्या अर्थी भलतेच शब्द वापरण्यांत काय बरें अर्थ आहे ? आमचा देशाभिमान म्हणजे तुमच्या राज्याचा द्रोह खास नव्हे. ती फक्त आमच्या देशावरील आमची प्रीति होय. तो आमचा देश तर तुम्हीं घेतलाच आहे. आतां आम्ही नुसता कोरडा देशाभिमान जवळ बाळगून राहिलों आहों. तो तरी निदान आमच्यापाशीं राहावा, व तो राहाण्याला कोणाकडून कांहीं व्यत्यय न यावा, अशी सर्वांची फार इच्छा आहे. व ती इंग्रजांच्या राज्यांत आजपर्यंत जशी पूर्ण होत आली तशीच ती यापुढेंहि पूर्ण होत जावी, यांत फार कल्याण आहे. राजनिष्ठा

आणि स्वदेशाभिमान यांच्यामध्यें अहिनकुलभाव आहे, असें नाहीं. आम्ही हिंदुस्थानचे अभिमानी आहों, म्हणून जर आम्ही राजद्रोही असलों, तर इंग्रज सरकार हे इंग्लंडचे अभिमानी असल्यामुळें ते प्रजाद्रोही आहेत, असें म्हणावें लागेल; व जी शक्कल आमच्यावर लढविण्याचा प्रयत्न करण्यांत येत होता, ती आपल्याच गळयांत येऊन पडेल. या गोष्टीचा विचार आम्हां स्वदेशाभिमान्याना राजद्रोही म्हणणारांनीं अवश्य केला पाहिजे. स्वदेशाभिमान बाळगण्यांत कोणताहि दोष नसून उलट त्यांत भूषणच आहे. जोंपर्यंत लोकांचा स्वदेशाभिमान सरकारच्या कायद्याच्या मर्यादेचें उल्लंघन करीत नाहीं, तोंपर्यंत त्याला कोणतीच हरकत नाहीं. आमचा देशाभिमान इंग्रजांना आवडत नसेल, पण त्यांच्या आवडण्याशीं किंवा नावडण्याशीं आपल्याला काय कर्तव्य आहे ? आमचा स्वदेशाभिमान त्यांना आवडो किंवा न आवडो, तो जोंपर्यंत कायदेशीर आणि लोकमान्य आहे, तोंपर्यंत आम्ही, हिंदुस्थानचे लोक, तो बाळगणारच. राजद्रोह करण्याला हरकत; पण स्वदेशाभिमान बाळगण्याला काय हरकत आहे ? राजनिष्ठा मनात असली पाहिजे. पण स्वदेशाभिमान मनांत असूं नये असें कोठें आहे ? आणि तें असावें तरी काय म्हणून ?

हे विचार बरेच लांबले खरे. परंतु त्या विषयांचें महत्त्व लक्षांत आणलें असतां तसें वाटण्याचा संभव फार कमी आहे. 'Two of three poems are distinctly patriotic या वाक्यांत patriotic या शब्दाचा जाइल्स-साहेबांनीं ज्या अर्थानें उपयोग केलेला आहे, त्या अर्थाकडे लक्ष पोंचविलें असतां हल्लींच्या अँग्लोइंडियन अधिकाऱ्यांचें धोरण काय आहे, हें तेव्हांच कळून येईल. व वरील वाक्यावरून स्वदेशाभिमानाकडे जाइल्ससाहेबांची वक्रदृष्टि आहे, असें कोणालाहि दिसून येईल. परंतु वास्तविक पाहातां स्वदेशाभिमानांत दोषार्ह असें कांहींच नाहीं, हें प्रतिपादन करण्याकरितां वरील मुद्याचें विस्तृत रीतीनें विवेचन करणें भाग पडलें. इतर देशांतून स्वदेशाभिमानी मनुष्य मोठ्या मानाला पात्र म्हणून गणला जातो. परंतु आमच्या देशाचें दुर्भाग्य असें कीं, येथील कोणाला देशाभिमानी म्हटलें तर तो भीतीनें थरथरां कांपूं लागतो, व मीं काय गुन्हा केला आहे कोण जाणें, असें त्याला वाटूं लागतें. असें कोणालाहि म्हणण्याचें धारिष्ट नाहीं कीं,

स्वदेशाभिमानी (patriotic) या शब्दाचा कोणी कसाहि अर्थ घेवो, त्या शब्दाच्या स्वाभाविक अर्थाप्रमाणें मी स्वदेशाभिमानी आहें. मि. मलबारी यांच्या कवितांना जाइल्ससाहेब (patriotic) म्हणून समजतात. परंतु मलबारींनीं सरकाराला जें पत्र लिहिलें आहे, त्यांत ते काय लिहितात तें पाहा:—
"Do they (Government) approve of the sneering reference to the word patriotic made against a man who has given his whole life to maintaining the stability of British rule in India ?"
हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्याची बळकटी कायम राखण्यासाठीं ज्याने आपलें सर्व आयुष्य खर्ची घातलें आहे, अशा मनुष्याला अनुलक्षून patriotic हा शब्द वापरून त्याच्याबद्दल जो तिरस्कार प्रदर्शित करण्यांत आला आहे, तो सरकारला पसंत आहे काय? तिरस्कार द्योतित करण्याच्या उद्देशानें जाइल्ससाहेबांनीं patriotic हा शब्द वापरला आहे, व तो शब्द आपल्या-संबंधानें वापरण्यांत आला, म्हणून मि. मलबारी याना वाईट वाटत आहे, या गोष्टी वरील वाक्यावरून स्पष्ट होत आहे. patriotic म्हटल्याबद्दल अभिमान वाटावयाचा दूरच राहून, मला जाइल्ससाहेब patriotic म्हणतात, अशी रड सरकारपाशीं मि. मलबारीसारखे आमच्यांतील पुढारी गात आहेत, हें पाहून अमल्या लोकांच्या कवितेला patriotic म्हणण्यांत आपण मोठीच चूक केली, असें जाइल्ससाहेबांना वाटावयास पाहिजे होतें. व अशा मनुष्याला, "आम्ही तुला देशाभिमानी समजणार नाहीं, तूं आतां भिऊं नको!" अशा अर्थाचा स्वतंत्र ठराव करून आश्वासन देण्याची तसदी सरकारला जाइल्ससाहेबांनीं विनाकारण दिली, असें कोणालाहि वाटल्या-वांचून राहणार नाहीं. इंग्रजी राज्यांतील सुखाचा उपभोग घेणाऱ्या प्रत्येक इसमानें त्या राज्याची बळकटी कायम राखण्याकरितां झटलें पाहिजे, हें आम्हांला कबूल आहे. परंतु म्हणून अशा मनुष्यानें देशाभिमान बिलकूल बाळगितां कामा नये, हें तत्त्व मात्र कोणालाहि संमत होण्यासारखें नाहीं. आम्ही राजनिष्ठहि असूं आणि देशाभिमानीहि असूं. राजनिष्ठा आणि देशाभिमान यांच्या संमेलनाचेंच तत्त्व दिवसेंदिवस उत्कर्ष पावेल. मी फक्त राजनिष्ठ आहें आणि देशाभिमानी नाहीं, असें म्हणणाऱ्या तोंडपुजांचे दिवस याच्या मागेंच होऊन गेले. याच्या पुढचे दिवस त्यांचे नव्हेत. आणखी पंधरा वर्षांनंतर एखाद्या मलबारीशेटवरती स्वदेशाभिमानाचा जर कोणी आरोप

आणील, तर आपल्याला स्वदेशाभिमानी म्हटल्याबद्दल तो सरकारकडे तक्रार घेऊन खास जाणार नाहीं. तसें करण्याची खात्रीनें त्याला लाज वाटेल. त्या पंधरा वर्षांनंतरच्या मलबारीशेटला सरकारला जर कांहीं सांगावेसें वाटलें तर तो असेंच सांगेल कीं, मी स्वदेशाभिमानी आहें खरा, व तुमच्यावरील राजनिष्ठा काडीमात्रहि कमी न करतां मी असाच देशाभिमानी राहीन, अशीहि मला आशा आहे. खरीं उत्तरें देण्याइतका जोम आणि निर्भीडपणा अजून आमच्या पुढाऱ्यांत आलेला नाहीं. म्हणूनच त्यांनीं जरी 'ससारिके' सारख्या कविता लिहिल्या, किंवा कन्सेंट बिलासारखीं बिलें पुढें आणिलीं तरी त्यांच्या कृत्यांना यावें तसें यश येत नाहीं. अशा लोकांच्या निव्वळ शब्दात्मक कवितांना जाइल्ससारख्या प्रबुद्ध आणि इतिहासज्ञ माणसानें patriotic काय म्हणून म्हणावें, हें आम्हास समजत नाहीं.

मि. मलबारीकडून आलेलें पत्र सरकारनें जाइल्ससाहेबांकडे खुलाशाकरितां पाठविल्यावरून जाइल्ससाहेबांनीं आपल्या म्हणण्याचें समर्थन केलें आहे. त्यांत ते असें म्हणतात कीं, 'गुजराथ आणि गुजराथेंतील लोक यांची स्थिति' यासंबंधाची जी कविता आहे, ती औद्योगिक उत्कर्षाच्या हेतूनेंच लिहिलेली असली पाहिजे. आणि त्यांत हल्लींच्या राज्यकारभाराची प्रशंसा केलेली आहे असें मि. मलबारी म्हणतात. परंतु तशी प्रशंसा त्यांत कोठेंच नाहीं. "तो सुखाचा दिवस कधीं येईल? सर्वजण एक कधीं होतील? व स्वराज्याचें काम ते आपल्या हातीं कधीं घेतील?......हल्लींचें राज्य कितीहि चांगलें असलें तरी ती निव्वळ सावली (shadow) आहे. त्यांत खरें सुख नाहीं." अशा प्रकारचीं अनेक वाक्यें उतरून घेऊन मि. जाइल्स हे म्हणतात कीं, जर भाषेला कांहीं अर्थ असेल, तर त्या कवितेचा मथितार्थ असाच असला पाहिजे कीं, परकीय लोकांच्या अंमलांत गुजराथेंतील लोक पायाखालीं तुडविले जात आहेत, व दुःखद स्थितीला येऊन पोहोंचलेले आहेत. परकीय लोक येथील संपत्ति नेत आहेत, मोठमोठ्या जागा नेटिवांना मिळूं देत नाहींत, व स्वराज्य आणि वैभव हें त्यांना प्राप्त होऊं देत नाहींत. जाइल्ससाहेबांनीं अवतरणांत दिलेलीं वाक्यें मि. मलबारी यांनीं लिहिणें चांगलें किंवा वाईट, हा प्रश्न अगदीं स्वतंत्र आहे. पण यांतील कांहीं वाक्यें patriotic आहेत म्हणून तीं वाईट, असें जें जाइल्ससाहेबांनीं ध्वनित

केलें आहे, तें बरोबर नाहीं. कारण, स्वदेशाभिमान आणि राजनिष्ठा हीं एकत्र राहाण्याला कांहीं हरकत नाहीं, हें प्रतिपादन करण्याचाच वरील सर्व लिहिण्यांत आमचा इरादा आहे.

एका बाजूनें मि. मलबारी हे आपला पक्ष पुढें मांडीत आहेत. तेव्हां दुसऱ्या बाजूनें मि. जाइल्स हे आपण केलेल्या टीकेचा यथार्थपणा सप्रमाण सिद्ध करून देत आहेत. अशा रीतीनें हें रामरावणांचें युद्ध चाललें असतां त्यांत सरकारची स्थिति जरा चमत्कारिक झाली, यांत संशय नाहीं. एकीकडे जाइल्ससाहेबांना आपण रिपोर्ट करावयाला सांगितला तेव्हां त्यांना सोडतां येत नाहीं; व दुसरीकडे मि. मलबारीसारख्या हरप्रसंगीं उपयोगी पडणाऱ्या गृहस्थांना नाखूप करतां येत नाहीं. तेव्हां अर्थातच 'रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति।' असा तडजोडीचा मार्ग स्वीकारणें सरकाराला भाग पडलें. सरकारनें या बाबतींत पुढीलप्रमाणें एक ठराव काढून प्रसिद्ध केला आहे. "नामदार गव्हर्नर इन् कौन्सिल याचें असें मत आहे कीं, हल्लींच्या वादविषयक पुस्तकाकडे सरकारचें लक्ष लावून दिलें, ही मि. जाइल्स यांनीं अगदीं यथायोग्य गोष्ट केली; व मि. मलबारी यांना जी टीका संमत नव्हती, तिच्या संबंधानें मि. जाइल्स यांनीं आपल्या २९ सप्टेंबरच्या पत्रांत योग्य आधार दाखविले आहेत, तेव्हां आतां 'आपल्या लेखांनीं कांहीं गैर कायदेशीर कल्पना लोकांच्या मनांत भरविण्याचा माझा उद्देश नव्हता,' असें जें मि. मलबारी यांनीं कळविलें आहे, तें आम्हांला कबूल आहे, इतकें म्हणण्यापलीकडे या प्रकरणांत जास्त कांहीं करण्याची सरकारला बिलकूल जरूरी दिसत नाहीं." अशा रीतीनें सरकारनें आपल्या दोन प्रिय माणसां-मध्यें पेटलेला कलहाग्नि सध्यां शांत केला आहे, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. लॉर्ड नॉर्थकोटसारख्या विचारी गव्हर्नरांच्या कारकीर्दींत अशा गोष्टी न झाल्या तर मात्र आश्चर्य होणें, हें स्वाभाविकच आहे.

---

## स्त्रिया आणि देशभक्ति : : : १९

पुरुषापेक्षां स्त्रियांच्या जातींत स्वाभाविकपणेंच कांहीं तरी गौणत्व आहे. तरी पण स्त्रियाना ईश्वरानें जी थोडीबहुत बुद्धि आणि शक्ति दिलेली आहे, तिचा यथावकाश उपयोग करून त्यांनीं अनेक कामांत बरेंच नैपुण्य मिळविल्याचीं उदाहरणें उपलब्ध आहेत. सैंपाक करणें, सुधारकी मताप्रमाणें लग्न करणें, व प्रसंग पडल्यास दुसरें लग्न करणें, पुरुषांची प्रीति संपादन करणें, वगैरे गोष्टी स्त्रियांच्या ठिकाणीं साहजिकच आहेत. त्यांत त्याना मोठेंसें कौशल्य खर्च करावें लागतें असें नाहीं. व या गोष्टी सर्वसाधारण स्त्रिया प्रत्यहीं करीत असतात. त्या केल्याबद्दल त्यांची कोणी फारशी प्रशंसा करतो, असें मुळींच नाहीं. पण याच्या पलीकडच्या गोष्टी जेव्हां जेव्हां स्त्रियांच्या हातून घडतात, तेव्हां तेव्हां त्यांचीं नांवें संस्मरणीय झाल्यावांचून कधींहि राहात नाहींत. व अशा प्रसंगीं त्यांना पुरुषांपेक्षांहि अधिक मान मिळतो. ईश्वरभक्तीमध्यें पुष्कळ स्त्रियांनीं आपलें वर्चस्व स्थापित करून त्या योगानें त्या परमेश्वराला आणि मनुष्यांना प्रिय झालेल्या आहेत. ईश्वरभक्ति करणें जसें सर्वांना अवश्य आहे, त्याप्रमाणें देशभक्ति करणेंहि सर्वांना अगदीं अवश्य आहे. मनुष्यमात्राच्या पारलौकिक आणि ऐहिक सुखाकरितां ईश्वरभक्तीची जितकी आवश्यकता आहे, तितकीच देशभक्तीचीहि आहे; व या दोन्ही प्रकारच्या भक्तींमध्यें स्त्रियांनींहि आपल्या अंगचे विशेष धर्म प्रकट केलेले आहेत. ही दोन्ही प्रकारची भक्ति—ईश्वरभक्ति आणि देशभक्ति—अशा कांहीं विलक्षण प्रकारची आहे कीं, व हिच्यामध्यें असा कांहीं विलक्षण धर्म आहे कीं, या भक्तीमध्यें पारंगतता प्राप्त झालेल्या व्यक्तीच्या ठिकाणीं इतर कांहीं किरकोळ दोष असले तरी ते लोपून जातात. पिंगला आणि कुब्जा या दासी होत्या, परंतु त्यांची परमे-

श्वराच्या ठिकाणीं इतकी निष्ठा बसून गेली कीं, परमेश्वरानें त्यांना उद्धरण्याचा विचार मनात आणिला, तेव्हां त्यांचें दासीत्व त्यांच्या उद्धाराच्या आड येऊं शकलें नाहीं. महानंदा हीसुद्धां जातीनें आणि धंद्यानें वेश्याच होती. पण शंकरानें मोक्षपद देण्याचे वेळीं तिच्या एकनिष्ठेचाच विचार केला, धंद्याचा विचार केला नाहीं. कान्होपात्रा ही मंगळवेढ्यांतील एका कसबिणीची मुलगी होती. परंतु तिचें लक्ष विठोबाच्या चरणीं इतकें लागलें होतें कीं, त्यानें चैतन्य काढून घेऊन तिच्या कुलाचा किंवा धंद्याचा विचार न करता, तावडतोब आत्मसारूप्याप्रत तिला नेलें. ह्या गोष्टींवरून असें उघड होतें कीं, कोणताहि एक गुण एखाद्याच्या अंगांत उत्कृष्ट रीतीनें वास करीत असला, तर त्याच्यांतील इतर अवगुणांवर पांघरूण पडून त्याच्या त्या गुणाचीच वाहवा होते. व हें तत्त्व वरील उदाहरणांवरून ईश्वरालादेखील मान्य आहे, असें दिसतें. मग तें मनुष्यांना मान्य होईल यांत नवल काय आहे ! यावरून दुर्गुणांचें संपादन मुद्दाम करावें, किंवा त्यांना उत्तेजन द्यावें, असा आमच्या म्हणण्यांतील भावार्थ नव्हे; तर आमच्या म्हणण्यांतील हेतु एवढाच कीं, कांहीं उत्कृष्ट गुण असेल, तर त्याच्या योगानें कांहीं अवगुणांवर पांघरूण पडतें. हा न्याय जसा ईश्वरभक्तीला लागू आहे, तसाच तो देशभक्तीलाहि लागू असला पाहिजे. असा कोणताहि धंदा नाहीं कीं, ज्यामध्यें राहूनच ईश्वरभक्ति आणि देशभक्ति ह्या करतां येणार नाहींत. परमेश्वराचे अनेक भक्त होऊन गेले. त्यांपैकीं कित्येकांचीं नांवें जगाला माहीतहि झालेलीं नाहींत. त्यांची भक्ति एक त्यांना ठाऊक, कीं दुसरी परमेश्वराला ठाऊक. परंतु कित्येकांची भक्ति लोकानुग्रहासाठीं ईश्वरकृपेनें प्रसिद्ध झालेली आहे. अशांचीं कांहीं उदाहरणें आपल्याला भक्तिविजयासारख्या ग्रंथांतून आढळून येतात. त्या भक्तमंडळीकडे पाहिलें तर आपल्याला असें आढळून येईल कीं, ते निरनिराळ्या धंद्याचे आणि जातीचे लोक होते. सोनार, शिंपी, न्हावी, कुंभार, चांभार वगैरे सर्वांच्या कथा त्यांत आहेत. व त्या सर्वांचीं नांवें त्यांचा धंदा कांहींहि असो, आज अजरामर होऊन राहिलेलीं आहेत. हीं जशीं ईश्वरभक्तींतील संतमंडळींचीं नांवें आहेत, तशींच देशभक्तींतील संतमंडळींचीं नांवें आहेत, व तीं इतिहासांतून आपल्या दृष्टोत्पत्तीस येतात. इतिहास हाच त्यांचा भक्तिविजय होय. हे देशभक्तहि अनेक प्रकारच्या धंद्याचे आणि

जातीचे लोक होते. पण देशभक्तीच्या इतिहासाला त्यांच्या धंद्याशीं किंवा जातीशीं कांहींएक कर्तव्य नाहीं. देशभक्तीसाठीं अचाट कर्म करणारा जातीनें किंवा धंद्यानें कोणीहि असो, इतिहास त्याचें चरित्र लिहिल्यावाचून आणि त्याचें उदाहरण पुढील पिढीपुढें मांडल्यावांचून कधींहि राहणार नाहीं, अशी निःसीम देशभक्तीबद्दलची ख्याति मिळविण्याला हातून कांहीं तरी विलक्षण देशसेवा घडली पाहिजे. ही देशसेवा कोणालाहि करतां येण्यासारखी आहे. ती करण्याला शूर शिपाई किंवा बुद्धिमान् राजकारस्थानी पुरुषच लागतो, असें नाहीं. ज्याला त्याला आपापल्या परीनें ती करता येण्यासारखी आहे. ज्याच्या अंगात जो गुण असेल, त्यानें तो देशाच्या सेवेला सादर करण्याला नेहमीं तत्पर असलें पाहिजे. ज्याच्यापाशीं जें असेल, तें त्यानें देवाला अर्पण केलें म्हणजे देव ज्याप्रमाणें संतुष्ट होतो, त्याप्रमाणेंच प्रत्येकानें आपल्या अंगच्या गुणाचा फायदा देशाला दिल्यास, त्याच्या योगानें देशकार्यसिद्धि होते. या दृष्टीनें पाहिलें असतां स्त्रियानाहि देशभक्ति प्रदर्शित करण्याला अनेक मार्ग आहेत, हें अगदीं उघड होतें. व त्याप्रमाणें स्त्रियांनीं आपली देशभक्ति अनेक प्रसंगीं व्यक्तहि केलेली आहे. हल्लींच्या ट्रान्सव्हालच्या लढाईसंबंधानें नुकतीच अशी एक तार वाचल्याचें पुष्कळांना स्मरत असेल, कीं बोअर लोकांच्या बायकांना इंग्लिश लोक नाकेबंदी केलेल्या शहरांतून नेऊन कोंडून ठेवीत आहेत. ह्या कृत्याबद्दल कित्येक लोक इंग्लिशांना नांवें ठेवीत आहेत. त्यांचें लक्ष इंग्लिशांच्या दोषांकडेच गेलें आहे. या कामीं इंग्लिशांचा दोष असो किंवा नसो. यांत बोअर स्त्रियांची देशभक्ति मात्र व्यक्त होत आहे. त्यांची देशभक्ति हीच प्रकृत स्थळीं प्रशंसनीय गोष्ट आहे. आपले नवरे लढत आहेत, तेव्हां आतां आपण आणखी काय करावयाचें, असें म्हणून त्या वीरमाता स्वस्थ बसल्या नाहींत. त्यांनींहि आपल्याजोगतें देशसेवेचें काम आपल्याकरितां शोधून काढलें व केलें. त्या इंग्लिशांकडील गुप्त बातमी काढून आपल्या सैन्यांतील लोकांना देत असत, व अशा रीतीनें त्या आपल्या देशाच्या ऋणांतून मुक्त होण्याचा प्रयत्न करीत होत्या. त्या संबंधाची पुढील एक गोष्ट इंग्रजी पत्रांतून प्रसिद्ध झाली आहे. ती फारच मनोवेधक व उपदेशपर आहे. ती गोष्ट एका सुंदर आणि मोहक अशा स्त्रीची आहे. तिचें वय सुमारें तीस वर्षांचें होतें. तिच्या चेहऱ्यावर इतका मोहकपणा होता

आणि तिच्या डोळ्यांत इतकें पाणी होतें, कीं तं। दुसरीकडे विरळाच आढळण्यांत येईल व जिभेची एकसारखी टकळी लावूनहि दुसऱ्या बायकांच्या हातून जी गोष्ट कधींहि व्हावयाची नाहीं, ती ती तोंड न उघडतांहि सहजगत्या घडवून आणूं शकत असे. ती पहिल्यानें जोहान्सबर्ग येथून निघून चोहोंकड फिरत असे. पण ती निष्कारण फिरत असे, असें मात्र नाहीं. एका गावाहून दुसऱ्या गांवीं आणि एका शेतांतून दुसऱ्या शेतांत ती अक्षय फिरत होती, व असें फिरून फिरून त्या शेतावरील सर्व बायकांच्या साहाय्यानें गुप्त बातम्या काढण्याची पूर्ण तजवीज त्या हुशार स्त्रीनें चोहोंकडे केली. इंग्रजांचें सैन्य नाताळात किंवा फ्री स्टेटमध्यें कोठेंहि जाऊन उतरलें, म्हणजे ताजीं अंडीं, लोणी, किंवा असेच व दुसरे कांहीं पदार्थ घेऊन तुम्हीं तेथें विकावयाला जावें, व तेथें गेल्यावर प्रत्येक कँपमध्यें शत्रूचे किती लोक आहेत, व त्यांजपाशीं तोफा किती आहेत, व त्यांचे घोडे कोणत्या स्थितींत आहेत, ही सर्व माहिती मिळवून शेजारच्या बोअर लोकांच्या सेनापतीला कळवावी, असें तिनें सर्व शेतकऱ्याच्या बायकांना आणि तरुण मुलींना सांगून ठेविलें होतें. व त्याप्रमाणें त्यांनीं बातम्या काढण्याचीं कामें केलींहि. अशा रीतीनें इतर स्त्रियांना देशकार्याच्या मार्गाला लावून ही स्त्री आपण स्वतः केपटाऊनमध्यें येऊन एका बाजूला एक घर घेऊन राहिली. तेथें इतरांबरोबर एक ब्रिटिश लष्करी कामगार तिच्या जाळ्यांत सांपडला. त्याला वाटलें कीं, ही विधवा स्त्री आपल्या करमणुकीला बरें साधन आहे. परंतु ती त्याला पिळून काढण्यांत अतिशय दक्षपणानें वागत होती. त्याच्यापासून जी जी बातमी बाहेर पडे, ती ती तत्क्षणीं बोअर सेनापतीकडे जाऊन पोंचत असे. प्रथमतः ही स्त्री त्या ब्रिटिश कामगाराच्याच तैनातीला असे. परंतु हळूहळू तिनें बरेच लोक आपल्या नादीं लावून घेतले व प्रत्येकापासून ती कांहीं तरी गुप्त रहस्य जाणून घेत असे. व मासे धरणारा कोळी ज्याप्रमाणें सर्व माशांना आपल्या गळांत अडकवून घेतो, त्याप्रमाणें ती प्रत्येक ऑफिसरला आपल्या मोहपाशांत गोंवून घेत होती. अमुक सेनापतीपाशीं किती सैन्य आहे, याची माहिती ती एकाजवळून मिळवी. त्याच्यापाशीं तोफा किती आहेत, हें ती दुसऱ्याला विचारी. त्याच्याजवळ घोडेस्वार

किती आहेत याबद्दलचा खुलासा तिला तिसऱ्याच कोणाकडून कळत असे. व त्याचा उद्देश काय आहे, याबद्दलची कुणकूण ती चवथ्या इसमाकडून काढून घेत असे. एकालाच फार प्रश्न विचारले, तर कदाचित् आपला कोणाला संशय येईल, म्हणून निरनिराळ्या लोकांना ती निरनिराळे प्रश्न विचारीत असे. व ही सर्व बातमी तिजकडून बोअर सेनापतींना कळत असे. व त्यामुळें ते इंग्लिश सैन्यावर अचानक घाला घालूं शकत असत. अशा प्रसंगीं आपले बेत बोअर लोकांना कसे कळतात, याबद्दल इंग्लिश सेनापतींना मोठा विस्मय वाटत असे. ती जेथें जेथें जाई, तेथें तेथें इंग्लिश कामगारलोक तिचा आदरसत्कार करीत असत. परंतु तिच्याशीं सख्य झालें, कीं त्याच्या मागोमाग इंग्लिशांचा पराभव हा ठेवलेलाच असावयाचा, असा अनुभव येऊं लागल्यामुळें तिच्याबद्दल संशय उत्पन्न झाला. तिलाहि इंग्लिशांच्या सैन्याची पूर्ण माहिती झाली व म्हणून ती हवा बदलण्यासाठीं दुसरीकडे जाण्याचा विचार करूं लागली. नायट्रेट ऑफ सिल्व्हरच्या योगानें तिनें एके दिवशीं आपल्या शरीराचा रंग बदलला, व काफीर लोकांच्या बायकांप्रमाणें बाह्य वर्ण काळाभोर करून घेऊन ती कोणालाहि संशय न येतां प्रिटोरियापर्यंत सुरक्षितपणें निघून गेली. व तेथें बोअर लोकांना सर्व हकीकत सांगून आपल्या कर्तव्यकर्मांतून ती मोकळी झाली.

ही त्या देशोपयोगी बोअर स्त्रीची गोष्ट झाली. तिनें जें कृत्य केलें तें नैतिक दृष्ट्या चांगलें होतें, किंवा वाईट होतें, याचा विचार नीतिशास्त्र करील. परंतु बोअर लोकांनीं आपल्या देशाचा लिहिलेला इतिहास या कृत्याला स्वदेशभक्तीचेंच कृत्य म्हणेल. याला याहून दुसरें नांव माहीत नाहीं. व अशा कृत्यांत जरी कांहीं थोडेसें वैगुण्य असलें, तरी स्वदेशभक्ति आपलें पवित्र जल त्याजवर शिंपडून त्याला पावन करून घेईल, यांत शंका नाहीं.

---

# * साहित्यांतील सुवर्णकण *

**न. चिं. केळकर**

**ज्ञानेश्वरी सर्वस्व**

ज्ञानेश्वरीचा भावार्थ, निवडक अवतरण, विस्तृत विवेचन
कठीण शब्दांचा कोष, विषय सूचि. किं. ५ रु.

**गांवरान गीता**

श्रीभगवद्गीतेचा सुबोध परिचय किं. २ .

**फ्रेंच राज्यक्रांति** किं. २॥ रु.

**राज्यशास्त्र** किं. १॥ रु.

**द. के. केळकर**

**संस्कृति संगम**

वाढवून अद्ययावत् केलली नवी आवृत्ति किं. ६ रु.

**काव्यालोचन**

सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ति किं. ५ रु.

**साहित्यविहार** किं. ३ रु.

**कमलाबाई देशपांडे**

**स्मरण सांखळी** किं. ६

**हंसरा निर्माता आणि चिमण्या** किं. २ रु.

**मनोहर ग्रंथमाला, टिळकरोड, पुणें २.**

एकंदरीत चालू महर्गतेमुळें

## काळांतील निवडक निबंधांचीं पुस्तकें

जितक्या कमी किंमतींत द्यावयाची माझी इच्छा होती, तितक्या कमी किंमतींत देतां आलीं नाहींत. याकरितां काळांतील निवडक निबंधांचे पहिले भागांत एक सवलतीचें कुपन टाकलें आहे. सवलतीची समग्र माहितीही त्याच खंडांत दिली आहे. ग्राहकांनीं अवश्य वाटल्यास, त्याचा फायदा घ्यावा.

★ ★

व्यवस्थापक :

य. गो. जोशी-प्रकाशन,

सदाशिव, पुणें २.